# प्रस्तावना

कोरकू ही मध्यभारतातील प्रमुख आदिवासी जमात आहे. या जमातीचे वास्तव्य महाराष्ट्रा सोबतच मध्यप्रदेशातील अनेक भागात आहे. या जमातीची लोकसंस्कृती वैशिष्टपूर्ण आहे. त्यांचे रीतिरिवाज, प्रथा, परंपरा, मूल्ये याची साक्ष देतात. कोरकू जमातीचे लोकवाङ्मय समृद्ध असून ते विविधतेने नटलेले आहे. त्यांची लोकनृत्ये, लोककला देखील वैशिष्टपूर्ण आहेत. या जमातीची बोलीभाषा कोरकू असून त्यात विपूल शब्दभांडार आहे. म्हणी, वाक्यप्रचार, उखाणे त्यात विशेषत्वाने आढळतात. प्रस्तुत पुस्तकामध्ये कोरकूंच्या जीवनातील अनेक गोष्टींवर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. या करीता गुरूवर्य प्रो.गणेश देवी, प्रा. सुरेखा देवी, प्रा, कानजीभाई पटेल, श्री अरुण जाखडे, शिक्षण प्रसारक मंडळ अकोलाचे सचिव श्री गोपाल खंडेलवाल, शंकरलाल खंडेलवाल महाविद्यालय अकोलाचे प्राचार्य डॉ.जे. एम. साबू, डॉ. शिवाजी नागरे यांच्यासह सर्व शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांचा मी ऋणी आहे.

कोरकू जमातीविषयक साधनसामग्री संकलनाकरीता मोलाचे हात देणारे असंख्य कोरकू बांधव, श्री दादूबाबा पिपलपाणी, अखंडे गुरूजी भैसदेही, पटल्या गुरूजी धारणी, शेकलाल बेलसरे अढाव, रामलाल

सावलकर तारुबांदा, मोहन मावसकर, नंदा मावसकर तलई, कुंजीलाल मैंबर चौराकुंड, गोपाल धुमाळे, बाभूळकर सर, जानराव हावरे, रावसाहेब काळे, निसर्ग संरक्षण संस्था अमरावती, सुनील भिलावेकर, अमीत अग्रवाल यांच्या मोलाच्या सहकार्याने हे कार्य शक्य झाले आहे. आपण या ग्रंथाचे स्वागत कराल ही अपेक्षा.

डॉ. श्रीकृष्ण गो. काकडे
अकोला (महाराष्ट्र)

# अनुक्रम

**कोरकू :**

कोरकू ही मध्य भारतातील प्रमुख आदिवासी जमात आहे. ही जमात छोटा नागपुर परिसरातील मुंडा किंवा कोलारियन, कोरवाज यांची एक शाखा असल्याचे अभ्यासकांचे मत आहे.

**भौगोलिक क्षेत्र**

महाराष्ट्रातील मेळघाट परिसर, मध्यप्रदेशातील निमाड, हरदा, बैतूल, होशंगाबाद या जिल्ह्यात कोरकूची संख्या विपूल प्रमाणात आहे. मध्यभारतात कोरकू यांच्याशिवाय कोरवा, भिल्ल, खैरवार, खारीया, गोंड, परधान, कोलाम या जमातीचे वास्तव्य आहे. गोंडाच्या आगमनापूर्वी कोरकू या प्रदेशात स्थायिक झाले असावेत. गोंडाच्या प्राबल्यासमोर त्याचा टिकाव न लागल्याने त्यांनी दुर्गम प्रदेशात आपली वस्तीस्थाने निवडली असावीत कारण गोंडबहुल प्रदेशात कोरकूची संख्या कमी असल्याते दिसते. मध्यप्रदेशातील बैतूल, होशंगाबाद यापेक्षा सातपुड्याच्या पर्वतरांगातील दुर्गम प्रदेश, दऱ्या, जंगल, नद्यांनी वेढलेल्या भागात कोरकूची संख्या खूप जास्त आहे. कोरकू लोक छोट्या छोट्या समूहाने राहणे पसंत करीत असल्याने त्यांची गावे फार मोठी नाहीत. त्याच्यामध्ये समूहनिष्ठता कमालीची असून अत्यंत कष्टप्राय जीवन त्यांच्या वाट्याला आले आहे.

**सृष्टिसर्जन की कल्पना**

डोंगरातील टेकडीवर एकदा देवांची सभा भरली. सोन्याचे आसन (जाजोम) टाकून त्यावर देव बसले.

त्यांनी आपआपसात विचार केला की, हे आकाश, हे धरती सुनी सुनी आहे. येथे मानवाची निर्मिती केली पाहिजे, असे त्यांनी ठरविले. तेव्हा देवांनी कावळ्याला बोलावले. त्याला माती आणायला सांगितले. तो माती आणायला गेला पण जात असताना त्याचे पंख झडून गेले, अशी अनेक संकटे त्याच्या मार्गात आली. पण तो थांबला नाही. तो सूर्य उगवतीच्या दिशेला गेला. एका समुद्र किनारी तो जाऊन बसला. तेथे त्याने मातीचा शोध घेतला. पण त्याला यश आले नाही. तेव्हा कावळा समुद्राच्या किनारी दिमक देवी (उधळीमाता)जवळ गेला. त्या देवीला त्याने माती मागितली. दिमक देवीने कावळ्याला माती दिली पण ती उसनी म्हणून. ती माती घेऊन कावळा देवतांजवळ आला. त्या मातीपासून देवांनी माणसाच्या मूर्त्या बनविल्या पण त्या मूर्त्या इंद्राच्या घोडयानी मोडून टाकल्य. त्यानंतर देवांनी दोन कुत्र्यांना त्या मूर्तीच्या संरक्षणाची जबाबदारी सोपविली. कुत्र्यांनी त्या घोडयाना हाकलून लावले व त्या मूर्त्याचे संरक्षण केले. देवांनी त्या मूर्त्यामध्ये प्राण ओतले. अशा रितीने मानवाची उत्पत्ती पृथ्वी तलावर झाली. कावळ्याने दिमक देवीजवळून आणलेली ती माती परत देण्यासाठी देवांनी माणूस मेल्यावर त्याची माती करण्याचे ठरविले. अशा रितीने कोरकू जमातीत मनुष्य निर्मितीचे रहस्य उलगडल्या जाते.

**समाजाचा इतिहास**

कोरकूंच्या उत्पत्ती विषयी अनेक कथा प्रचलित आहेत. महादेव हा त्यांचा निर्माणकर्ता असल्याने त्या विषयीचा आदर या जमातीत विशेष दिसतो. कोरकू जमातीमधील प्रचलित कथेनुसार प्राचीन काळी राजा

रावण हा अत्यंत शक्तिशाली राजा होता. विंध्य आणि सातपुडा पर्वतादरम्यांन भ्रमण करीत असताना त्याला दिसले की, या दुर्गम भागात मनुष्याची वस्ती नाही. हा परिसर पूर्णपणे निर्मनुष्य आहे, तेव्हा रावणाने या भागात मनुष्याच्या निर्मितीसाठी आदिदेव महादेवाला प्रार्थना केली. महादेव रावणावर प्रसन्न झाले. महादेवाने रावणाची प्रार्थना ऐकून कागदेव(कागेश्वर) याला भंवरगड-सावलीगढ़ या पर्वतीय परिसरातून दिमक देवीच्या (उधळी) बिळातून लाल माती आणायला सांगितली. महादेवाने त्या मातीपासून मानवाच्या दोन मूर्त्या बनविल्या. त्यांना जीवित करण्याचा प्रयत्न केला. मात्र इंद्राला महादेवाचे हे कार्य पसंत पडले नाही. इंद्राने रागाच्या भरात आपल्या दोन अश्वदूताना पाठवून त्या मूर्त्या नष्ट केल्या. महादेवाला या गोष्टीचा संताप येऊन त्याने पुन्हा मूर्त्या बनविल्या. त्याही इंद्राने नष्ट केल्या. त्यामूळे महादेवाने नंतर दोन कुत्र्यांच्या मूर्त्या बनवून त्यांना सजीव केले व त्या दोन मानवाच्या मूर्त्याच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर सोपवली. त्या दोन कुत्र्यांनी मूर्त्या तोडायला आलेल्या इंद्राच्या अश्वदूतांना हाकलून लावले. महादेवाने पुन्हा त्या दोन मानवी मूर्तीत प्राण ओतले. त्यापैकी पुरुषाला 'मूला' व स्त्रीला 'मूलई' असे संबोधून त्यांना 'पोथरे' हे नाव दिले. त्यांनाच कोरकू जमातीत आदिपुरुषाचे स्थान मिळाले. अशाप्रकारे कोरकूच्या निर्मितीत रावणाचे अमूल्य योगदान राहिले व महादेव कोरकूंचे आराध्य दैवत बनले.

कोरकू जमातीच्या उत्पत्ती संबंधी आणखी एक कथा सांगितली जाते. त्यानुसार कोरकू ही लढवय्यी जमात असून त्यांचा संबंध पृथ्वीराज चौहाण यांच्या सैनिकांशी जोडल्या जातो. मुगल-राजपूतांच्या युद्धात जीव वाचविण्यासाठी एकदा ही सैनिकांची तुकडी जंगलात पळाली व लपून बसली. मुगल सैनिकांनी त्यांचा

पाठलाग केला. जंगलात या लोकांना पाहिल्यावर मुगल सैनिकांनी त्यांना विचारले. तेव्हा यांच्या तोंडातून 'कोरकू' हा शब्द निघाला. कोरकू भाषेत 'कोरा' म्हाजे 'रस्ता' आणि 'कू' म्हणजे 'जाणे'. म्हणजेच जंगलातील रस्त्याने फिरणारे ते 'कोरकू'. या कथांना कुठलाही ऐतिहासिक पुरावा नसल्याने यांच्या सत्यतेबाबत प्रश्नचिन्ह निर्माण होते. काही अभ्यासकांच्या मते, कोरकू म्हणजे कौरवांच्या सैन्यातील एक तुकडी असावी. कोरकूंच्या उत्पत्तिविषयी वरील प्रकारचे मतप्रवाह आहेत. मध्यभारतातील विध्य व सातपुडा पर्वतरांगामध्ये जास्त प्रमाणात कोरकू निवास करतात. मध्यप्रदेशात सर्वात जास्त कोरकू आहेत. महाराष्ट्रातील सातपूडा परिसर, छत्तीसगढ, आसाम, बिहार, अरुणाचल प्रदेश, झारखंड या राज्यातही कोरकूचे वास्तव्य आहे. मध्यप्रदेशातील निमाड, बैतूल, हरदा, होशंगाबाद या जिल्ह्यासोबतच महाराष्ट्रातील अमरावती, अकोला, बुलढाणा या जिल्ह्याच्या सीमावर्ती भागात कोरकू बहुसंख्येने आढळतात.

**जन्मविधी**

कोरकू स्त्रियांमध्ये गर्भधारणेचे निदान मासिक पाळीवरून ठरवितात. लग्न झाल्यावर पहिल्या महिन्यात किंवा त्यानंतर मासिक पाळी बंद झाल्यास व स्त्रीच्या शरीरावर तेलकटपणा येणे, शरीराची अनपेक्षित वाढ, वक्ष व पोटाची वाढ, ही लक्षणे दिसू लागल्यास गर्भधारण झाली असे निश्चित होते. वयोवृद्ध स्त्रिया किंवा दायन बुढीचेही मार्गदर्शन घेण्यात चेते. कोरकू जमातीत मूल होणे हा पूर्वजाचा आशीर्वाद, देवतांची कृपा समजल्या जाते. मात्र, गर्भधारणेपासून बाळंतपणापर्यंत कोणताही विधी केल्या जात नाही. गरिबी, दारिद्रय,

हलाखीची परिस्थिती असल्यास गर्भार स्त्रियांना शेवटच्या महिन्यापर्यत सर्व प्रकारची कामे करावी लागतात.

कोरकू रूढी परंपरेनुसार या दिवसात कोरकू स्त्रियांना काही बंधने पाळावी लागतात. त्यात स्त्रीला स्मशानात जाण्यास मनाई असते. तिला मद्यपान करता येत नाही. नदीवर मासे पकडण्यास जाऊ देत नाहीत. कपडे फाडणे, शिवणे, म्हणजे सुईच्या वापर ती करत नाही. शेतावर काम करीत असताना आपल्या गोत्राच्या संबंधित कुठल्याही वस्तुला हानी पोहचणार नाही याची काळली तिला घ्यावी लागते. सातव्या महिन्यानंतर पुरुष स्त्रीशी शारीरिक संबंध ठेवत नाही. या काही गोष्टी वर्ज्य असल्या तरी तिला अनेक कष्टाची कामे करावी लागतात. पुरेशे अन्न मिळत नाही. त्यामुळे पोटातील बाळावर त्याचा अनेकदा परिणाम होतो. दुर्गम भागात आरोग्याच्या सुविधा नसल्याने कुपोषणाचे प्रमाण अधिक असते. ज्या गावात आरोग्य सुविधा आहेत. रस्ते आहेत अशा ठिकाणी स्त्रियांचे बाळंतपण दवाखान्यात केल्या जाते. मात्र, ज्या ठिकाणी ही सुविधा नाही त्या ठिकाणी बाळंतपण दायन बुड्डी करते. हे कार्य अनुभवावरून केल्या जाते. बाळंतपणासाठी प्रत्यक्ष स्त्रीची अवस्था पाहून दायन सर्व प्रकारच्या साहित्याची मागणी करते. घरातच बाळंतपण केल्या जाते. गरम पाणी, गुळाचा काळा चहा, गोवऱ्याचा धूर, जुने कपडे, वनैषधीचा वापर केल्ला जातो. मूल झाल्यावर त्याची नाळ बांबूच्या सिलकीने (साल) कापल्ली जाते. त्यानंतर दायन बाहेर येऊन मुलाच्या जन्माची वार्ता सांगते. मुलाची तेल लावून मालीश केल्ली जाते. गरम पाण्याने बाळंतीन स्त्रीची आंगोळ केल्या जाते. बाळंतीन स्त्रीला कुटकीची पेज, सोजी दिल्या जाते. बाळाची नाळ घरामागेच खड्डा खोदून रोवल्या जाते. साधारणत : पाच दिवसापर्यंत बाळंतीन स्त्री कुठलेही कार्य करीत नाही. सहाव्या दिवशी छटी पूजनाचा कार्यक्रम केल्या जातो.

गृहदेव, खेडादेव, मुठवादेव, छठीमाय यांची पूजा करून त्यांना कोंबडा किंवा बकऱ्याचा बळी दिल्या जातो. यावेळी आप्तस्वकीय, गावकरी हजर असतात. त्या दिवसापासून बाळंतीण स्त्री हळूहळू आपल्या नियमित कामांना सुरुवात करते. नंतरच्या काळात बाळाचे संगोपन म्हातारी माणसेच करतात. पुढे येणाऱ्या आठवडी बाजारात, जत्रेत बाळाचा कर्णवेध संस्कार केल्या जातो. यावेळी बाळाला नवीन कपडे परिधान करून देवदेवतांची पूजा केल्या जाते. बळी देऊन नैवद्य चढविल्या जातो. यावेळी बाळाला नवीन कपडे परिधान करून देवदेवतांची पूजा केल्या जाते. बळी देऊन नवैद्य चढविल्या जातो. त्यानंतर मुलाचे नाव ठेवण्यात येते. पूर्वी पारंपरिक नावाचे प्रचलन होते. आता नव्या पद्धतीची नावे ठेवल्या जातात. मुलगा असल्यास त्याचे  कान टोचतात तर मुलगी असल्यास कान, नाक टोचल्या जाते. यावेळी कान टोचणाऱ्याला योग्य ते बक्षिस देऊन कानात नाकात सोने, चांदी, स्टीलचा तार टाकल्या जाते आणि हा विधी पूर्ण होतो. बरेचदा पहिले मूल झाल्यावर १ वर्ष किंवा १० महिन्यातच दुसरे मूल होते. त्यामुळे मातेच्या आरोग्यावर परिणाम होतो. शिवाय मुलेही कुपोषित निपजतात. त्याला मातेचे दूध व मातेला योग्य तो आहार न मिळाल्याने त्याची प्रतिकारशक्ती कमी होऊन ही मुले दगावतात. अनेकदा मुलांची तब्येत बिघडल्यास पालक अंधश्रद्धेपोटी त्यांना दवाखान्यात न नेता भूमका किंवा पडिहार यांच्याकडे नेतात. देवपूजा, नवस, जादूटोणा यासरखे इलाज करतात. या प्रक्रियेत अनेकदा मूल दगावते. त्यामुळे या कोरकू परिसरात बालमृत्यूचे प्रमाण जास्त आढळते. एखाद्या दाम्पत्याला साधारणपणे लग्नानंतर पाच वर्षापर्यंत मुल न झाल्यास वंधत्वाचा प्रकार समजल्या जातो. कोरकू जमातीत मूल न होणे हा देव, आत्मा, पूर्वज यांचा कोप समजल्या जातो. अशावेळी भूमका, पडिहार, यांच्या

सल्ल्याने तो कोप निवारण्याचे उपाय केल्या जातात. देवदेवतांची पूजा, नवस बोलल्या जातात. पूर्णा, तापी, मूलताई यासारख्या यात्रामध्ये हे नवस बोलून ते पुढल्या वर्षी फेडल्या जातात. एवढे करून मूल न झाल्यास त्या स्त्रीला वांझ समजल्या जाते. अशावेळी पुरुष दुसरे लग्न करतो. तर ती स्त्री त्याच कुटुंबात उदरनिर्वाह करते. अशा स्त्री करीता कोरकू जमातीत कुठलेही सामाजिक बंधने किंवा विधीनिषेध आढळून येत नाहीत. पूर्वी कुटूंब नियोजनाबाबतही कोरकू जमातीत फारशी जनजागृती नव्हती. कोरकूंचा असा विश्वास आहे की आपले पूर्वजच मुलाच्या रुपाने पुनर्जन्म घेतात. आपण जर गर्भ निरोधन केले तर त्या पूर्वजाच कोप होईल, अशी भिती त्यांना वाटते. दिवसेंदिवस मात्र परिस्थिती बदलत आहे. अनेक ठिकाणी आधुनिक सुविधांचा लाभ घेतल्या जात आहे. अनेक स्त्रिया-पुरुष गर्भनिरोधक गोळया, कंडोम वापरुन कुटूंब नियोजनाच्या शस्त्रक्रिया करीत आहेत.

**मुलांची देखरेख, संगोपन** :

मुलांची देखरेख किंवा संगोपनाची जबाबदारी मातापित्या प्रमाणे कुटुंबातील म्हाताऱ्या माणसांकडे असते. बरेचदा मोठी झालेली मुलेही लहान मुलांना सांभाळतात. दीड वर्षापर्यत मुलांना आईचे दूध पाजल्या जाते. नंतर मात्र त्याला बाहेरचे अन्न देतात. अनेकदा गरिबी, दारिद्रय यामुळे मुलांना पुरेशा प्रमाणात अन्न मिळत नाही. त्यामुळे मुलांच्या आरोग्यावर त्याचे दूरगामी परिणाम होतात. आईवडील कामावर गेल्यानंतर मुले गावात इकडे तिकडे फिरतात. शाळेतही मध्यान्ह भोजनासारख्या योजना असल्याने मुले शाळेत जातात.

मात्र शिक्षणाबाबत फारसे उत्साहवर्धक चित्र कोरकू जमातीत पहावयास मिळत नाही. शिक्षणाबदूल अनास्था असल्याचे अनेक कारणे आहेत. त्यापैकी अनेक मुलांना शेतीची कामे, गुरेपालन करावे लागते. लहान मुलांचा सांभाळ करावा लागतो. त्यामुळे मुले शिकत नाहीत. त्यांची मातृभाषा आहे कोरकू. घरादारात, गावात, समाजात कानावर तीच पडते आणि शाळेत गेल्यावर शिक्षण मिळते हिंदी, मराठी सारख्या भाषामधून, त्यामुळे लहान मुलांना त्या भाषा समजत नाहीत. त्यांना शिक्षणच कठीण वाटू लागते व ते शाळा सोडून देतात. अनेकदा आई वडील रोजगारासाठी गावातून स्थलांतर करतात. अशावेळी मुलांकडे लक्ष देता येत नाही. त्याची शाळा अर्ध्यातच सुटून जाते. मुले अशा प्रतिकूल परिस्थितित जीवन जगत राहतात. मोठया मुलाचे लग्न होईपर्यत कोरकू जमातीत एकत्र कुटुंबच असते. त्यानंतर मात्र ते विभक्त होते.

## विवाहविधी, गोत्राचे प्रकार व भूमिका

### कोरकू विवाह संस्कार :

विवाह हे आदिम संस्कृतीचे महत्त्वाचे अंग आहे. विवाहाशिवाय कुटुंबाची निर्मिती अशक्य आहे. स्त्रीपुरुषाच्या वैवाहिक संबंधाच्या पूर्तीसाठी, त्याच्या नियंत्रणासाठी, त्याला स्थिरता व स्थायित्व प्रदान करण्यासाठी विवाह संस्काराची निर्मिती मानवाने केली आहे, विवाहाची व्याख्या रवींद्र मुखर्जी यांनी पुढीलप्रमाणे केली आहे. 'विवाह समाज से मान्यता प्राप्त किसी प्रथा या नियम के अनुसार दो या दो से अधिक स्त्री-पुरुषो के यौन संबधो को नियमित करने की वह संस्था है जिसका उद्देश घर बसाना तथा बच्चो के

लालन-पालन के लिए एक स्थायी आधार प्रदान करना है'[१]. कुटुंबाला आकार, मुलांचे पालनपोषण, सामाजिक उत्तरदायित्व विवाहामुळे होऊ शकते. कोरकू जमातीत पूर्वी मुला-मुलींचे विवाह किशोरावस्थेतच होत होते. परंतु आता मुलींचे लग्न वयाच्या १८ ते २० व मुलाचे २१ ते २४ वर्षा दरम्यान केल्या जाते. सगोत्र विवाह, मामे-आत्या भाऊबहीण विवाह निषिद्ध आहेत. कोरकू जमातीत पुढील प्रकारचे विवाह केल्या जातात. काळानुसार कोरकू विवाह पद्धतीत अनेक बदल होत असून जुन्या रूढी, परंपरा, चालीरीती लुप्त होत आहेत.

**कूळगोत्र** :

आदिवासींच्या सामाजिक जीवनाचा 'गोत्र' हा प्रमुख आधार आहे. गोत्र म्हणजे अनेक वंशाचा एक समूह की जो एका रक्तसंबंधिया पासून बनलेला असतो. गोत्राचा प्रारंभ कुठल्यातरी एका पूर्वजापासून होत असतो. तो त्या वंशाच्या गोत्राचा संस्थापक किंवा आद्य प्रवर्तक असतो. गोत्राची व्याख्या करताना डॉ. रवींद्र मुखर्जी लिहितात, 'गोत्र म्हणचे एकपक्षीय परिवाराचे ते संकलन आहे, जे सदस्य स्वतःला एका वास्तविक किंवा काल्पनिक पूर्वजाचे वंशज मानतात'[२] त्यामुळे विवाहासाठी त्यांना दुसऱ्या गोत्रातील मुलीशी विवाह करावा लागतो. गोत्रांचे मातृवंशीय व पितृवंशीय असे प्रकार पडतात. कोरकू जमातीत गोत्र व्यवस्थेला विशेष स्थान आहे. कोरकू मधील गोत्रव्यवस्था पितृवंशीय आहे. एक पुरुष त्याचे भाऊ, मुले, पुतणे यांचा समावेश त्या गोत्रात केला जातो. बहिणी, मुली किंवा त्याची संताने त्यांच्या गोत्रात समाविष्ट होत नाहीत. कोरकूंच्या

गोत्रनिर्मितीची एक कथा प्रचलित आहे. त्यानुसार कोरकूंचे आदिपुरुष मुला व मुलई यांना ३६ मुले होती. ती एकमेकांना भाऊ-बहिणी मानीत. त्यामुळे वंशविस्तार होत नव्हता तेव्हा त्या सवानी महादेवाची आराधना केली. महादेवाने वाघाचे रुप घेऊन डरकाळी फोडली, त्यामुळे धरणीकंप झाला. सर्वजण भयभित झाले. इकडे तिकडे पळू लागले. कुणी पाण्यात उडी मारली. कुठी झाडावर लपले, कुणी जमिनीत लपले. ज्याला जे ठिकाण सोयीचे वाटले त्याने तेथे आश्रय घेतला. महादेवाचा क्रोध शांत झाला. त्यावेळी वातावरण शांत झाले. महादेवाने सर्वांना जवळ बोलावून कोण कुठे लपले ? याची माहिती विचारली. त्यानुसार त्यांचे गोत्र बनविले. जो पाण्यात लपला त्याचे गोत्र बनले मावसी. जो जांभूळाच्या झाडावर चढला तो झाला जांबू. जो मातीत लपला तो झाला कासदा. त्यांना महादेवाने आज्ञा केली की, प्रत्येकाने आपले गोत्र सोडून इतरा गोत्राशी विवाहादी संबंध प्रस्थापित करावे. संसाराची वृद्धि करावी. ही कथा जरी काल्पनिक वाटत असली तरी त्यामुळे कोरकू जमातीमध्ये एक सुसूत्रता येऊन गोत्र व्यवस्था तयार झाली. कोरकू जमाती मध्ये एकूण ३६ गोत्राचा उल्लेख डॉ. अशोक पाटील यांनी केला आहे. राजपूत, मराठा यांच्या प्रभावापूर्वीची स्थिती ते सांगतात. कोरकूंचे गोत्र वनस्पती, जीवजंतू, पशू व इतर वस्तूवर आधारित असून गोत्राचे मुख्य कार्य विवाहाचे संबंध प्रस्थापित करणे हे आहे. गोत्राचे प्रचलन प्रदेशानुसार कमी अधिक आहे. कोरकू मध्ये महाराष्ट्र व मध्यप्रदेशाच्या सीमावर्ती प्रदेशात खालील प्रकारचे गोत्र व त्यांची आडनावे आढळतात.

| अ. क्र. | गोत्राचे नाव | ओळख/खूण | आडनावे |
|---|---|---|---|
| १. | बेठे | गिरमारीचे झाड | बेठेकर, बेलसरे, मेटकर, पाटील, पटेल |
| २. | मावसी | पाणी | मावस्कर, मावशे, मोवाशी |
| ३. | ढिकार | लहान मासा | ढिकार, पटोकार, ढिगर |
| ४. | साकोम | सागाचे पान | सावलकर |
| ५. | टोटा | धांडा (ज्वारी, बाजरीचा) | धांडे, धांडेकर |
| ६. | कासदा | माती | कासदेकर, काळे, भूईकर, कासोटे |
| ७. | झारा | गवत | झारेकर, जावरकर, गवते, वानखडे, भास्कर |
| ८. | मोरीराना | मोराचे घरटे | मोरीराना, मुरले |
| ९. | टाखेर | काकडीचा वेल | टाखेर, ढाकरे |
| १०. | जांबू | जांभूळाचे झाड | जांभेकर, जामूनकर. |
| ११. | सिलू | गोंदणीचे झाड | शेलोकार, सलेकार, चिमोटे, सालवेकर |
| १२. | टांडेल | गवताचा एक (तांदुळजिरा गवत) | तांडिलकर, कांडिलकर, तांडेल |
| १३. | चिलाटी | एक वेल | चिलाटे, चिलात्रे |
| १४. | दारशिमा | जंगली कंद | दारशिंबे, दारशिमा, धुर्वे |
| १५. | भूसूम | गवत | भूसूम, भूसूमकर |

| | | | |
|---|---|---|---|
| १६. | अखंडी | एक टेकडी(पूर्ण) | अखंडे |
| १७. | देही | एक झाड | दहीकर, दहेकर |
| १८. | कोल्या | कोळसा | कोल्हेकर |
| १९. | सिरम्या | एक झाड | सेमलकर |
| २०. | चुथार | मधमाशी (बारीक) | चुतूर, चतुरकर |
| २१. | भिलावा | बिब्याचे झाड | भिलावेकर |
| २२. | भूरीराना | होलगी पक्षी | भूरीराना, मुऱ्हेकर |
| २३. | टांडील | मक्याचा घांडा | टांडीलकर |
| २४. | कलम | कलमाचे झाडा | कलमकर, कलमेकर |
| २५. | पालवे | पान | पालवे, पावली, पाला, पालेकर |
| २६. | काजल्या | काजळ | काजले |
| २७. | घावडा | एक वृक्ष | घाडसे |
| २८. | आकुवा | रुईचे झाड | आकुवा |

अशा प्रकारची गोत्रे कोरकूत प्रचलित आहेत. बऱ्याचदा या गोत्रांची सरमिसळ होताना दिसते. प्रदेशनिहाय त्यात अंतरही पडत जाते. गोत्रांच्या नावावरुनच कोरकूत आडनावाचे प्रचलन सुरु झाल्याचे

दिसते. पूर्वी आडनाव म्हणून गोत्राचे नावच कोरकू वापरीत होते. आता मात्र ती पद्धत मागे पडून कोरकूंनी स्वतंत्र आडनावे धारण केली आहेत. गोंड, राजपूत, मराठा यांच्या प्रभावातून कोरकूंनी अनेक आडनावे धारण केली आहेत. राजपूतांच्या प्रभावामुळे ठाकूर, चौहान, राठौर अशी आडवाने कोरकूत आढळतात. मेळघाटातील कोरकूही स्वतःला 'रूमा ठाकुर' म्हणवून घेतात. काही लोक आपल्या आडनावासमोर 'कर' लावतात. त्यामुळे तेथेही मराठ्याचा प्रभाव दिसतो उदा. बेठे-बेठेकर, कासदा-कासदेकर, चुथुर-चतुरकर इ. ठाकरे, वानखडे, काळे, मुरले, कस्तुरे, पाटील ही आडनावे मराठयाच्या प्रभावातून कोरकूंनी स्विकारल्याचे दिसते. गोंडाच्या प्रभावातून धुर्वे, किल्लीभूसूम, कास्दे, दारशिमा इ.नावे कोरकूनी स्विकारल्याचे दिसते. कोरकूं आपल्या गोत्राच्या संबंधित वस्तूला शुभ मानतात. त्याला नुकसान पोहचवित नाहीत. अत्यावश्यक असल्यास इतर गोत्राच्या लोकांकडून तोडून घेतात. मात्र, संबंधित झाडाची फळे, फुले मात्र खातात. उदा. टाखेर गोत्राचे लोक काकडीचा वेल उपटत नाहीत पण काकडी मात्र खातात. गोत्राच्या प्रतीक असणाऱ्या वस्तूची पूजा करून बळी देतात. मद्य तर्पण करतात. दिवसेंदिवस येणाऱ्या पिढयांमध्ये मात्र गोत्राविषयी अनास्था वाढत आहे. पण विवाहाचा वेळी मात्र गोत्र हमखास पाहिल्या जाते. एकाच गोत्रात विवाह कोरकून पूर्णपणे निषिध्द आहे. अपवादात्मक परिस्थितीत एखादे प्रकरण घडल्यास तो विवाह कोरकू तोडून टाकतात. त्या परिवाराला जमातीतून पूर्णपणे बहिष्कृत केल्ला जाता. त्यामुळे समगोत्रीय विवाह कोरकूत होत नाहीत. गोत्रा संबंधीची ओळख खूण परिवारातील सर्व सदस्यांना बालपणापासूनच परिचित असते. त्यामुळे ते सहज लक्षात ठेवल्या जाते.

## कोरकू विवाह पद्धती :

### गोनम ब्याव

कोरकू जमातीमधील सर्वात लोकप्रिय व प्रचलित असा हा विवाहाचा प्रकार आहे. यामध्ये मुलाच्या आईवडिलांना वधू मूल्य द्यावे लागते यालाच 'गोनम' म्हणतात. पूर्वी गोनम म्हणून अनेक वस्तू दिल्या जात परंतु आता ते पैशाच्या स्वरूपात देतात. साधारणपणे पाच हजारापासून लाखापर्यंत ही रक्कम द्यावी लागते. एखाद्या कुटुंबात मुलाच्या विवाहाची चर्चा सुरू झाल्यावर मुलीच्या स्थळाचा शोध घेतल्या जातो. लग्न, यात्रा, उत्सव, बाजारहाट याप्रसंगी समाजातील लोकांकडून माहिती घेऊन मुलाचे आई-वडील मुलीकडे निरोप देतात. यामध्ये मध्यस्थाची भूमिका महत्त्वाची असते. अनेकदा चर्चा, बोलणी केल्या जाते. दोन्ही कडील पसंती झाल्यास पंचायतीच्या लोकांची बैठक आयोजित केल्या जाते. यामध्ये आप्तस्वकीय, गावकरी मंडळी समाविष्ट असतात. गोनमाची रक्कम, वस्तुविनिमय पंचासमक्ष ठरविल्या जातो. लग्नाची बोलणी पक्की झाल्यावर त्याची घोषणा पंचायतीत केल्ली जाते. एकमेकांना कुंकू लावल्या जाते. शक्य झाल्यास साक्षगंधाचा कार्यक्रम पार पाडल्या जातो. यथेच्छ मांसाहार व मद्याची मेजवाणी देण्यात येते. विवाहाची तारीख ठरविल्या जाते. कोरकू लग्नासाठी साधारणपणे सोमवार, बुधवार, शुक्रवार हे दिवस शुभ मानतात. काही ठिकाणी मुहूर्त पाहून विवाहाची तिथी ठरविल्या जाते, पत्रिका छापल्या जातात. लग्नाची तयारी बऱ्याच दिवस अगोदर पासून सुरू होते. घराची स्वच्छता, रंगरंगोटी केल्या जाते. बाजाराच्या दिवशी वर-वधूचे कपडे, दागदागिने, इतर

वस्तू घेतल्या जातात. अनेक ठिकाणी लग्नघरी पुरेपुर मद्य काढून ठेवल्या जाते. विवाहसोहळा तीन दिवसाचा असतो. पहिल्या दिवशी मांडव (मंडा) उभारल्या जातो. यात आडजात लाकडाच्या नऊ किंवा सात ठुन्या अंगणात रोवून त्यावर बल्ल्या व हिरवे बासे टाकतात. जांभळाच्या झाडाच्या फांदया त्यावर सावलीसाठी टाकल्या जातात. त्यानंतर सागाच्या लाकडापासून चौपट खांब तयार केल्या जातो. मांडवाच्या मध्यभागी एक खड्डा खोदून त्यात हळद, कुंकू, दिवा ठेवून वराच्या हाताने स्त्रिया गीते गाऊन आनंद व्यक्त करतात. मांडव उभा झाल्यावर त्याखाली पंचाची बैठक बोलाविल्या जाते. त्यात वधूकडे पाठवायच्या सामानाचा गठ्ठा बांधल्या जातो. मद्य, बिस्किट वाटल्या जातात. काही स्त्रिया कुंभारकडे जाऊन मातीचे गंगाळ, भरणे आणतात. यावेळी ढोल, टिमकीच्या साथीने नृत्याचे आयोजन केल्या जाते. काही स्त्रिया वधुकडे पाठवायचा गठ्ठा घेऊन मुठवा देव, बजरंगबलीच्या पूजेसाठी जातात. मुठवा देवाला कोंबडीच्या पिल्लाचा तर बजरंगबलीला शाकाहारी नैवेद्य अर्पण केल्ला जातो. वराला मांडवाच्या दिवशी नेहण्यात न्हाणल्या येत. या दिवशी रात्रभर गादूली-सूसून, देवकुदानाचे नृत्य करून आनंद साजरा केल्या जातो. येणाऱ्या पाहुण्यांना, गावकऱ्यांना जेवण, मद्य दिल्या जाते.

विवाहाचे आयोजन वधूकडे असल्याने दुसऱ्या दिवशी सर्व वरात वधूच्या गावात जाते. जाताना गृहदेव, खेडा देवाची पूजा करण्यात येते. वधूकडे वरातीसाठी एखाद्या शाळेत, सभागृहात व्यवस्था करण्यात येते. वधूचे कपडे तेथे आणल्यावर वराचे आई -वडील त्यांना घेऊन वधूकडे जातात. तेथे वधूच्या पायाला कुंकू लावून तिला कपडे, दागिने चढविल्या जातात. विवाहाचा विधी वधूच्या घरासमोरील मांडवात केला जातो.

वधूकडील स्त्रिया मांडवात एखाद्या चादर किंवा साडीवर कणीक घेऊन दोन चौकोन काढतात. त्यावर कुंकू टाकून पुजा केल्ली जाते. त्यावर दोन पाट ठेवतात. वराची वाजतगाजत मिरवणूक काढव्यात जाते. यावेळी काही भागात वधुची आई वराच्या डोक्यावर लुगड्याचा किंवा साडीचा पदर धरते. वर मांडवात प्रवेश करते वेळी वधूचे आई वडील वराचे पाय धुवून त्याला नवीन जोडा देतात. वर मांडवाच्या ठुन्याभोवती फेरी मारून आपल्या कट्यारीने मांडवाच्या ठुन्यावर वार करतो. वरवधूची करंगळी धरून त्या पाटाभोवती फेऱ्या मारतो. तर काही भागात वरवधूला उचलून मांडवाच्या फेऱ्या मारल्या जातात. काही लग्ने हिंदू विवाहासारखे होतात. कोरकू विवाहाच्या प्रसंगी गादूली-सूसून नृत्याचे आयोजन हमखास केल्या जाते. पारंपरिक विवाहगीते विपूल प्रमाणात म्हटली जातात. लग्नविधी आटोपून संध्याकाळी वरात परत येते. दुसऱ्या दिवशी वर -वधूच्या हाताने गृहदेवाची पूजा केल्या जाते. वरवधू पूर्वेकडे तोंड करून बसतात. उपस्थित स्त्रिया गीते गातात. नंतर काही वयोवृद्ध स्त्रिया  दरवाज्यात पाळणा बांधतात. त्याचा झोका करून त्यात उरोठा ठेवतात. वर-वधू त्यावर पाणी टाकतात. वधू त्या उरोठ्याला पाळण्यावरून फिरवितो. यामागील संकेत असा असतो की, वर-वधूच्या संसार वेलीवर लवकर फूल उमलावे. यावेळी दुसरा एक विधी पुन्हा केल्या जातो. वधू धरातील काही जागा सारवते. काही स्त्रिया तेथे पायलीभर ज्वारी घेऊन येतात. मोकळया जागेत टाकतात. वरवधूला ते पुन्हा पायलीत भरायला लावतात. पायली पूर्णपणे भरल्यास शुभ मानतात तर कमी पडल्यास अशुभ समजतात. दुपारी वरवधू मांडवात बसतात त्यावेळी उपस्थित नातेवाईक त्यांना ओवाळतात. पैसे देतात. त्यानंतर सर्वांना भोजन दिल्या जाते. वधूकडे लग्नानंतर 'मुंडा' भोजन आयोजित केल्या जाते. मांडवात उपस्थित नातेवाईक,

गावकरी मंडळी वर्गणी गोळा करून त्याचा बकरा आणतात. यथेच्छ मद्यप्राशन करून जेवणाचा आस्वाद घेतात.

विवाह झाल्यावर वर वधू पहिल्यांदा येणाऱ्या बाजारात जातात. तेथून बांबूची टोपली, पाटी, सुपडी, झाडू खरेदी केल्या जाते. ते सर्व साहित्य वधू डोक्यावर घेऊन परतते. त्यामुळे नवविवाहित जोडपे सहज ओळखता येते. लग्नानंतर दारात उभारलेला मांडव काढणेही महत्त्वाचे असते कारण तो काढल्याशिवाय पाऊस येणार नाही असा कोरकूंचा विश्वास आहे. भवई सण झाल्यावर नवविवाहित जोडपे पहिल्यांदा आपल्या घराच्या समोरचा मांडव मोडतात. मांडवाच्या मध्यभागी असलेल्या खांबाची पूजा केल्या जाते. मांडवावरील एक डहाळी घेऊन वर-वधू नदीवर जातात. तेथे जलपूजन करून ती डहाळी पाण्यात सोडून देतात. उपस्थित मुलांना खिचडी व खोबऱ्याचा प्रसाद वाटतात. यानंतर दुसऱ्या दिवशी वधूकडील मांडव तोडण्याकरीता जातात. जाताना भातक( मिठाई) घेऊन जातात. तेथे वधू सर्वांना भातके देऊन वराचा परिचय करून देते. तेथील मांडव काढून विवाहाचा विधी पूर्ण होतो. बदलत्या काळानुसार कोरकू विवाह पद्धतीत अनेक बदल घडून येत आहेत. व्यसनाधिनता वाढल्याने बरेचदा लग्नाला उशीर होऊन वाद उदभवतात. त्याचे रुपांतर कधी कधी भांडणामारामारीत होते. काळानुसार पारंपरिक लग्न पद्धतीत बरेच बदल होत असून त्या जागी नव्या गोष्टीचे प्रचलन वाढले आहे. बॅण्डबाजा, सप्तपदी, मंगलाष्टके, कन्यादान, साखरपुडा, हळदी, अक्षता यासारख्या अनेक आदिम संस्कृतीत नसलेल्या गोष्टींचा शिरकाव कोरकू विवाह पद्धतीत झाला आहे. त्यामुळे कोरकू विवाहाचे स्वरूप संमिश्र बनले आहे. पूर्वीच्या टिमकी ढोल वाद्याऐवजी बॅण्ड, ताशे वाजविण्यात येऊ

लागले आहे. प्रवासाकरीता ट्रॅक्टर, काळीपिवळी टॅक्सी, कार चा वापर केला जात आहे. पारंपरिक मुठवा, खेडा देवासोबतच इतर देव गणपती, दुर्गामाता, हनुमान यांची पूजा केली जाते.

**पाटोब्याव** :

पाटोब्याव म्हणजे पुनर्विवाह. कोरकू जमातीत पुनर्विवाहाला पूर्वीपासून मान्यता आहे. एखाधी स्त्री अकाली विधवा झाल्यास किंवा नवऱ्याने टाकून दिल्यास तिला दुसरे लग्न करता येते. ती आपला निर्णय घेण्यास स्वतंत्र असते. ती नवऱ्याच्या कुटुंबातही राहू शकते किंवा दुसरे लग्न ही करू शकते. एखाद्या कुटुंबात गरिबी, दारिद्रय, कलह, व्यसनाधिनता असल्यास स्त्रीचे जगणे असह्य होते. अशावेळी ती स्त्री त्या कुटुंबाला, नवऱ्याला सोडून दुसऱ्या पुरुषासोबत पळून जाते. लग्न करते. मात्र, या बदल्यात तिचा नवीन पती पूर्वीच्या पतीला तिच्या पहिल्या लग्नावेळी दिलेल्या गोनम पैकी अर्धे गोनम देतो. या पाटोब्याव मध्ये काहीही विधी नसतो. पंचायतीत दंड भरावा लागतो. ती स्त्री फक्त तिच्यावर अवलंबून असलेल्या तान्ह्या मुलांना सोबत घेऊन जाते. इतर मुले मात्र पूर्वीच्याच कुटुंबात राहतात.

**लामझना ब्याव** :

कोरकू जमातीत लामझना विवाह हा वैशिष्टपूर्ण विवाहाचा प्रकार प्रचलित आहे. लामझना म्हणजे एखाद्या पुरूषाने आपल्या लग्नाचे वधूमूल्य (गोनम) फेडण्याकरिता सासऱ्याच्या घरी राहून सेवा कार्ये करणे. पूर्वी लामझनाचा कालावधी १२ वर्षांचा होता. आता मात्र तो कमी होत चालला आहे. यात लग्नासाठी

वधूकडील लोकांना गोनम द्यावे लागत नाही त्या बदल्यात तेथे राहून शेतीची कामे, गुरे पालन, घरकामे करावी लागतात. लामझानाचा कालावधी संपल्यावर तो आपला स्वतंत्र संसार मांडू शकतो. सासऱ्याच्या संपत्तीत मात्र त्याला वाटा मिळत नाही. एखाद्या वेळ संबंधित व्यक्तीला पुत्र नसल्यास त्याला संपत्तीत वाटा मिळू शकतो.

**देवरभाभी ब्याव** :

कोरकू जमातीत एखाद्या पुरुषाचे निधन झाल्यास व त्याचा लहान भाऊ लग्नाचा असल्यास त्याच्या विधवा स्त्रीचे लग्न तिच्या मर्जीने दिरासोबत लावून देण्यात येते. मुलांचे संगोपन, संपत्ती मधील वाटा यासारख्या समस्या उदभवू नयेत म्हणून हा मार्ग स्विकारण्यात येतो. शिवाय यात पुन्हा गोनम द्यावे लागत नाही. एखाद्या वेळी वयाचे अंतर जास्त असल्यास ती स्त्री त्या कुटुंबात विधवा म्हणून राहू शकते किंवा माहेरी जाऊ शकते. पहाडी कोरकूत मात्र दिर-भावजयचे नाते आई-मुलाचे मानतात त्यामुळे त्यांचा विवाह करीत नाहीत. याच पद्धतीने एखाद्या पुरुषाच्या पत्नीचे निधन झाल्यास, तिला बहिण असल्यास तिच्यासोबत त्या पुरुषाचे लग्न लावून देतात, यावेळी मुलीच्या वडिलांना पुन्हा गोनम देत नाहीत.

**सहपलायन ब्याव** :

बरेचदा सामाजिक बंधनाच्या पलीकडे जाऊन प्रेम, प्रणय संबंध निर्माण होत असतात. अशावेळी मुलगा-मुलगी समाजाचे नियम तोडून कुटुंबातील लोकांच्या इच्छेविरुद्ध लग्न करतात. यासाठी ते एकमेकांच्या

पसंतीने आपल्या सोयीच्या नातेवाईकाकडे पळून जातात. अशावेळी मुलीकडील मंडळी हा वाद पंचायतीत उपस्थित करतात. पंचायत दोन्ही बाजू समजावून घेऊन निर्णय देते. मुलाला मुलीच्या वडिलांना गोनम दयायला लावते व दंडही करते. मात्र मुलीकडील मंडळींनी विरोधाची भूमिका घेतल्यास मुलगी मुलाच्याच घरी येऊन राहते. मुलाकडील मंडळी योग्य दिवस पाहून त्यांचे लग्न लावून देतात. अशावेळी मुलीच्या वडिलांना गोनम देण्याचा प्रश्नच उरत नाही. बरेचदा अविवाहित मुलगी-विवाहित पुरुष, विवाहित स्त्री-अविवाहित मुलगा, विवाहित स्त्री-पुरुष पलायन करतात. अशावेळी ते गावात परत न येता दुसऱ्या गावात संसार थाटतात.

**घरघुस्सू ब्याव** :

एखाद्या वेळी मुलाशी लग्न करण्यास इच्छूक मुलगी त्या मुलाच्या घरात जबरदस्तीने घुसते. त्या धरातील मंडळींना आपलेसे करण्याचा प्रयत्न करते. यावेळी तिला अपमान, रोष सहन करावा लागतो. सहसा एखाद्या मुलाशी प्रेम झाल्यास, त्याची पळून नेण्याची हिम्मत नसल्यास ती मुलगी हा घर घुसण्याचा निर्णय घेते. हळूहळू राग कमी होऊन ती त्या कुटुंबात मिसळून जाते. या प्रकरणात मुलाला गोनम द्यावे लागत नाही. कुठलाही विधी वगैरे होत नाही. मुलीकडील मंडळीचा अशा विवाहाला विरोध नसल्याने यात अडथळे येत नाहीत.

**अपहरण ब्याव :**

या प्रकारच्या विवाहाच्या पद्धतीत एखाद्या मुलीला तिच्या आईवडिलांच्या इच्छेविरुद्ध पळवून नेल्या जाते. पूर्वी अनेक आदिवासी जमातीमध्ये अशा विवाहाचे प्रचलन होते. परंतु आता कायदे कडक झाल्याने ही पद्धत बंद झाली आहे. मुलगा-मुलगी दोघांचे विचार, प्रेम जुळल्यास ते पळून जातात. मुलीच्या इच्छेविरुद्ध तिला पळवून नेल्या जात नाही. अन्यथा कायद्याने त्याला सजा तर होतेच पण जातपंचायत त्या कुटुंबावर बहिष्कार टाकते. त्या मुळे अशी हिम्मत कुणी करीत नाही.

**आटोसाटो ब्याव :**

अशा प्रकारच्या विवाहाची पद्धत कोरकू जमातीत प्रचलित आहे. विवाह योग्य मुलगा-मुलगी दोन्ही कुटुंबात असल्यास ते आपआपसात स्थळाची अदलाबदल करतात. त्यामुळे एकमेकांना गोनम देण्याची आवश्यकता नसते.

**परीक्षा ब्याव :**

एखाद्या मुलाचे साहस व शक्ती पाहून त्याच्याशी विवाह करणे म्हणजे परीक्षा ब्याव. कोरकू जमातीत अशा पद्धतीने पूर्वी विवाह होत होते परंतु आता ते बंद झाले आहे. रुमा कोरकूत हा प्रकार प्रचलित नव्हता. मोवासी कोरकूत गोंडांच्या प्रभावामुळे हा प्रकार पूर्वी प्रचलित होता. कोरकू जमातीचा महत्त्वाचा सण म्हणजे होळी. होळीच्या दिवसात जेरी तोडणे हा उत्सव अनेक गावात साजरा होतो. गावातीत एखाद्या ठिकाणी

जेरीचा खांब उभा केला जातो. त्याच्यावर नारळ, गुळ बांधल्या जातो. त्या खांबाभोवती स्त्रीपुरुष गोलाकार जमतात. नाचतात, गीते गातात. त्यापैकी काही पुरुष त्या खांबावर चढण्याचा प्रयत्न करतात. सभोवतालच्या स्त्रिया त्याला चढू देत नाहीत. त्याला काठीने मारतात, कपडे फाडतात, केस ओढतात, शरीराचे लचके तोडतात. इतके करूनही एखादा मुलगा त्या नारळ-गुळा पर्यंत पोहचल्यास उपस्थित असलेल्या कोणत्याही मुलीशी लग्न करण्याचा त्याला अधिकार मिळतो. आता मात्र जेरी या उत्सवाचे स्वरूप बदलले आहे. ती आता फक्त एक स्पर्धा बनली आहे. ज्यात अनेक बक्षिसे दिली जातात.

**बहुपत्नीकत्व व बहुपतीकत्व** :

कोरकू जमातीत एकविवाह परिवाराचेच प्रचलन आहे. एकपत्नीत्व, एकनिष्ठतेला महत्त्व असल्याने एकच पत्नी केली जाते. मात्र बरेचदा पत्नीला मुलबाळ नसल्यास दुसरे लग्न केल्या जाते. पूर्वी कोरकू जमातीत बहुपत्नीकत्वाचे प्रचलन होते. मात्र ते आता कमी झाले आहे. बहुपतीकत्व विवाह म्हणजे एखाद्या स्त्रीचे दोन किंवा अधिक पुरुषांशी विवाह. अशा प्रकारचे विवाह कोरकू जमातीत अजिबात होत नाहीत. पूर्वीही याचे प्रचलन असल्याने दाखले मिळत नाहीत.

**विवाह विच्छेद/ घटस्फोट** :

बरेचदा कोरकू जमातीत घटस्फोट दिल्या जातात पण त्यासाठी काही कारणे असणे महत्त्वाचे असते. स्त्रीला मूलबाळ होत नसल्यास, स्त्री-पुरुष चरित्रहिन असल्यास, विवाहबाह्य शारीरिक संबंध दृष्टीस

पडल्यास, कौटुंबिक कलह यासारख्या घटना घडल्यास घटस्फोट दिल्या जातो. पूर्वी जात पंचायतीत घटस्फोट घेतल्ला जात. आता मात्र सरकारी कायद्याने घटस्फोट घेण्यात येतो.

**मरणविधी**

कोरकू जमातीत वृद्धापकाळाने किंवा नैसर्गिक मृत्यू झाल्यास त्याला प्राकृतिक मृत्यू मानतात तर एखाद्या वेळी अपघाती मृत्यू झाल्यास भुतबाधा, कोप, पापाची सजा मानतात. युवावस्थेतील अपघाती मृत्यू झाला तर तो भूत, पिशाच बनून त्रास देतो, असा समज आहे. गावात एखाद्या घरी मृत्यू झाल्यास त्याची बातमी गावात, लवकर पसरते, हळूहळू त्या घराभोवती लोक जमू लागतात. गटागटाने बसतात. कोटवार, पाटील पुढाकार घेऊन नातेवाईकांना निरोप पाठदितो. आता मात्र सर्वत्र गाड्या, फोन, मोबाईलचे प्रचलन वाढल्याने त्याचा उपयोग करतात. गावात सर्वत्र शोकाकूल वातावरण असते. सहसा प्रेताला पुरेपर्यंत गावातील घरात स्वयंपाक केला जात नाही. लहान मुलांना मात्र खायला देतात. मृत व्यक्तीच्या धरात प्रेताजवळ स्त्रिया, नातेवाईक बसून असतात. कपड्याने प्रेत झाकून ठेवतात. कुत्रा, मांजराने ते ओलांडू नये याची दक्षता घेतात. प्रेताच्या बाजूला दिवा लावलेला असतो. सर्व नातेवाईक आल्यावर प्रेताची आंगोळ करतात. त्याला नवीन कपडे घालतात. अंगणात पूर्व-पश्चिम बनविलेल्या बास्याच्या केळीवर किंवा बाजेवर प्रेताला ठेवतात. त्याची पूजा करतात. गुलाल टाकतात. सुवासिनी स्त्री असल्यास तिला हिरवी साडी, पुरुषाला पांढरे कपडे घातल्या जातात. भूमका किंवा पडिहार यावेळी विधी सांगत असतो. तसा विधी केल्या जातो.

नंतर प्रेताला स्मशानाकडे घेऊन जातात. यावेळी घरातील व्यक्ती खांदा देतात. मोठा मुलगा किंवा पती समोर मडक्याचे टिटवे धरतो. वाटेत प्रेताला एका ठिकाणी विसावा देतात. तेथे खिचडा ठेवतात. पारंपरिक रीतिरिवाजानुसार कोरकू प्रेताला जाळत नाहीत तर त्याला जमिनीत पुरतात. स्मशानात किंवा घरच्या शेतात एक उत्तर दक्षिण खड्डा खोदतात. बाजूला प्रेताला ठेऊन खिचडा देऊन त्यावर दारूचे थेंब टाकल्या जातात. नंतर प्रेताचे डोके खडड्यात दक्षिणेला ठेऊन त्यावर माती लोटतात. बरेचदा मीठ टाकतात. प्रेताचा खड्डा दगड, काटेरी फांद्या टाकून झाकतात परत येतात. येताना निंबाचा पाला आणतात. गुळणा करून निंबाचा पाला तोंडात टाकतात. नंतर विहिरीवर, नदीवर जाऊन आंगोळ करतात. त्यादिवशी मरण पावलेल्या व्यक्तीच्या कुटुंबात चूल पेटविल्या जात नाही. शेजारी, गावातील इतर व्यक्ती स्वयंपाक करून त्यांना जेवू घालतात. त्यानंतर येणाऱ्या सोमवारी भूमका पडिहाराच्या सांगण्यानुसार नदीवर जाऊन आंघोळ करतात. देवदेताची पूजा करतात. एखाद्या कोंबडा किंवा बकऱ्याचा बळी देऊन त्याचे रक्त स्मशानातील त्या प्रेताच्या खडड्यावर टाकल्या जाते. तेथील काही दगड माती घेऊन नदीवर जाऊन पाण्यात सोडतात. काही भागात हळकुंडाची पुडी बांधून गृहदेवाजवळ ठेवल्या जाते तर काही भागात गोत्राच्या संबंधित वस्तूभोवती परिक्रमा करतात. परंतु या पद्धती आता कालबाह्य होऊन कोरकू लोक इतरांच्या प्रभावातून दसक्रिया, तेरवी सारखे विधी करीत आहेत. पंगत देऊन फोटोची पूजा करत आहेत. प्रेताला अग्नी देत आहेत. कोरकू जमातीत लग्नाअगोदर लहान वयात मृत्यू झाल्यास त्याला झोळीत नेतात. उत्तर-दक्षिण खड्डा खोदून त्यात प्रेताला पालथे झोपवितात. त्यानंतर मातीने ते झाकून टाकतात. सुवासिनी स्त्रीचे मरण शुभ समजतात. मरणानंतर

एखाद्या कोंबड्याचा, बकऱ्याचा बळी देऊन आत्म्याची शांती केली जाते.

**सिडोली संस्कार (फूलजागनी)**

एखाद्या कुटुंबातील व्यक्तीचा मृत्यू झाल्यास त्याच्या मृत्यूपासून चार ते पाच वर्षाच्या आत सिडोली, फूलजागनी (फूल म्हणजे आत्मा) नावाचा कार्यक्रम करतात. या दोन्हीचे स्वरूप सारखे आहे. सिडोलीची तिथी त्या घरातील व्यक्तीच्या इच्छेनुसार ठरविली जाते. त्या दिवशी नातेवाईक, आप्तस्वकीय, गावकरी मंडळींना निमंत्रित केल्या जाते. घरासमोर मंडप उभारतात. सर्व मंडळी एकत्र ऐऊन मृताच्या समाधीवर जातात. ते पीठापासून लहान मूर्ती तयार करतात. त्याच्या मृत्यूवेळी गृहदेवाजवळ बांधलेल्या हळकुंडांची पुडी सोडून त्याची पूजा करतात. त्याला कोदो, कुटकी, अंडा, दारुचा नवैद्य दाखवितात. गांजा, दारु पितात. त्यानंतर सर्व जण नदीवर जाऊन आंधोळ करून परत येतात. नदीवरून येताना मृत व्यक्तीच्या नावाने एक दगड आणतात. यावेळी पाण्यात डुबकी मारून कोणता दगड घ्यावा ? या बाबत भूमका मार्गदर्शन करतो. त्या रात्रीत मध्यरात्रीपर्यंत ढोल वाजवून नृत्य केल्या जाते. मध्यरात्री नंतर मात्र एकदम ढोलाची धून बदलते व नृत्याचा प्रकारही बदलतो. सर्व उलट्या पद्धतीने केले जाते. उलटे गाणे, उलटी पूजा, उलटी भाषा बोलल्या जाते. एकमेकांना शिव्या दिल्या जातात. स्त्रिया पुरुष सिडोलीचे गीते गातात. वाईट संबोधतात. मृतात्म्याच्या नावाने अश्लील शिव्या देतात. दुसऱ्या दिवशी काही लोक जंगलातून एक चौपट लाकडाचा तुकडा आणतात. त्याची पूजा करतात. त्याला चौरस बनवून त्यावर चंद्र, सूर्य, घोडा, हत्ती इ. प्राण्यांची चित्रे कोरतात. त्याही

रात्री नृत्य, मद्यपान, भोजन असते. त्या लाकडी चौकटीला गरम पाण्याने धुवून हळद लावतात. त्याची पूजा करतात. त्यावर कोंबडी बकऱ्याचा बळी देऊन उभा रोवतात. त्याला मुंडा म्हणतात. काही भागात त्या व्यक्तीची मूर्ती बनवू त्याची स्थापना करतात. त्यावर घरासारखे छप्पर तयार करतात. नंतर येणाऱ्या सण, उत्सव, पेरणी, लग्नादी कार्ये प्रसंगी त्या मुंडाची पूजा अर्चा केल्या जाते. विशेष करुन अखातिजला (अक्षयतृतीया) मुंडाची पितरपूजा केल्या जाते. आपल्या पूर्वजा विषयीची ही विशेष आस्था कोरकू जमातीत वैशिष्टपूर्ण आहे. परंतु काळानुसार या प्रथेचे स्वरुप बदलत आहे किंवा काही भागातून हा विधीच नाहीसा होत आहे. नवीन पिढीचा याकडे पाहण्याचा दृष्टिकोनही बदलत चालला आहे. कोरकूच्या प्रदेशात ठिकठिकाणी जुन्या काळातील मुंडाचे अवशेष, मंदिरे, मृत्यार्ग भग्नावस्थेत उभ्या आहेत.

**कोखरा संस्कार (चोखाडा) :**

कोरकू जमातीत एखाद्या व्यक्तीला जातीतून बाहेर निष्कासित केल्यास त्याला परत जातीत घेण्यासाठी किंवा समगोत्रिय विवाह झाल्यास त्याते गोत्र बदलविण्यासाठी कोखरा किंवा चोखाशी संस्कार केल्या जातो. याशिवाय एखाद्याने वाईट काम केल्यास, तुरुंगात गेल्यास, गोहत्या, मांजर मारल्यास, एखाद्याच्या अंगात किडे पडल्यास कोखरा संस्कार करतात. यामध्ये संबंधित व्यक्तीला अग्निपरिक्षेतून जावे लागते. कोरकू जमातीमधील मुलाने एखादया आंतरजातीय मुलीशी लग्न केल्यास त्याला कोखरा संस्कार करावा लागता. म्हणजे त्या मुलीला कोरकू जमातीत विधीवत घ्यावे लागते. भूमका, पडिहाराच्या सल्ल्यानुसार हा विधी

करतात. याकरिता सदर कुटुंबातील व्यक्ति नदीवर जातात. तेथे नदीच्या पात्रात सात झरे बनवितात. हे सात झरे म्हणजे सात जन्माचे प्रतीक मानतात. त्या झऱ्यांमध्ये अंडे, गोमतीर, तुळशीपाने, दूध, बेलपाने, कुंकू, नारळ हे साहित्य ठेवल्या जाते. पूजा असल्याने या विधीला पवित्र मानतात. भूमका किंरा पडिहाराच्या मार्गदर्शनाता हा विधि केला जातो. घरी आल्यावर पंचपक्वान, भात, घाट, पुरीचे जेवण बनविल्या जाते. म्हणजेच वर वधूला शुद्ध केल्या जाते. या मधील दुसरा प्रकार म्हणजे कोरकू जमातीमध्ये एखादया वेळेस गोत्रागोत्रातच शारीरिक संबंध प्रस्थापित होऊन लग्नासारखा प्रसंग घडल्यास त्या मुला-मुलीपैकी एकाचे गोत्र बदलविल्या जाते. त्यासाठी त्या दोघांनाही एका झोपडीत बंद केल्या जाते. त्याला आग लावून त्या दोधांना त्यातून काढल्या जाते. भस्म होण्याचा हा प्रकार मानतात. त्या दोघांच्या अंगावर नदीचे पाणी, गोमंतीर दूध, बेलपान, तुळशीपाने टाकल्या जातात. गृहदेवाची व गावातील खेडा-मुठवाची पूजा केल्या जाते. गावातील पंचमंडळी, नातेवाईक यावेळी हाजर असतात. मांसाहारी किंवा शाकाहारी जेवण, दारु दिल्ला जाते. पंचायतीत दंड भरल्या जातो. त्यामुळे गोत्राचे परावर्तीत होणे सर्वजण मान्य करतात. हा चोखडा किंवा चोखाशी संस्कार पहाडी कोरकूत प्रचलित नाही. गांगडा, निमाडी परिसरात याचे प्रचलन आहे. परंतु आता काळानुसार या संस्काराला कुणी फारसे करीत नाहीत. नवी पिढी तर याबाबत अनभिज्ञच असल्याचे दिसते.

**कोरकूंचे धार्मिक जीवन** :

आदिवासींचे धार्मिक जीवन हे संमिश्र स्वरुपाचे आहे. ते स्वत :ला हिंदू मानत असले तरी त्यांच्या अनेक

देवता हिंदूपेक्षा वेगळया आहेत. त्यांच्या रूढी, रीतिरिवाज, उपासना पद्धती वेगळया आहेत. निसर्गातील विविध घटकांना त्यांनी देवत्व बहाल केले आहे.

**कोरकूच्या देवदेवता :**

कोरकू बोलीत गोमोज म्हणजे देव. कोरकूच्या देव परिवारात अनेक देव आहेत. डोंगरदऱ्यात, कष्टाचे, कठीण परिस्थितीत जीवन जगणारे कोरकू सामूहिक जीवन पद्धतीत अधिक विश्वास ठेवतात. एकमेकांप्रती आपुलकी, जिव्हाळा, मदतीची भावना, संकटाशी एकत्रित मुकाबला करण्याची वृत्ती तेथील माणसाला जगण्याचे बळ देते. निसर्गातील अनेक गोष्टीशी त्यांचा नित्य संघर्ष चाललेला असतो. त्यातूनच देवाला शरण जाण्याची वृत्ती वाढत जाते. अनेक घटकांना देवत्व बहाल केल्या जाते. देवाची पूजा-अर्चा केल्याने ते प्रसन्न होतात. कृपादृष्टी ठेवतात. नैसर्गिक आपत्ती, रोगराई, बिमाऱ्या, संकटे, भूत, प्रेतबाधा यांच्या पासून देवताच संरक्षण करतात. त्यांना नवस केल्याने सुखसमृद्धी, अपत्यप्राप्ती, गुराढोरांचा संकटापासून बचाव होतो. देवाचा कोप झाल्यास संकटे, बिमाऱ्या, भूतप्रेत बाधा, आपत्ती येतात, मानवी जीवन संकटात सापडते असा कोरकूंना विश्वास असतो. कोरकूंच्या धार्मिक जीवनात भूमका, पडिहार यांची भूमिका महत्त्वाची असते ते पुरोहिताचेच कार्य करीत असतात. विविध सण, उत्सव, विधी, यात्रा, नवस याप्रसंगी देवदेवताची पूजा-अर्चा करण्याची जबाबदारी त्यांच्यावर असते. त्यांचे पद वंशपरंपरागत असते किंवा एखादा जाणकार व्यक्तीही ते पद घेऊ शकतो. कोरकू मंत्रतंत्र, जादूटोणा, शकून-अपशकून यावर मोठा विश्वास ठेवतात. त्यामुळे याबाबतही

भूमका, पडिहाराचीच मदद घेतली जाते. कोरकू देवांच्या पूजेकरीता कुंकू, शेंदूर, नारळ, खारका, लिंबू, कणिक वापरतात तर खिचडी, अंडे, शिरा, पुरी यांचा ते नैवद्य चढवितात. बकरा, कोंबडा, डुक्कर याचा ते नवस देतात.

**मुठवा आणि खेडा देव** :

कोरकूंच्या गावात काही स्थानिक देव असतात. त्यापैकी प्रमुख देव असतो मुठवा. मुठवा म्हणजे गावाचा निर्माता, मालक. गावाच्या मध्यभागी एखाद्या झाडाखाली, ओट्यावर या देवाचे वास्तव्य असते. लहान, मोठ्या दगडांनी मिळून मुठवा बनतो. यात दगडाची संख्या निश्चित नसते. गावाचा संरक्षण कर्ता म्हणून या देवाकडे पाहिल्या जाते. गावातील सर्व घटकांच्या संरक्षणासोबत सुख समृद्धी नांदावी, रोगराई, आपत्ती पासून बचाव व्हावा, म्हणून मुठवा देवाची पूजा सर्वप्रथम केल्ली जाते. सण, उत्सव, नवस, लग्न, समारंभ अशाप्रसंगी मुठवा देवाची विशेष पूजा-अर्चा कोरकू लोक करतात. त्यासमोर नवस फेडतात. त्याला शाकाहारी-मांसाहारी दोन्ही नैवेद्यासोबत मद्याचे तर्पणही करतात. सर्वाचा तारणहार म्हणून मुठवा देवाकडे पाहिल्या जाते. गावापासून थोड्या अंतरावर खेडा देवाचे वास्तव्य असते. परगावातील आत्मा, भूतप्रेत, नैसर्गिक आपत्ती यांचा अटकाव खेडा देव करीत असतो. गावाच्या उत्तरेला असणाऱ्या खेडादेवा जवळ बोकडाचा नवस देतात, जेणे करून त्या हंगामात चांगला पाऊस पडावा. सर्वत्र सुखसमृद्धी होऊन सर्वाचे भरणपोषण व्हावे, ही त्यामागील भावना असते. कोरकू हे विशेष करून आत्मवादी असल्याने आत्मा, पुनर्जन्म

यावर त्यांचा विश्वास आहे.

**गृहदेव आणि गोत्र देव** :

कोरकूंच्या गावातील मुठवा देवानंतर घरात गृहदेवाचे वास्तव्य असते. घराची निर्मिती करताना मध्यभागी जो खांब असतो त्या जवळच गृहदेवाची स्थापना करतात. काही दगड, त्याबाजूला त्रिशूल किंवा चाकू ठेवल्या जातो. लाल कपड्याच्या अंथरुणावर ह्या देवाला ठेवतात. काही ठिकाणी बाजार यात्रेतून आणलेल्या छोट्या मूर्त्याही ठेवल्या जातात. त्यासमोर दिवा लावण्यासाठी मातीची उजळणी ही ठेवलेली असते. कुटुंबातील व्यक्तीला काही बिमारी अथवा इतर काही समस्या उदभवल्यास गृहदेवाचा सगूण पाहिल्या जातो. वेळोवेळी किंवा सण, उत्सव, लग्न प्रसंगी गृहदेवाची पूजा केली जाते. पूर्वजांच्या आत्म्याचे प्रतीक म्हणूनही गृहदेवाकडे पाहिल्या जाते. अनेकदा गरिबी दारिद्रयात खितपत पडलेल्या कुटुंबामध्ये गृहदेवाविषयी अनास्था दिसून येते. कोरकू जमातीत गोत्र पद्धतीला विशेष स्थान आहे. प्रत्येक कुटुंबाचे गोत्र वेगळे असते. त्या गोत्राची विशेष खूण लिंवा ओळख असते. त्याला गोत्राच्या खुणेला त्या कुटुंबातील व्यक्ती देवत्वा समान मानतात. आपल्याकडून त्या गोष्टीला हानी पोहचू नये अशी त्यांची भावना असते. एखाद्या अपवादात्मक परिस्थितीत जर ती गोत्रासंबंधी वस्तू किंवा खूण तोडायची किंवा मोडायची असेल तर इतर गोत्राच्या व्यक्तीकडून ते कार्य करण्यात येत. लग्न, सिडोली अथवा काही विशेष प्रसंगी गोत्र गोमोजाची पूजा केल्या जाते. कुटुंबाचे स्थलांतर झाल्यास त्यांचा गृहदेव ज्या गावात असेल तेथे किंवा गोत्राचे मूळ असलेल्या ठिकाणी

पूजा-अर्चा करण्यसाठी कुटुंबातील सदस्य आवर्जून जातात.

**देवीपरिवार किंवा मातृदेवता :**

कोरकू ग्रामात अनेक देवींची पूजा केल्या जाते. प्रत्येक गावात हनुमानाचे मंदिर निश्चितपणे सापडते. दक्षिण दिशेला मुख असणाऱ्या हनुमानाच्या बाजूलाच सीतला मातेची मूर्ती आढळते. बडी माय, छोटी माय, बंजरीन माय या देवींची विविध स्थाने कोरकू गावाच्या आसपास असतात. रोगांच्या साथी, बिमाऱ्या, महामारी यासारख्या संकटापासून बचावाकरिता वरीले देवींची वेळावेळी पूजा केली जाते. गावातील बडी-पूजेच्या वेळी तर या सर्व देवींना आरती देऊन गावाचा पाटील सर्वाच्या आरोग्यासाठी प्रार्थना करतो. छठी माय, शीतला माता बाळंतीण स्त्रिया व लहान मुले यांच्या देवी म्हणून प्रसिद्ध आहेत. बंजरीन माय जंगलात चरणाऱ्या गुरे ढोरांची देवी म्हणून ओळखल्या जाते. कोरकूंच्या या मातृदेवता नवसाला पावणाऱ्या असून त्यातील अनेक देवींना बोकडाचा नवस दिल्या जातो. या मातृदेवतांमध्ये स्वग्रामा व्यतिरिक्त इतरही भागातील देवीचा समावेश होतो. बैराट माता (वैराट), अंबा माता (अमरावती), चिखल्डा माता (चिखलदरा), भवानी माता (मुऱ्हा), मुलताई देवी, मोती माता (लोखंड्या, टिटंबा) या बाहेरील परिसरातील देवी असून अनेक कोरकूंच्या त्या कुळदैवत म्हणूनही प्रसिद्ध आहेत. याखेरीज पूर्णा मॉ, तापी मॉ, नर्मदा मॉ या नदयानांही कोरकू लोक श्रद्धेने पूजतात. अलीकडच्या काळात अनेक गावात नवरात्रात दुर्गा मातेचीही प्रतिष्ठास्थापना केली जाते. मध्यप्रदेशातील अनेक जिल्ह्यात लक्ष्मी जगार, तिजा जगार यांचे विधी करून लक्ष्मी देवीची पूजा-

अर्चन केल्ली जाते.

**निसर्ग-सृष्टीतील देवता :**

धरती-आकाश, चंद्र-सूर्य यांना कोरकूंनी देवत्व बहाल केले आहे. धरती म्हणजे जीवन. तिच्या भरवशावरच मानवाचे जीवन अवलंबून असते. धरतीला ते मातेसमान मानतात. आकाश म्हणजे बाप. तो पाऊस पाडतो. त्यामुळे पृथ्वीवरील सर्व जीवांचे भरणपोषण होते. आदिवासींचे तर जीवनच निसर्गाच्या सानिध्यात असते. सूर्याचे तेज, चंद्राची शीतलता यांचा संबंध ते जीवाच्या आत्म्याशी जोडतात. सूर्य निघाला की अंधार नष्ट होतो. सृष्टी उजळून निघते. अंधारातील भुत-प्रेतासारख्या गोष्टी नाहीश्या होतात. चंद्राच्या शीतलतेमुळे मानवाला शांती लाभते. त्यामुळेच त्यांनी आपल्या लग्न प्रसंगासोबतच फूलजागनी सारख्या आत्म्याला शांती देणाऱ्या विधीत चंद्र-सूर्याला विशेष महत्त्व दिले आहे. मांडवातील खांब, सिडोलीचा मुंडा या दोन्हीवर ते चंद्र-सूर्याच्या आकृत्या कोरतात. बरेचदा या देवदेवतांच्या प्रतिमा लाकडावर कोरल्या जातात. डोंगरदेव कोरकूंचा एक देव आहे. दऱ्याखोऱ्यात जीवन जगणारी ही जमात पूर्वीपासूनच डोंगरावर अवलंबून आहे. त्यामुळे त्याविषयीची श्रद्धा त्यांच्या मनात पाहावयास मिळते. जंगल आणि कोरकूंचा अतूट संरक्षण व्हावे म्हणून कोरकू बाघदेव, डोलारबाबा या देवांची पुजा-अर्चा करतात. आखाडी सण व पोळ्याला आखाडी देव, नागपंचमीला नागदेवता, जिरोतीला कोठा गोमोज यांची पुजा केली जाते. सालई, गुल्लेर, बेल, जांभूळ, पिंपळ, वड, शमी, आपटा या वृक्षांची कोरकू पूजा करतात. आदिवासी हा निसर्गाचा उपासक आहे. ते

कपोलकल्पीत देवदेवतांना मानत नाहीत तर वस्तुनिष्ठ निसर्ग व आपल्या वंशजांना देव दैवत मानते हे आदिवासी संस्कृतीचे वैशिष्ट्य आहे.

**महादेव व इतर देवता :**

महादेव कोरकूंचे आराध्य दैवत आहे. कोरकूची उत्पत्तीच महादेवामुळे झाली असल्याने त्याविषयी त्यांच्या मनात निस्सीम श्रद्धा आहे. महादेवाच्या अनेक कथा, गीते त्यांच्या लोकवाङमयात सापडतात. पंचमढी येथील बडा महादेव, बहिरम येथील भैरमबाबा, धारगडचा महादेव, ओंकारेश्वरचे शिवलिंग कोरकूचे आवडते श्रद्धास्थान आहे. याशिवाय रावण, मेघनाथ, कुंभकर्ण यांच्याविषयी ते श्रद्धा बाळगून आहेत. रावणाची ते प्रत्यक्ष पूजा करीत नसले तरी त्याच्या विषयीच्या श्रदधा अनेक कोरकू लोकगीतातून व्यक्त होतात. कोरकूंच्या परिसरात कुठेही रावणाचे स्थान किंवा मंदिरे दिसत नाही तरी पण होळीच्या सणात अनेक गावात मेघनाथाची यात्रा भरते. तेथे मेघनाथ पूजा केल्या जाते. दसरा सणाला रात्रभर जागून ते कुंभकर्णाला जागे करण्याचा प्रयत्न करतात. हेला कापून त्याचे रक्त शिवारभर सांडले पाहिजे, म्हणून त्याची प्रदक्षिणा घडवून आणतात. जेणे करून धरती प्रसन्न होऊन पीक चांगले आले पाहिजे, हा भाव त्यामागे असतो. याशिवाय कोरकूंच्या गावात भिलटदेव, अखाडीदेव, खिटीदेव, शीतलामाता, छटीमाता आदीची पूजा केली जाते. या देवांची मंदिरे नसून त्यांचे ठिकाण एखाद्या झाडाखाली किंवा ओटयावर असते. दरवर्षी आषाढ महिन्यात या देवांची वार्षिक पूजा केल्या जाते. या दिवशी गावातील सर्व व्यवहार बंद असतात. कुणीही

शेतात काम करती नाहीत. अवजारे चालवित नाहीत. महिला दळत नाहीत. गावाचा पाटील सपत्नीक सर्व देवतांची पूजा करतो. गावावर कुठलेही आरिष्ट येऊ नये, रोग, महामारी, कोप होऊ नये यासाठी या देवतांची आराधना करतात. या पूजेला काही भागात बडीपूजा असेही म्हणतात. कोरकू स्वतःला हिंदू धर्मीय म्हणवत असल्याने राम, कृष्ण, हनुमान, दुर्गा, गणपती सारख्या हिंद देवदेवतांची ते पूजा करतात. निमाड, मेळघाट या परिसरातील अनेक कोरकू संत ब्रम्हगीर व संत सिंगाजी यांचे भक्त आहेत. या दोन्ही संताच्या विचारांचा तेथील जनमानसावर मोठा प्रभाव आहे. याच प्रेरणातून निमाडी लोकभजन गावागावात गायिल्या जातात. या गीतांची रचनाही सोपी, सरळ, गेय असल्याने कोरकू ग्रामात अनेकांना ही गीते मुखोद्गत आहेत. आदिम संस्कृतीचे वेगळेपण कोरकू निष्ठेने जपत आले आहेत. मात्र काळाच्या ओघात या आदिम संस्कृतीवर हिंदू संस्कृतीचा प्रभाव मोठ्या प्रमाणावर पडत चालला आहे. नवरात्री, गणेशोत्सव, दुगोत्सव याचे प्रचलन वाढत चालले आहे. काही लोक सैलानीची पूजा करू लागले आहेत. त्यामुळे कोरकूंच्या देवतांची संख्याही वाढत आहे. शहरी भागाच्या संपर्कातील कोरकू अनेक नव्या नव्या देवतांची पूजा, सत्संग करू लागले आहेत. त्यामुळे पूर्वीच्या पारंपरिक देवाची जागा नवीन देव घेत असल्याने कोरकूंच्या धार्मिक जीवनात उलथापालथ होत आहे.

**देव कुदाना व तीर्थयात्रा :**

कोरकू गावामध्ये चैत्र महिना, दसरा, अमावास्या व पोर्णिमेला अनेकांच्या अंगात देव येतात. अनेक

वाद्ये, देव गीते गाऊन त्यांची पूजा केली जाते. त्याला देवकुदाना म्हणतात. प्रत्येक गावात काही तरी जाणकार लोक असतात. त्यांच्या अंगात ही देवाची सवारी येते. भूमका, पडिहार यांचाही त्यात समावेश असतो. अंगात भगवे वस्त्र, हातात केसाची दोरी घेऊन हे लोक पारंपरिक वाद्यावर नाचत असतात. उड्या मारणे, आरोळी ठोकणे, छातीही ते ठोकून घेतात. वेगवेगळ्या देवांची चिन्हात्मक भाषा ते वापरतात. एखाद्या जाणकार व्यक्तीकडून इतर लोक ती भाषा,खाणाखूणा समजून घेतात. प्रत्येक देवाचा शिष्य परिवार ठरलेला असतो. ते सर्व शिष्य अशा धार्मिक आयोजनाप्रसंगी हमखास हजेरी लावतात. अनेक रोग, बिमाऱ्या यावरही इलाज केल्या जातात. कान फुंकुन पानाचा विडाही दिला जातो. बरेचदा लोकांना झालेली भुत-प्रेत बाधा दूर केली जाते. अपत्यप्राप्ती, दु:ख निवारण यासाठी नवस केले जातात. ज्या लोकांना फायदा झाला आहे, असे लोक यावेळी आपले नवस फेडतात. लहान मुलांना त्यांच्या ओट्यात टाकतात. पूर्णायात्रा, ताप्ती यात्रा यामध्ये तर नवसाच्या मुलांना पाळणा करून पाण्यात सोडतात. कणकेचा शिरा, खोबरे यासारखा प्रसाद वाटला जातो. दूरवरून, अनेक गावातील कोरकू लोक अशाप्रसंगी हमखास हजेरी लावतात.

कोरकूंचे अनेक तीर्थक्षेत्रेही आहेत. ओंकारेश्वर, पंचमढी, बहिरम, मोतीमाता, गुपीतोडा सारख्या ठिकाणी ते तीर्थयात्रेला जातात. लोकांचे समूहचे समूह तीर्थयात्रा सामूहिक स्वरूपात करतात. जंगलात जेथे जुने पाणी (डोह) असेल ती जागा कोरकू पवित्र मानतात. तेथे दसरा, नवरात्र, अखातिज, अमावास्या-पोर्णिमा प्रसंगी जातात. रात्रभर जागतात. पाण्यात डुबकी मारुन शुद्ध होतात. तेथे नवस करतात. भूमका सांगेल त्याप्रमाणे पूजा-अर्चा केल्या जाते. अनेक कोरकू कुटुंबांची अशी स्थळे ठरलेली असतात. अशाप्रकारचे

विविधतेने नटलेले व वैशिष्टपूर्ण प्रथा, परंपराचा समावेश असलेले कोरकूचे देवताविश्व आहे.

**कोरकू जमातीच्या लोकांचा आहार :**

कोरकू शाकाहारी व मांसाहारी अशा दोन्ही प्रकारचा आहार घेतात. कोरकूंचा मुख्य व्यवसाय शेती हा असल्याने शेतात पिकणाऱ्या धान्याचा ते दैनंदिन आहारात उपयोग करतात. कोरकू लोकांच्या शेतीमध्ये मुख्यत्वे कुटकी, सावऱ्या, धान, भादली, कोदा हे पिकते. त्यामुळे यांचा आहारात ते उपयोग करतात. कोदो, मोहाची फुले यांचेही ते सेवन करतात. स्वस्त धान्य दुकानातून मिळणाऱ्या गहू, तांदुळ यामुळे त्यांचा आहार बदलला आहे. जंगलात मिळणारे कंद, फूले, फळेही ते खाण्यासाठी वापरतात. प्रत्येक घरात एका कोपऱ्यात चुलीवर स्वयंपाक केल्या जातो. त्याची जबाबदार सर्वस्वी स्त्रीची असते. सकाळी शेतात जाण्यापूर्वी किंवा शेतात गेल्यावर न्याहारी केल्या जाते. यामध्ये रात्रीचे उरलेले अन्न किंवा सकाळी बनलेले भाजी, भाकरी, खिचडी घेतल्या जाते. सायंकाळी पुन्हा स्वयंपाक बनवून आहार घेतल्या जातो. लहान मुले, म्हातारी माणसे घरी असल्यास त्यांना घरी अन्न ठेवल्या जाते. खिचडी हा कोरकूचा आवडता पदार्थ आहे. सण, उत्सवाप्रसंगी घरात पुरी, भाजी, शिरा यासारखे काही गोड पदार्थ बनविले जातात. पूर्वी कोरकू मांसाहाराकरिता जंगलातील शिकारीवर अवलंबून होते. आता मात्र शिकारीवर पूर्णपणे बंदी असल्याने तो मार्ग बंद झाला आहे. बाजारहाट, जत्रा, सण अथवा विशेष प्रसंगी कोरकू मांसाहार घेणे पसंत करतात. अनेकदा सण उत्सवाप्रसंगी गावात सामूहिक बोकूड कापलाया जातो. त्याचे समान हिस्से करून सर्वांना वाटून देतात. अनेकदा

बाजारातून मांस, मासे आणल्या जातात. नदी किनाऱ्यावरील गावात नदीत मासे, खेकडे, झिंगे पकडलया जातात. अनेकांच्या घरीच कोंबड्या पाळल्या जातात. त्याची अंडी, प्रसंगी मांस हे त्यांना घरीच उपलब्ध होते. मांसाहार घेताना दारु च हमखास सेवन करतात जाते. अनेकदा गावात सामूहिक जेवणाचे  आयोजनही केले जाते. साऱ्या गावातील लोकांबरोबरच नातेवाईक त्यात सहभागी होतात. कोरकूंच्या जीवनात दारुला अतिशय महत्त्व आहे. कोणताही सण, समारंभ, उत्सव दारुशिवाय साजरा केलाया जात नाही. जंगलात सहज मिळणाऱ्या मोहाच्या फुलापासून घरीच दारु बनविल्या जाते. गावातील नदीच्या पात्रात, डोहाजवळ लपूनछपूनही दारुच्या भटट्या असतात. अनेक गावात देशी दारुची दुकाने निघाल्याने त्याचाही फायदा घेतल्या जातो. कोरकू पुरुषच नव्हे तर स्त्रिया व मुलेही दारुचे सेवन करतात. बरेचदा उधारीतही दारु पिली जाते. बाजाराच्या दिवशी किंवा पीक आल्यावर त्याचे पैसे फेडलया जातात. विपरित परिस्थितीत जीवन जगत असताना दारुच त्यांना बळ देते. बरेचदा दारुचे दुष्परिणाम होताना दिसतात. बाजारहाट, सण, लग्न यात तर दारुशिवाय भागत नाही. कोरकू  जसे शाकाहारी मांसाहारी आहार घेतात तशीच दारुही त्याच्या आहारातील महत्त्वाचा घटक असतो. गरिबी, दारिद्र्य, निरक्षरता, अनारोग्य यामुळे बरेचदा पुरेशे अन्नही कोरकूंना मिळत नाही. उपासमार होते. अशा स्थितीत लहान मुले, गरोदर माता यांच्या आरोग्यावरही त्याचे दुष्परिणाम घडून येतात. आदिवासी भागातील कुपोषणाचे हे एक महत्त्वाचे कारण आहे.

**कोरकूची शेती व जमीन :**

आदिवासींच्या जीवनाचा मुख्य आघार शेती हाच आहे. पूर्वी आदिवासी शिकार, कंदमूळे, फळे यावरच आपला उदरनिर्वाह करीत असत. पण आता शिकारीवर बंदी आल्यामुळे व त्यांची जंगलभ्रमंती कमी झाल्यामुळे त्यांचा मुख्य व्यवसाय शेती हाच बनला आहे. आदिवासींची शेती अतिशय कष्टाची व पूर्णपणे निसर्गावर अवलंबून आहे. फार कमी प्रमाणात बागायती शेती आदिवासी करतात. आदिवासी कोरकू जमातीमध्ये काळाच्या ओघात बरीच स्थित्यंतरे झाल्याचे दिसते. त्यानुसार त्यांच्या जीवन पद्धतीवर व व्यवसायावर त्याचा परिणाम झाल्याचे निदर्शनास येते. पूर्वी कोरकू भटक्या अवस्थेत स्थानांतरित कृषी करीत असत. जंगलात फिरून शिकारीवर त्यांचा उदरनिर्वाह असायचा. डोंगराच्या कपारीत, गवताच्या झोपड्या त्यांचे निवाऱ्याचे साधन होते. पुढे जंगलातील सपाट व सुपीक जमिनीच्या सभोवती यांनी छोट्या छोट्या गावांना बसवून स्थायिक होणे सुरु केले. थोड्याफार प्रमाणात पशुधन, कुक्कुटपालन ते करू लागले आहेत. जंगलभ्रंमती, शिकार, शेती यावरच कोरकूंचा उदरनिर्वाह चालत होता. गरजा कमी होत्या त्यामुळे बाहेरच्या गोष्टीवर ते अवलंबून नसायचे. जे मिळेल ते घेऊन जगणे, हाच त्यांच्या जीवनाचा मूलमंत्र होता. १८५६ साली निजामाने हा प्रदेश इंग्रजाच्या ताब्यात दिला. हा प्रदेश ताब्यात आल्यावर इंग्रजांचे लक्ष येथील वनसंपदेवर गेले. त्यामुळे त्यांनी या परिसरात प्रशासन व्यवस्था, रस्ते, पूल यांची निर्मिती केली. स्वतंत्र वनखात्याची निर्मिती केली. त्यामुळे आदिवासींच्या मुक्त संचारावर बंदी आली. इंग्रजांनी येथील लाकडाचा व्यापार चालू केला. त्यातून कोरकूंना थोडाफार रोजगार मिळू लागला. त्यातून दळणवळणाची साधने, प्रशासनव्यवस्था

निर्माण केली. यामुळे कोरकूंचा बाह्य जगताशी संपर्क वाढू लागला. वनखाते, रेल्वे, न्यायव्यवस्था यामुळे कोरकूंच्या सामाजिक, आर्थिक, पारंपरिक जीवनात बदलांना प्रारंभ झाला. मात्र, बहुतांश कोरकू या प्रकियेपासून अनभिज्ञ होते. इंग्रजानी शिकारीवर बंदी आणल्याने कोरकूंची जंगलभ्रमंती कमी होऊ लागली. तेव्हा त्यांनी शेतीवर लक्ष केंद्रीत केले. हा प्रदेश जास्त पावसाचा असल्याने कोदो, कुटकी, जगनी, धान यासारखी पिके घेतली जात होती. या प्रदेशातील जमीन ही पहाडी, मुरमाड व हलक्या प्रतीची असल्याने या पिकांशिवाय पर्याय नव्हता. कोरकूंची शेती ही पूर्णपणे पारंपरिक स्वरूपाची होती. पिकलेले काही धान्य खाण्यासाठी ते वापरित तर काही इतर वस्तुविनिमयसाठी उपयोगात आणल्या जात होते. पैशाचे प्रचलन फारसे नसल्याने सर्व व्यवहार वस्तुविनिमयाद्वारेच होत होता. ज्यांच्याकडे शेती नव्हती ते इतरांच्या शेतीवर मोलमजुरी करीत असत. शेती व्यवसायाबरोबर कोरकू जंगलातील मध, चारोळी, कंदमुळे, मोहाची फुले, फळे गोळा करून त्याचा उपयोग दैनंदिन जीवनात करीत होते. गरिबी, दारिद्र्य, उपासमार यासारख्या असंख्य समस्या त्यांच्या समोर उभ्या होत्या. या शिवाय नैसर्गिक आपत्तीमध्ये अतिवृष्टी, पूर, रोगराई यासारख्या समस्यांनाही त्यांना नेहमी तोंड दयावे लागे.

स्वातंत्र्योत्तर काळात आदिवासींच्या विकासाच्या अनेक योजना कार्यान्वित झाल्या. आदिवासींना मुख्य प्रवाहात सामील करून घेण्यासाठी विविध उपक्रम राबविण्यात येऊ लागले. त्यामुळे कोरकूंच्या पारंपरिक जीवनात उलथापालथ होऊ लागली. भूमिहिन कोरकूंना जमिनीच्या पटट्यांचे वाटप करण्यात आले. अनेकांना जमिनीचे मालकी हक्क देण्यात आले. त्यामुळे कोरकूंचा मुख्य व्यवसाय शेती हा बनला. परिवर्तनाची प्रक्रिया

आदिवासींच्या जीवनात सुरू तर झाली, परंतु त्यांचे शोषण मात्र थांबत नव्हते. अनेक बाहेरच्या व्यक्तींनी कोरकू परिसरात प्रवेश केला होता. अनेक सावकारांनी आदिवासींच्या जमिनी गहाण ठेवल्या होत्या. काहींनी त्या जप्त केल्या होत्या त्यामुळे सरकारने आदिवासींना कायद्याने संरक्षण दिले. आदिवासींच्या जमिनी संदर्भात महाराष्ट्र शासनाने जमीन महसूल संहिता व कूळ वहिवाट विधी अधिनियम १९७४ (१९७४ चा ३५ वा),महाराष्ट्र अनुसूचित जमातींना जमीन प्रत्यार्पित करणे अधिनियम (१९७४ चा १४ वा) हे कायदे बनविले. या कायदायाच्या तरतुदीप्रमाणे बिगर आदिवासींना आदिवासीची जमीन घेण्यावर प्रतिबंध लावण्यात आला. हरितक्रांतीनंतर आदिवासींच्या शेतीविकासाचे अनेक प्रकल्प राबविण्यात आले. तरीही कोरकूंच्या शेतीमधील मागासलेपण कायम राहिले, विहिरी, नाले, बांध यावर बागायती शेतीचे प्रयोग करण्यात आले. संकरित बि-बियाणे, रासायनिक खते, ट्रॅक्टर यासारख्या साधनांचा कोरकूंच्या शेतीत प्रवेश झाला. विहिरीवर पंप, डिझेल इंजिन, तुषार सिंचन, ठिबक सिंचन यासारख्या साधनांच्या वापराकरिता आदिवासींना प्रोत्साहन, अनुदान देण्यात येऊ लागले. पारंपरिक पिकांऐवजी सोयाबीन, कापूस यासारख्या व्यापारी पिकांचे प्रचलन वाढीस लागले. काही कोरकूंनी फळबागा लावल्या. शेतीक्षेत्रातील ही विकास प्रक्रिया आदिवासींच्या परिसरापर्यंत तर पोहचली मात्र, त्याच्या फायदा बोटावर मोजण्या एवढयाच आदिवासींनी घेतला. बहुतांश कोरकूंची शेती कोरडवाहू असल्याने त्यांना यापासून वंचित राहावे लागले. शेती मागासलेली राहिल्याने गरिबी, दारिद्रय, उपासमार या समस्या कायम राहिल्या. पूर्वीपासूनच कोरकूंची शेती हे एक मोठे आव्हान आहे. डोंगर, दऱ्या, जंगलाने ती व्यापली असल्याने त्यात अनेक संकटे येत राहतात. बहुतांश कोरकूंची जमीन ही मूडमार,

उतारमाथ्याची असल्याने त्यात पावसाचे पाणी मूरत नाही. ते लगेच वाहून जाते. त्यामुळे त्याचा परिणाम पिकांवर होताना दिसतो. जमीन सुपीक नसल्याने पिकांचे उत्पादन जेमतेम होते. त्यामुळे शेतीला लागणारा पैसा देखील वसूल होत नाही. त्यातून मार्ग काढण्यासाठी अनेक कोरकू आपली शेती बटाईने किंवा ठोक्याने देतात व दुसऱ्यांच्या शेतावर शेतमजूरी करतात. कोरकूंचा शेती मधील हंगाम भवई सणापासून चालू होतो. उन्हाळयाच्या शेवटी हा सण येतो. यापासून कोरकू आपल्या शेतीमधील मशागतीला प्रारंभ करतो. खेडादेवाला नवस, पूजाअर्चा करून पाण्याविषयी विनवणी करण्यात येते. नांगरणी, वखरणी करून पेरणीपूर्व मशागत केल्या जाते. पूर्वी पारंपरिक स्वरूपाची पिके घेण्यात येत होती. आता मात्र व्यापारी पिके घेण्याकडे कोरकूंचा कल वाढलेला आहे. सोयाबीन, कापूस, तूर, मका या पिकांच्या क्षेत्रात दिवसेंदिवस वाढ होताना दिसते आहे. याचे संकरित वाण पेरल्या जावून रासायनिक खताचा वापरही वाढला आहे. पेरणीनंतर खुरपणी, निंदण, डवरणी यासारखी कामे कोरकू एकमेकांच्या मदतीने करताना दिसतात. ज्यांच्याकडे शेती नाही अशा लोकांकडून कामे करवून घेतल्या जातात. तर काही बटाईने शेती कसतात. कोरकूंना हंगामाच्या दिवसात पेरणी पासून पीक घरात येईपर्यंत डोळ्यात तेल घालून त्याची राखणदारी करावी लागते. अनेक जंगली प्राणी, पशु, पक्षी पिकांना हानी पोहचवितात. त्यामुळे शेताला कुंपण करावे लागते. मध्यभागी मचान बांधून सतत लक्ष ठेवावे लागते. या दिवसात अनेक कुटुंबे तर शेतातच मुक्कामाला असतात. रात्रभर आळी पाळीने जागल करतात. दसरा ते दिवाळीपर्यंत कोरकूंच्या शेतीमधील हंगाम चालतो. दिवाळीनंतर कोरकूंच्या शेतीलील कामे संपून जातात.

**प्रजनन संबंधी मान्यता**

१. मुलांच्या रुपात पूर्वजच पुन्हा जन्म घेतात. मुलगा झाल्यास पूर्व जांचे रुप समजण्यात येते.

२. घरात बाळ जन्माला येणे हा पूर्वजांचा आशीर्वाद आहे हा कोरकूत लोकविश्वास आहे.

३. एख्यादया कुटुंबात मूलबाळ होत नसल्यास पूर्वजांचा कोप मानता त्यामुळे पूर्वजांची आत्मशांती केल्या जाते.

**जादूटोणा व अंधविश्वास**

कोरकू जमातीमध्ये अनेक प्रकारच्या रूढी, समजुती, लोकभ्रम प्रचलित आहेत. हजारो वर्षापासून ह्या गोष्टीचे अधिराज्य येथील लोकांच्या मनावर आहे. काळ बदलला असला तरी या लोकरूढी, लोकविश्वासांचे महत्त्व कमी झालेले नाही

**१. दृष्टिबाधा** :

प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याची प्रत्येकाची नजहेतूने पाहतो. तर कुणाच्या नजरेत द्वेष असतो. नजरेचे हे वैशिष्टे सहज कुणाच्या लक्षात येत नाही, यातूनच नजर लागणे हा प्रकार घडतो. त्यालाच दृष्टिबाधा असेही म्हणतात.

१. नजरेत भरणाऱ्या गोष्टींना दृष्टिबाधा होते. ही परंपरागत समजूत कोरकूत प्रचलित आहे. एखाद्या व्यक्तीला दृष्टिबाधा झाल्यास त्याच्या अंगारून मिरची, मीठ उतरवून चुलीत टाकतात. दृष्टिबाधा काढणे हा विधी फक्त स्त्रियाच करतात. बरेचदा घरातील मोरपंखी, लुगड्याची चादर, बिबा, चप्पल (वाहाण), केरसूणी (फळा) ही अंगावरून तीन वेळा उतरविल्या जाते. यावेळी ती वस्तू बाहेर नेऊन झटकतात. जंगलात सापडणाऱ्या दुधारी, अकुंभा, कन्हेरपेड यासारख्या वनस्पतीचा दृष्ट काढण्यासाठी उपयोग करतात.

२. अंड्याचे टरफल, केस, झाडू, मीठ अंगावरुन सात वेळा उतरवून दृष्टिबाधा काढल्ली जाते.

३. दृष्टिबाधा होऊ नये याकरिता बाळाला काजळाचे काळे टिक्के लावतात. देवावर विश्वास ठेऊन भूमकाच्या हाताने भारून दोरा, ताईत, माळ भारुन बाळाच्या गळयात बांधतात. मनगटात काळा घागाही बांधतात.

४. घराला दृष्टिबाधा होऊ नये याकरिता बिबा, हळद, कुंकू, मिरची, लिंबू हे घराच्या दारावर बांधतात. धराच्या उंबरठ्यावर नाल वगैरे ठोकीत नाहीत.

५. कोरकू जमातीत विविध प्रसंगी नवस फेडण्यासाठी पूजा-अर्चा करतात. त्यावेळी पांढऱ्या किंवा लाल रंगाचा (बिना डागाचा) बोकड, कोंबडा शुभ मानतात. शक्यतोवर त्याच रंगाचा कोंबडा, बकऱ्याचा बळी देतात. उलट्या पंखाचा कोंबडा शुभ मानला जातो.

६. लहान बाळाला पायरव झाल्यास घरगुती उपायाऐवजी भूमका, पडिहार यांच्याकडून उपचार करून

घेतात. पाण्यावर मंत्र मारून ते प्यायला देतात. मंत्रात्मक विधीकरिता भूमका, पडिहार लोक कवडी, शंख, शिंपला, मीठ, मिरची, लिंबू, गवत, बिबा, सुई, रूई ची पाने यांचा उपयोग करतात.

**जादूटोणा व मंत्रात्मक विश्वास :**

कोरकू जमातीमध्ये जादू विद्येचे स्थान महत्त्वपूर्ण आहे. जादू करीता लागणाऱ्या अनेक क्रिया, मंत्र कोरकू जाणतात. भूमका पडिहार यांची जादूत महत्त्वाची भूमिका असते. ते मंत्राच्या साहाय्याने अनेक आजार, व्याधी दूर करतात. जादू विद्येत मंत्रात्मक विश्वासाला महत्त्वाचे स्थान आहे.

७. कोरकू लोकांचा करणी, जादूटोणा यावर विश्वास अजून त्याचे निवारण करण्यासाठी ते भूमक, पडिहाराची मदत घेतात.

८. जादूटोण्यासाठी प्रेत, आत्मा, भूत, पिशाच लोकांना त्रास देतात. झपाटून टाकतात. आवाज काढतात, रस्ता अडवितात हे समज प्रचलित आहेत.

९. घर बांधताना जमिनीची पूजा करून नारळ फोडतात. पहाडी कोरकूची घरे एकमेकाला चिकटून असतात. त्याची दिशा उत्तर-दक्षिण अशीच ठेवतात. गावातील सर्व घरे रांगेत (पूर्व-पश्चिम) बांधतात. उत्तर-दक्षिण शुभ मानतात.

१०. लग्नाच्या प्रसंगी कुंकाचे  हात भिंतीवर मारतात.

११. कोरकू स्त्री-पुरूष अंगावर गोंदूण घेणे शुभ मानतात. माणसाचा देह नष्ट झाल्यावरही फक्त ते

गोंदणच आपल्या सोबत शेवटपर्यंत असते, असा त्यांचा विश्वास आहे.

१२. एखाद्या भूत-प्रेताची बाधा झाल्यास झाडपाल्याची धुनी देतात. त्यात प्रामुख्याने पिंपळाच्या लाख, लिताब, मसनऊदाचे (प्राणी) चामडे, केस याचा वापर करतात.

१३. विंचू चावल्यास आंब्याच्या झाडाचा चिक लावतात. त्यामुळे विचंवाचे विष उतरते.

१४. साप चावल्यास मंत्रात्मक पद्धतीने विष उतरवितात.

१५. मधाचे पोळे (आगे मोहळ) मंत्र मारून झाडतात .

उदा...

'बिसमला रे रेमा रेमा
धानू बाबा, जादू बाबा
बिसमला रे रेमा रेमा'

१६. अनोळखी ठिकाणी भीती वाटल्यास खालील मंत्र म्हणतात -

'गुरू फुके कोन फूके
नरसिंग बाबा का गुरू फुके
बजरंग बली का फुले '

१७. वेगवेगळ्या आजाराकरिता भिन्न प्रकारचे मंत्र भूमकाजवळ असतात. त्यात तारक व मारक मंत्राचा समावेश असतो. सापाचे विष उतरविण्याकरिता मंत्र मारतात. उदा.... सापाच्या विषावर मुंगसाच्या

पोटातील पित्त कणकेत मिसळवून त्याच्या गोळया करतात व ते साप चावलेल्या माणसाला औषधी म्हणून देतात.

१८. कोल्हा, मुंगूस यांचे दर्शन शुभ मानले जाते. तर उल्लू पक्षी अशुभ मानतात. घुबडाला अशुभ मानले जाते. जादुटोण्यावाले मात्र घुबडाला शुभ मानतात.

१९. बाहेरगावी प्रवासाला किंवा शुभकार्याला जाताना वाटेत पाण्याची घागर डोक्यावर घेतलेल्या स्त्रिया भेटल्यास, निदर्शनास आल्यास शुभ मानतात. त्यामुळे कार्य नक्की यशस्वी होईल हा विश्वास त्यांना वाटतो. पाणी हेच जीवन आहे. मातीची घागर तेही पाण्याने भरलेली म्हणजे पूर्णत्व समजतात. त्याला ढगाचे प्रतीक मानतात. त्यामुळे त्याला मंगल कलश मानून त्यात पैसा टाकतात. दही खाऊन प्रवासाला जाणे शुभ मानतात. यावेळी दर्शनही शुभ मानतात.

२०. घरातून बाहेर पडताना अनेक विचार, कामे असतात. यावेळी ते होतील किंवा नाही असे मनाला वाटत असते अशातच ससा, माकड, मांजर आडवे गेल्यास अशुभ मानतात व मागे परत फिरतात. लाकडाची मोळी डोक्यावर घेऊन येणारा-जाणारा व्यक्ती दिसल्यास अशुभ मानतात.

२१. सर्व सृष्टीच्या चराचरात जीव आहे. त्यामुळे माणसासारखेच निसर्गातील इतर गोष्टीही रात्री विश्राम करतात. रात्रीच्या वेळी झाडे, पाने, फुले झोपतात हा पूर्वापार विश्वास कोरकू जमातीत प्रचलित असल्याने त्यांना रात्री हात लावत नाहीत. तोडतही नाहीत.

२२. गुळावर कितीही प्रक्रिया केली तरी गोडी कमी होत नाही. तसेच नात्यांचेही असते. म्हणून

शुभप्रसंगी, लग्न कार्यात एकमेकांना गुळ खाऊ घालतात. गोड पदार्थ प्रेमाचे प्रतीक मानतात. त्यामुळे द्वेष नाहीसा होऊन प्रेम वाढीस लागते, असा विश्वास कोरकूंना वाटतो. खटाई मात्र देत नाहीत त्यामुळे संबंध खराब होतील असे कोरकूंना वाटते.

**शकून अपशूकन :**

२३. रात्रीला कुत्र्याचे आरवणे अशुभ मानतात. त्यामुळे गावावर भूत, प्रेत, आत्मा किंवा एखादी आपत्ती येईल असे कोरकूंना वाटते.

२४. कावळ्याचे दारावर ओरडणे कुणातरी पाहुणे येण्याचा संकेत मानतात.

२५. घराच्या उंबरठ्यावर व्यक्तीला बसू देत नाहीत कारण त्याने कर्ज होईल, असे त्यांना वाटते.

२६. काही भागात ब्राम्हण, तेली रस्त्यात भेटणे अपशूकन मानतात.

२७. जंगलातील पक्ष (चिमणी, घुटेलू) धुळीत लोळत असल्यास पाऊस येण्याचा संकेत मानतात.

२८. ज्या गावात मरण झाले त्या गावात जेवण करीत नाहीत.

२९. मसुरीची दाळ ही सापाचे डोळे मानत असल्याने ती खात नाहीत. असा प्रकारे कोरकू जमातीत लोकरुढी व लोकविश्वास आढळून येतात.

**मालमत्तेचे वाटप :**

पूर्वीच्या काळात कोरकू जमातीत मालमत्ता वाटपाचे प्रचलन नव्हते, कारण बहुतांश लोकांजवळ मालमत्ताच नव्हत्या. परंपरेने असलेली जमीन पिढया दर पिढया तशीच वाहिल्या जात होती. परंतु काळानुसार सरकारने जमिनीचे कायदे केल्याने कोरकू आपल्या संपत्तीची हिस्सेवाटणी करू लागले. कोरकू जमात मुळातच दऱ्याखोऱ्यात राहणारी निर्धन, गरीब आहे. असेल त्या परिस्थितीत सुख मानून जगणारी ही माणसे पैशाने, संपत्तीने गरीब असली तरी मनाने फार श्रीमंत आहेत. स्वातंत्र्योत्तर काळात आदिवासी विकासाकरिता अनेक योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत. जमिनीच्या पट्ट्याचे वाटप होत आहे. कृषी पंप, विहिरनिर्मिती, पशुपालन यासाठी अर्थसहाय्य दिल्या जात आहे. पूर्वीच्या झोपडया ऐवजी पक्की घरे निर्माण होत आहेत. त्यामुळे बऱ्याच कोरकू कुटुंबाकडे मालमत्ता, संपत्ती येत आहे. कोरकू जमातीत पितृसत्ताक कुटूंबपद्धती असल्याने स्त्री लग्नानंतर पतीच्या धरी येऊन राहते. कुटूंबातील लहान मुलाचे लग्न झाल्यावर आई-वडील आपल्या संपत्तीचे हिस्से करून ते मुलांमध्ये वाटून देतात. मुलीला यात हिस्सा मिळत नाही. गावातील पाटील, वयोवृद्ध मंडळी, जातपंचायती मधील पंच यांच्या समक्ष मुलांना संपत्तीचे वाटे दिल्या जातात. एखाद्या कुटूंबात एकुलती एक मुलगी असल्यास ती पित्याच्या संपत्तीची वाटेकरी होते. जमिनीची वाटणी करताना हलकी, भारी हा प्रकार पाहून वाटणी केल्या जाते. कधीकधी वयोवृद्ध माणसे काही प्रमाणात जमीन स्वत :कडे ठेवतात. हयात असेपर्यंत ज्या मुलाजवळ ते राहतात तो मुलगा त्यांचा हिस्सा आपल्याकडे ठेवतो.

लामझना विवाहाच्या अंतर्गत मुलगी-जावाई त्या कुटूंबात राहत असल्यास त्यांना हिस्सा मिळत नाही. परंतु एखाद्या कुटूंबात एकटी मुलगी असल्यास लामझनाला त्या संपत्तीत वाटा मिळतो. किंवा त्याची बायको त्या कुटूंबाची उत्तराधिकारी असते. निसंतान विधवा बाई तिच्या पतीच्या संपत्तीची वारसदार असते. एखाद्या स्त्रीने पाटोब्याव केल्यास तिला हिस्सा मिळत नाही. मात्र तिने आपली मूले तेथे ठेवल्यास त्यांना वाटा दिल्या जातो. एखाद्या स्त्रीने पाटोब्याव अंतर्गत पहिल्या पतीची संतान आणल्यास त्याला वाटा दिल्या जात नाहीं. विधवा स्त्रीला मात्र आपल्या पतीच्या संपत्तीत वाटा दिल्या जातो. आता बऱ्याच कुटुंबाच्या मालमत्तेचे वाटप कायद्यानुसारही केल्या जात आहे.

**जातपंचायत**

कोरकूंची ग्रामव्यवस्था ही संमिश्र स्वरूपाची आहे. मध्य भारतातील निमाड, मेळघाट या प्रदेशात कोरकूंचे प्राबल्य आहे. या भागात काही गावे पूर्णपणे कोरकूंची आहेत तर काही गावात अनेक जाती-जमातीचे वास्तव्य आहे. इतर प्रदेशात विविध जाती जमातीसोबत कोरकू राहतात. कोरकू जमातीचे मूळ स्थान छोटा नागपूर परिसरात असल्याचे अभ्यासकांचे मत आहे. काळ्याच्या ओघात छोटया छोटया समूहाच्यां स्वरूपात हे लोक मध्यभारतात स्थायिक झाले असावेत. कोरकूंची गावे ही कमी लोकसंख्येची असून जवळ जवळ वसल्याचे दिसते. कोरकूचे सामाजिक जीवन हे परस्परावलंबी आहे. त्यामुळेच सामूहिकपणे जीवन जगण्यात त्यांचा अधिक विश्वास आहे. कोरकूंचा हा प्रदेश दुर्गम जंगले, दऱ्याखोऱ्यांनी व्यापलेला

असल्याने त्यांना प्रत्येक वेळी एक दुसऱ्याची मदत ध्यावी लागते. काळानुसार कोरकूंच्या ग्रामव्यवस्थेत मोठा प्रमाणावर बदल घडून येत आहेत. त्यामुळे पूर्वीचे पारंपरिक कोरकू ग्राम एकदम बदलून गेले आहे. जुन्या गोष्टींचा ऱ्हास होत आहे. जातो पंचायतीचे प्राबल्य कमी होऊन त्याजागी संवैधानिक ग्रामपंचायती स्थापन झाल्या आहेत. त्याचा कोरकूंच्या सामाजिक जीवनानर परिणाम झाला आहे. पूर्वी पासूनच कोरकू गावातील लोक दारिद्र्य, गरिबी, निरक्षरता, कुपोषण यासारख्या समस्यांनी त्रस्त असले तरी त्यांचे सामाजिक जीवन मात्र सुव्यवस्थित व नियंत्रित असल्याचे दिसते. प्रामुख्याने पूर्वीच्या काळात ग्रामाची सूत्रे पाटील, भूमका, पडिहार यांच्या हाती होती. त्यामुळे प्रत्येक गावात जातोपंचायतीचे महत्त्व अनन्यसाधारण होते. आता मात्र जातो पंचायतीची जागा ग्रामपंचायतींनी घेतली आहे. सरपंच, पोलीस पाटील यांचे महत्व वाढले आहे. तरीही कोरकूंच्या ग्राम व्यवस्थेमध्ये दोन प्रकारची शासन व्यवस्था कार्यरत असल्याचे दिसते.

१) पारंपरिक जातो पंचायत

२) संवैधानिक ग्रामपंचायत

यामध्ये कोरकू ग्रामाचा व्यवहार चालत आहे. शासनाच्या ध्येय धोरणे, विकासाचे कार्य ग्रामपंचायती करतात. तर जाती अंतर्गत विविध प्रकारचे कार्ये जातो पंचायत करताना दिसते.

**पारंपरिक जातो पंचायत** :

कोरकूच्या सामाजिक जीवनात जातो पंचायतीला अनन्य साधारण महत्व आहे. पूर्वी कोरकू जमातीची

चौकट जातो पंचायतीच्या साहाय्याने उभी होती. परंतु आता त्यात बदल होत आहेत. अनेक गावात आजही जातो पंचायत कार्यरत आहे. काही गावातून ती नामशेष झाली असली तरी कुठे कुठे तिच्या खुणा आढळून येतात. अनेक गावात आजही लोकवर्गणी व भांडण तंटे मिटविण्याची जबाबदारी जातो पंचायतीकडे असल्याचे दिसते. जातो पंचायत गावातील प्रत्येक कुटुंब प्रमुखाकडून एक निश्चित रक्कम दरवर्षी वसूल करते. जमा झालेली रक्कम गावातील लोकांना व्याजाने दिल्या जाते. अडीअडचणीच्या काळात त्यामुळे अनेकांना आधार मिळतो. वसूल झालेली रक्कम व नव्याने झालेली वर्गणी पुन्हा आपसात वाटून घेतल्या जाते. होळीच्या दिवसापासून पंचमीपर्यंत हे आर्थिक व्यवहार पार पाडल्या जातात. एखाद्याने रक्कम बुडविल्यास पंचायत त्याला दंड करते किंवा त्याला जातीतून काढून टाकव्यात येत. अनेकदा त्याची संपत्तीही जप्त केली जाते. या बरोबरच जाती अंतर्गत असणारे वाद, भांडणे, कलह यांचे निराकरण केल्ली जाते. त्यामुळे जातो पंचायतीचा प्रत्येकाला धाक वाटतो. जातो पंचायत कोरकू जमातीचे अभिन्न अंग आहे, असे म्हटल्यास वावगे होणार नाही. पण आता काळानुसार यात बदल होत आहेत. पूर्वी कोरकू ग्रामाची सर्व व्यवस्था जातो पंचायतीकडे होती. पंचायती मध्ये गावातील वयोवृद्ध (सयाना) पुरूष सदस्य असायचे. महिलांचा यात समावेश नव्हता. जातो पंचायती मधील सदस्य संख्या निश्चित नसायची. गावानुसार, लोकसंख्येनुसार त्यात बदल दिसून येत होता. फक्त कोरकू जमातीच्या पुरुषांनाच यात सदस्य होता येत असे. इतर जमातीच्या लोकांना यात प्रवेश नसायचा. गावातील इतर नागरिक जातो पंचायतीच्या कार्यात सहभाग घेऊ शकत होते पण निर्णय मात्र जातो पंचायतीमधील पुढारीच घेत होते. गावातील कोरकू जमाती अंतर्गत कुठल्याही समस्येचे निराकरण जातो

पंचायतीत केल्या जात असे. दावे, प्रतिदावे, साक्ष, पुरावे तपासून पंचमंडळी विचार विनिमय करीत असे. सर्व संमतीने निर्णय घेऊन पाटील तो घोषित करायचा. गावात इतर जमातीचे लोक वास्तव्य करीत असल्यास त्यांच्या भांडण तंटयात कोरकू पंचायत हस्तक्षेप करीत नसे. पूर्णपणे कोरकू ग्रामातील पंचायत अधिक शक्तिशाली असायची. गावातील पाटील, चौधरी, कोटवार हे जातो पंचायती मधील प्रमुख व्यक्ती असायचे. इतर वयोवृद्ध पुरुष सदस्य म्हणून कार्य करीत असत. पाटील पंचायतीचा प्रमुख होता. त्याच्याच नियंत्रणाखाली पंचायतीचे कार्य चालायचे. महाजन, घेटया(खजिनदार), चौधरी, मुखरी, भूमका व कोटवार पाटलाला साहाय्य करीत असत. चौधरी पंचायतीचे संचालन करायचा. सर्वाची मते, साक्ष, दावे याची तपासणी चौधरीच करायचा. त्याविषयी पाटलाला माहिती द्यायचा. पाटलानंतर चौधरीचीच भूमिका महत्त्वाची असायची. पाटील व चौधरी यांना मदत करण्यासाठी कोटवार होता. पंचायतीच्या बैठकीची व्यवस्था, निरोप, सूचना देणे हे कार्य तो करायचा. गुन्हे, वार्ता, निरोप या पाटलापर्यंत तोच पोहचवित होता. जातोपंचायतीच्या वतीने गावात साजऱ्या होणाऱ्या यात्रा, सण, उत्सव, नवसाच्या आयोजनात कोटवार पंचायतीला मदत करायचा. विवाह, मृत्यू, फुलजागनीच्या प्रसंगी योग्य त्या आयोजनासाठी कोटवार सर्वाना मदत करायचा. जातो पंचायतीच्या निर्णयाची योग्य ती अंमलबजावणी होते की नाही ? हे पाहण्याची जबाबदारीसुद्धा कोटवाराचीच होती. पाटील, चौधरी, कोटवार ही पद वंशपरंपरागत पद्धतीने ठरलेली असायची. परंतु त्यांना पदच्युत करण्याचे अधिकारही जातो पंचायतीच्या सदस्याकडे होते. अयोग्य वर्तन, व्यसनाधिनता, कमी झालेली विश्वासार्हता, स्थलांतर, अज्ञान अशा अनेक कारणाकरिता यांना पदावरून काढता येत होते. सर्व

संमतीनुसार दुसरा पुढारी नेमण्याचे अधिकार जातो पंचायतीला होते. पाटील, चौधरी, कोटवार यांना कुठल्याही प्रकारचा मोबदला कोरकू देत नव्हते. ते फक्त मानाचे व अधिकाराचे पद होते. त्याच्या शब्दाला मान होता. लग्नप्रसंगी मात्र त्यांना फेटा, कपडे देऊन मान दिला जायचा. गावातील कुठल्याही आयोजनात पहिला मान पाटील व पंचायतीच्या पुढाऱ्यांनाच मिळायचा. त्यांच्या संमतीशिवाय कुठलेही आयोजन गावात केले जात नव्हते. जातो पंचायतीचे  नियम, कायदे, बंधने लिखित नव्हते. कोरकू जमातीच्या पारंपरिक प्रथा, परंपरा, नियमयांना अनुसरून निर्णय घेतला जात होते. त्यामुळे वयोवृद्ध जाणत्या माणसाकडे या जातो पंचायतीचे नेतृत्व असे. त्यांचा, अनुभव रीतिरिवाजाचे ज्ञान याचा फायदा घेतल्या जात होता. कोरकू जमातीच्या रूढी, प्रथा, परंपरा, संकेत जातो पंचायतीत कायद्याचे रूप धारण करायच्या त्यामुळे जातो पंचायतीच्या निर्णयाविरोधात सहसा कुणी जात नव्हते. सर्व जातो पंचायतीचा मान राखायचे.

**जातो पंचायतीचे कार्ये** :

कोरकू जमातीच्या नियमनाचे संपूर्ण कार्य जातो पंचायतीद्वारे केल्या जात होते. ग्रामामधील संपूर्ण कायदा सुव्यवस्था, आयोजन-नियोजन, भांडण, तंटे, कलह, वाद अशा जातीतंर्गत सर्व बाबीचे निराकरण करण्याची जाबदारी जातो पंचायतीवर असायची. त्या अनुषंगाने जातो पंचायतीचे कार्य पुढील प्रमाणे होती.

१. कोरकू ग्रामामधील सामूहिक सण, उत्सव, यात्रा, नवस, पूजाअर्चा आयोजित करण्याचे कार्य जातो पंचायतीकडे असायचे. कुठल्याही आयोजनाची तारीख, तिथी, विधी, पद्धती पंचायतीत ठरविल्या जात होती.

नवस, बळी, उत्सव, मेघनाथ यात्रा यांची तयारी व आयोजन जातो पंचायतीच करायच्या. नैसर्गिक आपत्ती, गावावरील संकटाच्या वेळी सर्व गावकऱ्यांच्या संरक्षणाची व त्यांना हिंमत देण्याचे कार्य जातो पंचायतीमधील लोक करीत होते. गावकऱ्यांना त्रासदायक, हानिकारक, नुकसानकारक ठरणाऱ्या गोष्टीवर नियंत्रण ठेवण्याचे कार्य ही जातो पंचायत करत होती. भूमका, पडिहार यांच्या सल्ल्याने धार्मिक विधी, देवालये, स्मशानघाट यांचीही जबाबदारी संबंधित गावातील जातो पंचायतीकडे होती.

२. पूर्वी कोरकू जमातीत विवाहाची संपूर्ण जबाबदारी जातो पंचायतीकडे होती. विवाहाची जुळवाजुळव करण्याचे कार्य पंचायतीमधील सदस्य करायचे. मुला-मुलीकडील संमती झाल्यावर गोनम ठरविण्याचे कार्य पंचायती समक्षच करावे लागे. गोत्राची तपासणी सुद्धा पंचमंडळी करीत असत. कोरकू रीतिरिवाजानुसार लग्न, विधि, सोहळा पार पाडावे लागत. वराकडील मंडळीची व्यवस्था, वधूकडील विवाहाचे आयोजन, जातो पंचायतीच्या देखरेखी खाली होत होते. जातो पंचायतीच्या मान्यतेशिवाय कुठल्याही विवाहाला मान्यता प्राप्त होत नव्हती. पाटोब्याव म्हणजे एखाद्या स्त्रीने दुसरे लग्न करणे. या विवाहात सुद्धा जातोपंचायत महत्त्वाची भूमिका निभावित होती. पंचायतीची बैठक बोलावून त्यांचा घटस्फोट घडवून आणणे. पूर्वीच्या पतीला नवीन पती अर्धे गोनम देतो किंवा नाही हे पाहणे, दंड व भोजनादी घेऊन त्या विवाहाला मान्यता देण्याचे कार्य पंचायतीकडे होते. कोरकू जमातीमधील मुलांनी सहपलायन केल्यास ते प्रकरण जातेपंचायतीत प्रथम मांडल्या जायचे. एखाद्या मुलाने जबरदस्तीने मुलीचे अपहरण केल्यास व पंचायतीत ते सिद्ध झाल्यास त्या मुलाला दंड किंवा समाजातून बहिष्कृत करण्याचेही कार्य कोरकू जातोपंचायत करीत असे. घरघुस्सू विवाहासाठी एखादी

स्त्री जबरदस्तीने एखादया पुरुषाच्या घरात घुसल्यास त्याचेही निराकरण पंचायत करीत असे. लामझना विवाहाच्या कालावधीत काही समस्या उदभवल्यास त्याची दाद जातोपंचायतीत मागितल्या जायची. लग्नाप्रमाणे गावात एखादयाचा मृत्यू झाल्यास त्या परिवाराला मदत करण्याचे कार्य जातो पंचायत करायची. मृत्यूची बातमी पोहचविणे, अंत्येष्टीची व्यवस्था लावणे, स्मशानातील सोय यासारख्या बाबी यात समाविष्ट होत्या. यामुळे जातो पंचायत प्रत्येकाला मदत करणारी संस्था होती. तिचा आधार व वचक समाजासाठी आवश्यक होता.

३. कोरकू जमातीमधील सामाजिक रीतीरिवाजानुसार लोकांवर नियंत्रण ठेवण्याचे कार्य जातो पंचायत करीत होती. विवाहपूर्व स्त्रीपुरुष संबंध, अनैतिक व्यवहार यावर पंचायतीचा वचक होता. गावातील कोरकू जमातीत एखादे असे प्रकरण आढळल्यास संबधित प्रकरणातील लोकांना पंचायीतीत बोलाविल्या जात होते. न्याय, निवाडा केल्या जात होता. जातोपंचायत गावातील कुठल्याही प्रकरणात एकदम हस्तक्षेप करीत होती हे जातो पंचायतीची विशेषता होती.

४. पूर्वी कोरकू जमातीत जातीबंधने काटेकोरपणे पाळल्या जायची. बहुसंख्य कोरकू ग्रामातील लोक इतरांना आपल्यापेक्षा कमी दर्जा देत असत. त्यामुळे जाती बाह्य एखादे प्रकरण झाल्यास जातो पंचायत त्याला गंभीरतेने घेत होती. एखाद्या स्त्रीने इतर समाजातील पुरुषाशी शारीरिक संबंध प्रस्थापित केल्यास किंवा विवाह केल्यास जातो पंचायत त्या कुटुंबाला किंवा त्या स्त्रीला समाजातून बहिष्कृत करीत असे. तिला जर पश्चाताप होऊन परत जातीत यायचे असल्यास त्यावर चोखाडा संस्कार केल्या जात होता. एखादया गावात

एकाच गोत्रात लग्न झाल्यास त्या जोडप्यापैकी एकाचे गोत्र बदलण्याचे कार्यही जातो पंचायत करीत होती. एखाद्या कुटुंबाला जातो पंचायतीने बहिष्कृत केल्यास गावातील किंवा समाजातील कुणीही त्यासोबत संबंध अथवा कुठलाही व्यवहार करीत नसायचे. त्यामुळेच जातो पंचायतीचा धाक सर्वांना वाटत होता. त्यामुळे कुणीही जातीबाहय कार्य करायला धजावत नसे.

५. कोरकू जमाती मधील कौटुंबिक वाद, आपआपसातील तंटे, संपत्तीचे वाद गावातल्या गावातच सोडविल्या जात होते. संपत्तीची वाटणी, घराची हिस्सेदारी, जमिनीची वाटणी सर्वांच्या सल्ल्याने केल्या जात होती. जातो पंचायतीचा निर्णय सर्वांना मान्य करावा लागे. अन्यथा समाजाचे दोषारोपण त्याला सहन करावे लागे. एखाद्याने सालदारीचे उल्लंघन केल्यास त्याचाही निर्णय पंचायत करीत असे. गावाच्या हद्दीतील चोरीच्या घटना, लुटमार याबाबत पंचायत कठोर भूमिका घेत होती. याबाबत एखादा गुन्हा सिद्ध झाल्यास त्यावर सामाजिक बहिष्कार घातल्या जायचा. प्रसंगी त्यांना गाव सोडावे लागे.

**महाल व बडी पंचायत :**

गावातील जातो पंचायती पेक्षा मोठी व काही गावा मिळून बनलेली महाल पंचायत होती. गावागावातील वाद, तंटे त्यात सोडविल्या जात. पंचक्रोशीतील गावाचा त्यात समावेश असल्याने कोरकू जमातीचे एक दृढ संघटन म्हणजे महाल पंचायत असे. विवाहविषयक, संपत्तीविषयक, सामाजिक अशा सर्वांचा निपटारा महाल पंचायत करीत होती. ५ ते १० गावा मिळून बनलेले पंच त्यात असायचे. जातो पंचायतीमध्ये न सुटलेले प्रश्न

महाल पंचायतीत सोडविल्या जात असत. कोरकू जमातीचे सर्वोच्च सामाजिक संघटन म्हणजे बडीपंचायत होती. परिसरातील २० ते २५ गावामिळून बडी पंचायतीचे पाटील, कोटवार, चौधरी आपला एक पुढारी नेमत असत. संपूर्ण जाती संबंधीचे प्रश्न, इतर जातीविषयक निर्णय, जातीमधील संघर्ष यात मांडल्या जाऊन त्याचे निराकरण बडी पंचायतीद्वारे केल्या जात असे. कोरकू जातो पंचायतीची बैठक संबंधित गावातील पाटील यांच्या घरी किंवा पारावर भरविल्या जायची. संबंधित प्रकरणाशी निगडित लोक त्यात सहभाग घ्यायचे इतर गावकरी देखील उपस्थित असायचे. सर्व पंचायतीच्या पंचाची मते, विचार लक्षात घेऊन एक निर्णय घेतल्या जायचा. वाद झाल्यास पाटील किंवा मुखिया सर्वांना समजावून मार्ग काढीत होता. पाटील बडी पंचायतीचा प्रमुख असल्याने त्याचा निर्णय मान्य करीत असत. लहान गावे किंवा पंचायत नसल्यास जवळच्या मोठया गावातील पंचायतीत प्रकरण मांडल्या जायचे. जातो पंचायतीला दंड करण्याचा अधिकार होता. त्यामुळे संबंधित पक्षाकडून दंड वसूल करून त्याचे भोजन, मद्य आणल्या जाऊन ते पंचायतीच्या लोकांना दिल्या जात असे. उरलेली रक्कम अथवा पैसे गावातील काही सामाजिक कार्यात वापरले जात होते.

**ग्रामपंचायत** :

१९६० साली सी.पी. ॲंड बेरार प्रांताचे विभाजन होऊन महाराष्ट्र व मध्यप्रदेश या दोन राज्यात कोरकूंचा प्रदेश विभागला गेला. मेळघाट हा प्रदेश महाराष्ट्रात तर पूर्व व पश्चिम निमाड, बैतूल, हरदा हा प्रदेश मध्यप्रदेशातील समाविष्ट करण्यात आला. स्वातंत्र्योत्तर काळात पंचायतराज च्या अनुषंगाने गाव

पातळीपासून शासन व्यवस्था निर्माण करण्यात आली. महाराष्ट्रात१९६१ च्या मुंबई ग्रामपंचायत अधिनियम लागू करण्यात आला. त्यादृष्टीने एक हजार लोकसंख्येच्या वर असणाऱ्या गावात स्वतंत्र ग्रामपंचायती तर त्यापेक्षा कमी लोकसंख्येच्या गावात गटग्रामपंचायती स्थापन झाल्या. वाडया, वस्त्यांचा समावेश शेजारील गावाच्या ग्रामपंचायतीत करण्यात आला. गावात निवडणुका घेण्यात येऊन सरपंच, उपसरपंच, सदस्य पाच वर्षाच्या कालावधी करीता निवडल्या जाऊ लागले. ग्रामस्तरावर ग्रामपंचायती, तालुकास्तरावर पंचायत समिती तर जिल्हास्तरावर जिल्हापरिषदा अशी त्रिस्तरीय स्थानिक स्वराज्य संस्थाची संरचना झाल्याने समाजाच्या शेवटच्या स्तरापर्यंत शासन व्यवस्था निर्माण झाली. मध्यप्रदेशात १९६२ च्या पंचायत कायदयानुसार वरील प्रकारची त्रिस्तरीय रचना निर्माण केली गेली. गावातील सर्व कारभाराची सूत्रे त्यामुळे ग्रामपंचायतीकडे देण्यात आली. सरपंच, उपसरपंच, ग्रामविकास अधिकारी यांच्याकडे अधिकार आले. गावातील विविध कार्यासंदर्भात केंद्र, राज्य शासनाच्या विविध योजना, संकल्पना, मोहिमा राबविण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीकडे आली. आदिवासी क्षेत्रातही ग्रामपंचायतीमुळे ग्रामव्यवस्थेत अनेक बदल घडून आले. शिक्षणाच्या सोयी, दळणवळण, माहिती तंत्रज्ञान, आरोग्याच्या सोयी खेडयापर्यत पोहचू लागल्याने पंचायत राजमध्ये नागरिकांचा सहभाग वाढू लागला. वित्तीय अधिकारी, संवैधानिक दर्जा यामुळे ग्रामपंचायतीना गावपातळीवर आपोआप महत्त्वाचे स्थान मिळाले.

**ग्रामपंचायतीचे कार्य व जबाबदाऱ्या :**

१. केंद्र व राज्य शासनाच्या विविध योजना, उपक्रम, संकल्पना गावात राबविणे, लोकोपयोगी योजनाची प्रभावी अंमलबजावणी करून विकासाची प्रक्रिया सर्वसामान्य नागरिकापर्यंत पोहचविणे.

२. जन्म, मृत्यूची नोंदणी करून योग्य त्या प्रमाणपत्राचे वितरण करणे.

३. शिक्षण, आरोग्य, स्वच्छता, पाणीपुरवठा, दिवाबत्ती यासारख्या अत्यावश्यक गोष्टीवर नियंत्रण ठेवून त्याची योग्य ती अंमलबजावणी करणे.

४. जातीय सलोखा, भांडण, तंटे, वाद गावपातळीवर सामोपचाराने सोडविणे.

५. नैसर्गिक आपत्ती, पूर, भूकंप सारख्या परिस्थितीत गावकऱ्यांच्या हिताचे संरक्षण करणे.

६. गावकऱ्यांच्या हितासाठी योग्य त्या योजना व उपक्रम ग्रामसभेद्वारा मान्यता घेऊन गावात राबविणे.

**ग्रामपंचायतीचा जातो पंचायतीवरील प्रभाव व परिणाम :**

१९६० नंतरच्या काळात लोकशाहीचा विकेंद्रीकरणामुळे गावापातळीपर्यंत अनेक संवैधानिक संस्था निर्माण झाल्या. पंचायतराज व्यवस्थेतील ग्रामपंचायत ही गावाच्या सर्व क्रिया-प्रक्रियांची केंद्र बनली. सत्तेचे केंद्रस्थान बनली. यामुळे गावपातळीवर अनेक बदल घडून आले. पूर्वीची ग्रामव्यवस्था मोडकळीस आली. आदिवासी क्षेत्रातही हे बदल घडून आल्याने परंपरागत आदिवासी जीवनातील अनेक गोष्टीचा ऱ्हास झाला किंवा त्यात अनेक बदल घडून आले. कोरकू जमातीच्या पारंपरिक जातो पंचायतीवर याचा मोठा परिणाम

झाला. गावातील जातोपंचातीचा प्रभाव कमी होऊन सरपंच, उपसरपंच, पोलीस पाटील ही सत्तेची नवी केंद्र बनली. पारंपरिक जातो पंचायतीचे सदस्य व मुखिया हे समाजातील वयोवृद्ध व जाणकार लोक होते. समाजातील रूढी, परंपरा संकेत, मूल्ये यांची त्यांना जाण होती. समाजातील हिताचे निर्णय घेताना समाजाच्या चौकटीत राहून ते घेत होते. समाजातील सर्व लोकांची निष्ठा जातो पंचायती प्रती असल्याने प्रत्येकाला त्याविषयी आस्था वाटत होती. नव्या संरचनेत ग्रामपंचायत ही संस्था समाजाशी प्रत्यक्ष निगडित नसल्याने लोकांना त्याविषयी विशेष आस्था उरली नाही. सरपंच, उपसरपंच, सदस्य यांच निवड मतदान पद्धतीने होत असल्याने वयोवृद्ध नागरिक त्यापासून अलिप्त राहू लागले. राजकारण त्यातील चांगल्या वाईट गोष्टी याचा गावातील राजकारणावर प्रत्यक्ष अप्रत्यक्ष परिणाम होऊ लागला. गावातील ग्रामपंचायतीला वित्तीय अधिकार मिळाल्याने ती अधिक बळकट बनली. त्या तुलनेत जातो पंचायतीला असे कुठलेच अधिकार नसल्याने ती कमकुत होत गेली. अनेक कोरकू गावात तर तिचे अस्तित्वच संपल्यात जमा झाले. प्रशासन व्यवस्था, संरक्षण, न्यायिक प्रक्रिया यांचा विस्तार वाढल्याने लोक ग्रामपंचायतोया आधार घेऊ लागले. ग्रामपंचायतीना ग्रामस्तरावरचे अनेक अधिकार मिळाले. शासनाच्या विविध योजनाची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी तिच्यावर टाकण्यात आली. त्यामुळे गावकऱ्यांना ग्रामपंचायतीची आवश्यकता वाटू लागली. सरपंच, पोलीस पाटील, पंचमंडळी यांच्या जबाबदाऱ्या वाढल्याने त्यांचा हस्तक्षेप वाढला. भांडण, तंटे, कलह, गुन्हेगारी निवारण्यासाठी ग्रामपंचायतीला अधिकार मिळाले. त्यामुळे जातो पंचायतीचे महत्त्व आपोआप कमी झाले. आदिवासी जमातही विकासाच्या प्रक्रियेत सहभागी होऊ लागली. शहरीकरणाचा प्रभाव

वाढल्याने त्यांच्या जीवनमानात प्रचंड उलथापालथ होऊ लागली. माहिती तंत्रज्ञान, टीव्ही, केबल, डीटीएच, मोबाईल सारख्या साधनांनी कोरकूंच्या घरात प्रवेश केला आहे. नव्या संस्कृतीचा परिणाम तरुण पिढीवर सर्वाधिक होऊ लागला. एकविसाव्या शतकात कोरकूंच्या शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय, आर्थिक व भाषिक अशा सर्व क्षेत्रात प्रचंड उलथापालथ सुरू झाली आहे. त्यामुळे कोरकूंची पारंपरिक लोकसंस्कृती धोक्यात आली आहे. तिचा कमालीचा ऱ्हास सुध्द्रा झाला याचा पहिला बळी ठरला आहे ती कोरकूची जातो पंचायत.

**समाज की भाषा**

**भाषा :**

कोरकू जमातीची स्वतंत्र बोली असूनती 'कोरकू' नावाने ओळखली जाते. ऑस्ट्रो-एशियाटिक भाषाकुळातील ही बोली असून तिला लिपी नाही. छोटा नागपूर परिसरातील उत्तर मुंडा जमातीच्या बोलीमध्ये तिचा समावेश करण्यात येतो. कोरकू बोली मुख्यत्वे सातपूडा, विध्य यांच्या पर्वतरांगामधील कोरकू बोलतात. आपल्या दैनंदिन जीवनव्यवहारसाठी या बोलीचा वापर ते करतात. देवनागरी भाषेच्या अंगाने कोरकू बोलीत ६ स्वर आणि ३० व्यंजने आढळून येतात. ही बोली उच्चारणाच्या दृष्टीने सोपी व सुलभ आहे. बाहेरील व्यक्तीला ती कठीण वाटते. मात्र दोन कोरकू बोलत असताना ती इतक्या सहज व वेगाने बोलतात की तिचे ओधवतेपण नजरेत भरते. शब्द, वाक्य इतक्या तीव्र गतीने उच्चारल्या जातात की बरेचदा अनेक शब्द, वाक्यांची

एकमेकात सरमिसळ होऊन जाते. हिंदी, मराठी भाषांचा प्रभाव कोरकू बोलीवर स्पष्टपणे दिसून येतो. अगदी थोडे गोंडी शब्द त्यात आढळतात. निमाडी भाषेचा प्रभावही कोरकू बोलीवर दिसून येतो. जुन्या पिढीतील लोकांच्या बोलण्यातून मात्र मूळ कोरकू बोलीचे स्वरूप दृष्टींस पडते. कोरकू बोलीचे स्वतःचे शब्दभांडार असून त्यात असंख्य लोकगीते, लोककथा, म्हणी, वाकप्रचार यांची रेलचेल आहे. आधुनिकीकरणाच्या प्रकियेचा मात्र कोरकू बोलीवर तीव्र परिणाम होत आहे. नव्या पिढीतील अनेक व्यक्ती कोरकू सोडून हिंदी, मराठी सारख्या भाषा बोलू लागले आहेत. त्यामुळे मूळ कोरकू बोली हरवत चालली आहे.

विदर्भातील अमरावती जिल्ह्यामध्ये कोरकू जमात प्रामुख्याने आढळते. अनेक शतकांपासून मेळघाट म्हणून ओळखल्या जाणाऱ्या धारणी, चिखलदरा या तालुक्यात कोरकू वास्तव्य करून राहतात. मेळघाट हा परिसर व्याघ्रप्रकल्प, अभयारण्य व पक्षांच्या तसेच वनस्पतींच्या विविधतेसाठी व थंड हवेचे ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे.

चोहोबाजूंनी वळण्दार रस्ते असणारा मेळघाट विदर्भाचेच नव्हें तर महाराष्ट्रचे भूषण आहे. पर्यटकांचे ते आवडते

ठिकाण आहे. पर्वताच्या माथ्यावर, दऱ्याखोऱ्यात जंगलात अतिदुर्गम भागात कोरकू आदिवासी वस्ती करून राहतात. कोरकू आदिवासींची बोली भाषा, कोरकू आहे. मेळघाट हा विभाग मध्यप्रदेशातील हिंदी भाषिक भागाशी संलग्न असल्यामुळे हिंदी भोषेता विशेष : प्रभाव कारकू बोलीवर, मौखिक वाङमयावर झालेला दिसून येतो. कोरकू बोलीला लिपी नाही, त्या भाषेचे एक आगळेवेगळे सौंदर्य आहे. त्या भाषेतील

लोकसाहित्य समृद्ध आहे. लोकगीत, लोककथा, वाक्प्रचार, म्हणी इत्यादी लोकसाहित्याचा भांडार कोरकूत दिसून येते.

**कला**

आदिवासींच्या लोककला या त्यांच्या जीवनाचा अभिन्न भाग आहेत. त्यांच्या माध्यमातुन आदिवासी संस्कृती पाझरत आहे. ह्या आदिवासींच्या लोककलेचा जन्म केव्हा झाला ? हे जरी निश्चित सांगता येत नसले, तरी मानवाने आपल्या उत्क्रांतीच्या काळात या कलांना जन्म दिला असावा. मानवाची अन्न पाण्याची गरज भागल्यावर त्याने गुहेत या कलांचा शोध लावला असावा. आपल्या गुहेत त्याने सर्वप्रथम रेषा, आकृत्या काढुन चालना दिली असावी. पुढे त्याच्या नजरेस पडणारे पशु, पक्षी, जीवजंतू याची रेखाटने त्याने काढली असावी. विविध गुहामधील प्रागैतिहासिक कलाकृती त्याच्या आजही साक्ष देतात. नंतर मानवाचा जसजसा विकास होत गेला तसतसा त्याने आपल्या कला निर्मितीच्या वेगवेगळ्या वाटा शोधल्या असाव्या. मानवाची कला बहरत गेली. त्याच्या बौद्धीक विकासाला चालना मिळून त्याने त्यात नवीन नवीन गोष्टीचा अंतर्भाव केला. विविध शोध त्याने लावले. निवाऱ्याच्या सोयी शोधून काढल्या. ज्या प्रदेशात तो वास्तव्याला होता त्याचा परिणाम त्याच्या जीवनावर व कलांवर झाला, निसर्गातील, बाह्यवातावरणातील अनेक गोष्टीचा मग त्याने वेध घेतला. आदिवासी संस्कृती सुरुवातीपासून डोंगर, दऱ्या, नद्या, पर्वत, जंगल यातच बहरलेली आहे. अनेक नैसर्गिक घटकांच्या साहाय्याने या लोककला जिवंत राहिल्या आहेत. नगर जीवनापासून अलिप्त

असणारी ही आदिवासी संस्कृती त्यामुळेच वेगळी बनली आहे. तिने आपले वेगळेपण कायम ठेवले आहे. कोरकू या आदिवासी जमातीचे जीवन असेच अलिप्त आहे. कोरकूंनी आपल्या खास अशा काही लोककला आजही जोपासलेल्या आहेत. त्यांची संख्या फारशी नाही, त्या कमी असल्या तरी त्यातून कोरकूंची सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक जीवनदृष्टी प्रकट होताना दिसते. पूर्वीपासूनच ही जमात निर्धनता, दारिद्रय, गरिबी यासारख्या प्रश्नांनी त्रस्त आहे. ज़गण्याचा संघर्ष हाच महत्त्वाचा प्रश्न त्यांच्या समोर उभा असल्याने त्यांना फारसा वेळ या कलांसाठी देता आला नसावा, तरीही या जमातीच्या लोकांनी काही कलांना जोपासले आहे. कोरकूच्या लोककलेत चौकमांडणी, भिंतीचित्रे, गोंदण, मेंहदी, कणग्यावरील नक्षीकाम, थापे, लिंपन-सारवण यांचा समावेश करता येतो. या कलांमधून कोरकूच्या भावविश्वाचे दर्शन घडुन येते.

**चौकमांडणी व भिंतीचित्रे :**

कोरंकूच्या लोककलेमध्ये चौकमांडणी व भित्तीचित्रे यांना प्रमुख स्थान आहे. या कला प्रामुख्याने कोरकू स्त्रियांच्या जीवनाशी निगडीत आहेत. कोरकू जमातीच्या स्त्रिया श्रद्धाशील असून त्यांचा आपल्या जमाती मधील प्रथा, परंपरा, श्रद्धा, रूढी यावर दृढ विश्वास असतो. आपल्या परंपरागत संस्कृतीच्या संकेतांना त्या काटेकोरपणे पाळण्याचा प्रयत्न करतात. कुठल्याही शुभप्रसंगी देवाची पूजा-अर्चा ते करतात. कोरकू जमातीत धरती-आकाश, डोंगर, खेडा, मुठवा, चंद्र-सूर्य याशिवाय स्थानिक देवीदेवतांची संख्या विपुल प्रमाणात आहे. चौक मांडणी करून त्यावर देवदेवताची स्थापना केल्याने ते प्रसन्न होतात. कृपादृष्टी ठेवताता. अनिष्ट वृत्ती

नष्ट होतात, असा त्यांचा विश्वास असतो. त्यामुळे मंगलप्रसंगी या स्त्रिया चौकाची मांडणी करतात. घर, अंगण, गल्ली, गृहदेवासमोर जेथे मंगलकार्य संपन्न होते. अशा ठिकाणी चौकोनी आकाराचा चौक रेखाटल्या जातो. गहू किंवा तांदुळाच्या पिठापासून ह्या चौकाला रेखाटला जाता. लग्नप्रसंगी वर वधू जेथे उभे राहतात, त्या ठिकाणी चौकाची मांडणी करून पैसे ठेवले जातात. विवाहित मुली, सुवासिनी स्त्रिया, अविवाहित मुली या चौकाची मांडणी करतात. चौकाचे रेखाटन करतांना विविध प्रकारची सामूहिक स्वरूपात गीते गायिल्या जातात.

कोरकू स्त्रिया धार्मिक तथा मंगल प्रसंगी भिंतीवर अनेक प्रकारची चित्रे काढतात. त्यामधून संबंधित धार्मिक सणाविषयीचे भाव व्यक्त होत असतात. आदिवासी संस्कृतीमधील अनेक विलोभनिय गोष्टीची झलक त्यात पाहावयास मिळते. पांढरी माती, गेरू, चुना लावून भिंती स्वच्छ सारवल्या जातात. दरवाजा, कोनाडयाच्या आजूबाजूने वेली, बुट्टी, नक्षी काढल्या जाते. पूर्वी यासाठी अनेक प्रकारच्या नैसर्गिक रंगाचा उपयोग केला जात होता. परंतु आता बाजारात मिळणारे रंग व ब्रशचा उपयोग केला जातो. पूर्वी एखाद्या काडीला कापूस गुंडाळून त्याचा ब्रश बनविल्या जायचा. त्याचा साहाय्याने नक्षी काढल्या जायची. कोरकू लोकसंस्कृतीत स्त्री, पुरुष, चंद्र, सूर्य, घोडा, बैल, नाग, मोर, बदक यांच्या प्रतिमा हमखास रेखाटल्या जातात. स्वस्तिक हे लोकचिन्ह देखील काढले जाते. चंद्र, सूर्य हे कोरकूंचे आवडती दैवते आहेत. सूर्य हा प्रकाशाचे प्रतीक, अंधाराचा नाश करणारा म्हणजे वाईट प्रवृत्तीचे निर्दालन करणारा चंद्राची शीतलता मनाला आराम देते, प्रसन्नता देते. दिवसभर केलेले कष्ट चंद्राच्या शीतल, मंद, प्रकाशात विसरल्या जातात. शरीराला

त्यामुळे आराम मिळतो त्यामुळे कोरकूंना चंद्र देखील आवडतो. यामुळेच चंद्र-सूर्य कोरकूची आराध्यदैवते आहेत. आणि ते कोरकूंच्या लोककलेत अग्रस्थानी आहेत. उदा....साप, विंचू, नाग, मोर, बदक, घोडा, बैल यासारख्या पशुपक्षांची चित्रे काढले जातात. पशूंच्या चित्रामध्ये घोडा व बैलांचे चित्र अत्यंत लोकप्रिय आहे. कोरकूच्या शेताचा तर आधारच बैल आहे. तर गायही त्यांना प्रिय वाटते. उर्जेचे प्रतीक असणारा घोडा व बदक, मोर यासारख्या पक्षांनाही कोरकूंनी आपल्या लोककलेत समाविष्ट केलेले आहे. काही ठिकाणी महाकाय हत्तीचे चित्रे आढळतात. विवाह हा कोरकू मध्ये एक प्रकारचा मोठा उत्सव असतो. लग्न घरी पूर्ण स्वच्छता केली जाते. भिंती सारवल्या जातात. दरवाज्याच्या आजूबाजूने वेलबुट्टीदार नक्षी काढले जाते. चुना, गेरू, रंगाने सारे घर उजळून निघते. कुंकाचे, हळदीचे हात भिंतीवर दरवाजाच्या दोन्ही बाजूने मारल जातात. मांगल्याचे प्रतीक व परमेश्वर प्राप्ती म्हणून त्याकडे पाहायात येते. निमाड परिसरातील कोरकू जिरोती सणाला सुंदर भिंत्तीचित्रे काढतात. गांगडीया कोरकूत मात्र या चित्रकलेचा अभाव आहे. कोरकू लोक नागपंचमीला नागाचे चित्र काढतात. त्याची पूजा करतात. दिवाळीच्या सणाला मात्र कोरकू परिसरात गोंडाची उपजमात असणाऱ्या थाट्या समाजाच्या स्त्रिया घरोघर फिरून गीत गाऊन घराबाहेरील भिंतीवर चित्र काढतात. चुना, गेरूच्या साहाय्याने ही चित्रे रेखाटतात. त्यात चंद्र सूर्याच्या प्रतिमा रेखाटतात. पहाडी कोरकूत धान्य ठेवण्याच्या कोठीवरील मातीपासून बनविलेली चित्रे मोठी विलोभनिय असतात. मोर, बदक यासारख्या पक्षाचे हावभाव ही चित्रे ठळकपणे दर्शवितात. यात काचेच्या तुकड्याचा खुबीने उपयोग केला जातो. पाण्यातील बदक, नाचणारा मोर, उभा मोर यासारख्या अवस्था त्या चित्रात ठळक : दिसतात. कोरकू ही

कलाप्रेमी जमात असून जीवनातील प्रत्येक क्षणाला ते आनंदाने जगण्याचा प्रयत्न करतात.

**गोंदण कला :**

आदिवासीमध्ये गोंदण्याच्या क्रियेला पूर्वीपासून महत्त्वाचे स्थान आहे. आदिवासीत परंपरेने गोंदण्याचे कार्य पूर्वी पासूनच गोंड जमातीच्या 'ओझा' या उपजमातीच्या स्त्रियांकडे आहे. त्यांचे पुरुष वैदू तर स्त्रिया बाजारहाट, जत्रायात्रा, गावात गोंदण्याचे कार्य करतात. गोंदण्यासाठी त्या बाभळीच्या झाडाचा काटा व बिब्याच्या तेलाचे काजळ वापरतात. गीत गात गात गोंदण्याची क्रिया त्या करीत असतात. या 'ओझा' जमातीच्या स्त्रियांना हा विधी देवतांच्या सात बहिणीपैकी घाटकी बहीण हेलाडबाई हिच्याकडून मिळाल्याचे त्या सांगतात. देवीच्या रुपाने हेलाडबाई माणसांना गोंदते. चांदा जिल्ह्यातील सिंगारमाता देवीची त्या पूजा करतात. एक कथा या बाबत प्रचलित आहे, ती म्हणजे सिंगारमाता या देवीजवळ तीन सूया होत्या. त्यात एक सोन्याची, दुसरी रूप्याची तर तिसरी लोखंडाची होती. त्यातील सोन्याची सुई देवीला टोचल्या जायची दुसऱ्या रूप्याच्या सुईने काजण्या गोवर टोचल्या जायच्या आणि तिसरी लोखंडाची सुई या देवीने ओझा स्त्रियांना गोंदण्यासाठी दिली. झाडपानाचा रस घेऊन शरीर गोंदायचे, स्त्रियांचे सौंदर्य अधिक खुलवायचे, रोगराईपासून दृष्टिबाधेपासून त्याचे संरक्षण करायचे, असा आदेश त्या देवीने दिला असा या ओझा स्त्रियांचा विश्वास आहे. आदिवासीमध्ये माणसाच्या मृत्यूनंतर त्यासोबत फक्त गोंदणे हेच जाते, असा विश्वास असल्याने बरेच जण काहीतरी शरीरावर गोंदून घेतात. गोंड आदिवासी जमातीमध्ये तर स्त्रिया सर्व शरीरभर गोंदून

घेतल्या जाते. विविध प्रकारच्या पारंपरिक नक्षी शरीरावर काढल्या जातात. फूल, बिरछत, सीताफळ, ठिपका, बोडा, पोथी, मछली, झाडाची पाने, साप, विंचू, वेल, देवदेवतांची चित्रे, चंद्र-सूर्य, नावे यामध्ये रेखाटल्या जातात. कोरकू पुरुष मात्र स्त्रियांच्या तुलनेत एकदम कमी गोंदूण घेतात. शरीरावर गोंदणे म्हणजे शुभ लक्षण असा कोरकू जमातीत लोक संकेत आहे. त्यालाच धार्मिक अधिष्ठान प्राप्त झाल्याने विधी म्हणून त्याकडे पाहिल्या जाते. 'गोंदण नसेल तर स्वर्गाची दारं बंद होतात असा कोरकू लोकांचा समज आहे.' आदिवासी कोरकू जमातीतही गोंदण्याची परंपरा पूर्वीपासून अस्तित्वात आहे. आता मात्र काळानुसार या गोंदण क्रियेत अनेक बदल झालेले आहेत. आता व्यवसाय हा अनेक जाती जमातीचे लोक करीत आहेत. यंत्राच्या साहाय्याने केमिकल वापरून गोंदल्या जात आहे तरीही गोंदण कलेची लोकप्रियता आजही कायम आहे.

**मेंहदी** :

कोरकू जमातीमधील स्त्रियांमध्ये मेंहदीचे प्रचलन पूर्वीपासून आढळून येते. सण, उत्सव,विवाहासारख्या मंगल प्रसंगी स्त्रिया हातावर मेंहदी काढतात. मेंहदीचे दोन प्रकार कोरकू जमातीत आहेत. त्यातील पहिला प्रकार म्हणजे संयोगपरक मेंहदी, हिला सौदर्याचे व अलंकाराचे प्रतीक मानतात तर वियोगपरक मेंहदी पती अथवा प्रियकराच्या वियोगात काढल्या जाते. पूर्वी कोरकू स्त्रिया जंगलात मिळणाऱ्या मेंहदीच्या पानापासून हात रंगवित. यासाठी मेनाचा उपयोग होत होता. नंतर त्या पानाना कुटून हात रंगविला जात. आता मात्र

बाजारात तयार मिळणाऱ्या मेंहदीचे प्रचलन वाढले आहे. मेंहदी लावणे म्हणजे शुभशकून सौभाग्याचे प्रतीक मानल्या जाते. मेंहदी ही एक वनौषधी देखील आहे. विशेषतः सुवासिनी स्त्रिया हमखास मेंहदी लावताना दिसतात. हातावर मेंहदीने मोर, विंचू, मासा, कमळ, चौकोन, कळस, बारीक वेलीचे नक्षीकाम, कुयरी, स्वस्तिक यासारख्या रचना काढल्या जातात.

कोरकूचे जीवन अशा विविध लोककलांनी नटलेले आहे. ह्या सर्व लोककला त्याच्या संघर्षाच्या जीवनात सुंदरतेचे रंग भरतात. त्यांना आनंद देतात.

**पशुपक्षासंबधी समज गैरसमज**

कोरकू आदिवासी अनेक पशूंचे पालन पोषण करताना दिसतात. त्यांच्या दैनंदिन जीवनात या पशूंचा त्यांना पावलोपावली उपयोग होत असतो. बैल, गाय, म्हैस, शेळ्या, मेंढ्या हे त्यांचे पशूधन असते. बैल तर त्यांच्या शेतात रात्रदिवस राबत असतात. त्याच्या साहाय्याने शेतीची कामे केली जातात. कोरकू प्रदेशात गावरान बैलांच्या अनेक जाती प्रजाती आढळतात व तेथील हवामानात विकसित देखील होत असतात. मध्यम आकाराचे, रंगीबेरंगी, लहान पोटाचे बैल कोरकूंच्या डोंगरी शेतीसाठी फार उपयोगाचे ठरतात. याशिवाय गाय त्यांची दुधाची गरज पूर्ण करते. त्यापासून त्यांना गोधनही प्राप्त होते. अनेक कोरकूंनी म्हशी देखील पाळल्याचे दिसते. शेळया, मेंढया याचेही पालन पोषण कोरकू करतात. अडीअडचणीच्या काळात नगदी पैशासारखे हे पशुधन त्यांच्या उपयोगात येते. अनेक कोरकू धरी, शेतात कुक्कुट पालन करतात. प्रसंगी त्यामुळे अंडी व मांस

घरीच उपलब्ध होते. वरील प्रकारच्या गुराढोंराचा कोरकूंच्या जीवनाशी जवळचा संबंध असतो. आदिवासी कोरकूंच्या परिसरातून अनेक नद्या वाहतात. त्या नद्यांच्या किनाऱ्या लगत कोरकूंची गावे वसलेली आहेत. नर्मदा, तापी, पूर्णा, सिपना, सापन, चंद्रभागा, खंडू, गडगा ह्या प्रमुख नद्या या परिसरात वाहतात. यातील काहींना बाराही महिने पाणी असते. तर काही पावसाळया पूरत्या वाहतात. याशिवाय अनेक छोट्या मोठ्या नदया, तलाव, नाले या भागात आहेत. कोरकू या नद्यामध्ये थोडीफार मासेमारी करतात. पूर्वी कोरकू जमात मांसाहारासाठी शिकारीवर अवलंबून असायची. जंगलात सांबर, हरिण, रानडुक्कर, मोर यांची समूहाने ते शिकार करत असत. मिळालेल्या सावजाचे समान हिस्से करून ते आपआपसात वाटून घेत होते. परंतु आता शिकारीवर निर्बंध आल्याने त्यांची शिकार इतिहास जमा झालेली आहे. आता कोरकूचा मांसाहार बाजारात मिळणाऱ्या मासावर अवलंबून आहे.

**प्रकृती, यात्रा, वृक्षासंबंधीचे विश्वास :**

'धरणी आमची माती आम्ही तिचे पुत्र' हा आदिवासी जीवनाचा मूलमंत्र आहे. धरती, निसर्ग, माती यांच्या सानिध्यात राहणारी ही धरतीची लेकरे रानावनात मुक्त जीवनाचा आस्वाद घेतात. भोवतालच्या निसर्गाचा त्यांना अचूक अंदाज असतो. आदिवासी आणि जंगल यांचा अन्योनसंबंध आहे. त्यांना एकमेकांपासून वेगळे करता येत नाही. आदिवासींचा संचार पूर्वीपासून जंगलात असल्याने त्यांना निसर्गाच्या विविध गोष्टीचे उपजतच ज्ञान प्राप्त असते. झाडे, पशु, पक्षी, नद्या, कीटक यापैकीच एक घटक म्हणून ते वावरत असतात.

कोरकू जमातीचे वास्तव्यही पूर्वीपासून सातपुडयाच्या जंगलात आहे. मेळघाट, निमाड, बैतूल, हरदा हा प्रदेश सातपुड्याच्या पर्वतरांगानी व्यापलेला आहे. त्यात कोरकूंची गावे वसलेली आहेत. गावाच्या सभोवती त्यांना जंगलाशिवाय दुसरा कुणी सोबती नसतो. पूर्वीच्या काळात तर कोरकूंचे संपूर्ण जीवनच जंगलातील विविध गोष्टीवर अवलंबून होते. लहानपणापासून जंगलभ्रमंती त्यांच्या अंगवळणी पडलेली असायची. पहाटे पासून तर रात्रीपर्यंत त्यांचा जंगलात मुक्त संचार असायचा. सातपुड्याच्या जंगलात मिळणारी कंदमुळे त्याचे मुख्य खाद्य होते. दर्दी, बायल, सिडको, पशु यासारखी कंदमुळे ते पाण्यात उकळून किंवा भाजून खात होते. याशिवाय जंगलातील विविध पशूपक्षांची शिकार त्याचा प्रमुख व्यवसाय होता. जंगलातील हरिण, सांबर, डुक्कर, मोर यांची शिकार ते करीत असत. शिकारीवर बंदी आल्याने अनेक गोष्टींना ते मुकले आहेत. तरीही जंगलातील अनेक गोष्टी आजही त्यांच्या जीवनाचा महत्त्वाचा भाग आहे.

'मद्य' हे आदिवासीचे आवडते पेय आहे. मोहाच्या फुलापासून ते मद्याची निर्मिती करतात. बरेचदा धरी किंवा नदीवर पाण्याच्या ठिकाणी दारुच्या भटटया असतात. अनेक परिवार आपल्या धरात दारू काढतात. स्त्रिया व पुरुष या दोघांनाही ते आवडते पेय आहे. दारू बनविवण्याच्या प्रक्रियोत मोहाची फुले गोळा करून त्यांना कुजविल्या जाते. त्या फुलांना पाण्यात भिजवत ठेवतात. त्यामुळे त्याला गंध सुटतो. ती फुगतात. त्यांची तोंड उमलतात. म्हणजे ती दारु बनविण्यासाठी तयार झाल्याचे समजते. त्यानंतर त्या फुलांना एखाद्या डब्यात उकळल्या जाते. त्यावर एखादी भरणी किंवा डब्बा उबडा ठेवतात. त्याला लिंपून घेतात म्हणजे वाफ बाहेर जाऊ नये. त्यावर बास्याची नळी बांधली जाते. त्या नळीद्वारे डब्यातून वाफ बाहेर पडत जाते. तीच

दारू असते. साधारणपणे एक किलो मोहाच्या फुलात दीड किलो दारू निघते, असे कोरकू सांगतात. कोरकू स्त्रिया पुरुष दोघेही दारू प्राशन करतात. दारुला कोरकू बोलीत 'शिडू' म्हणतात. कुठल्याही सणसमारंभात, विवाह, दसवा, सिडोली, बाजाराच्या दिवशी हमखास दारू घेतला जाता. लग्नाप्रसंगी, सिडोली कार्यासाठी तर बरेच दिवस अगोदर दारू घरात काढून ठेवव्यात येतो. आता मोठ्या गावात देशी दारुची दुकाने निघाल्याने त्याचेही प्रचलन वाढले आहे.

**वनौषधी, गुरे, मासेमारी व शिकार :**

जंगलात फिरताना आदिवासींना वृक्ष, वेली, कंदमुळे, झाडपाला, फळे, फुले याविषयींचे ज्ञान आपसूकच प्राप्त होते. रानावनात फिरतांना अनेक औषधी वनस्पतीचे गुणधर्म त्यांना माहिती असतात. आदिवासीमध्ये असे काही जाणकार लोक असतात की ज्यांना त्यांच्या पूर्वजाकडून ही विद्या प्राप्त झालेली असते. विविध प्रकारचे आजार, रोग, बिमाऱ्या, साथी पसरल्यानंतर कुठली औषधी दयावी? कुठला झाडपाला दयावा? हे त्यांना पक्के माहीत असते. कोरकू लोकामध्ये सुद्धा अनेक गावात अशा प्रकारचे व्यक्ती सापडतात की, जे अशा प्रकारच्या रोगावर, बिमाऱ्यावर जंगलातील वनौषधीने उपचार करतात. सातपुड्याच्या पर्वतरांगामध्ये विविध प्रकारची झाडे, वेली, वनस्पती, कंदमुळे, जडीबुटी सापडतात. येथील आदिवासी त्यांचा मोठ्या खुबीने वापर करताना दिसतात. त्या वनौषधीचे गुणधर्म त्याचा नेमका उपयोग त्यांना ठाउक असतो. काही वनस्पति मौसमानुसार ऋतुनुसार मिळतात. त्याचा योग्य तो साठाही या लोकांजवळ असतो. अनेकदा जंगलात फिरून

ताज्या वनौषधीने उपचार केला जातो. निसर्ग पूजक असणारे आदिवासी या नैसर्गिक शक्तींना दैवत मानून त्यावर श्रद्धा ठेवून या वनौषधी द्वारा उपचार केला जातो. निसर्ग पूजक असणारे आदिवासी या नैसर्गिक शक्तींना दैवत मानून त्यावर श्रद्धा ठेवून या वनौषधीं देतात. सर्व काही देवावर सोपवून रुग्णाला दिलासा देण्याचा प्रयत्न करतात. 'बेल' ही वनस्पती सातपुड्यात सर्वत्र सापडते. बेलाच्या फळा मधील बिया काढल्यावर त्यात गूळ किंवा साखर टाकून त्याचा मुरब्बा बनवितात व त्याचा उपयोग पोटाच्या विकारावर उपचारासाठी करतात. जंगलात मिळणाऱ्या मधात आवळा कुटून टाकतात. त्याचे सकाळ-संध्याकाळ सेवन केल्याने रक्त शुद्ध होऊन शरीरातील अनेक व्याधी दूर होतात. 'शतावरी' व 'राताअंबाडीची' मुळे एकत्र करून त्याचे औषध बनवितात व धातूच्या रोगावर ते देतात. एखाद्या गुराढोराच्या पोटात काच गेल्यास 'आधाड्या' चा पाला घेऊन त्याचा रस पाजतात. त्यामुळे त्या काचाचे पाणी होते, असा त्यांचा विश्वास असतो. जंगलात मिळणारे लहान गोल 'जंगली टमाटे' वनौषधी म्हणून वापरतात. मधुमेहाच्या रोगावर 'बिजा' झाडाची साल कुटून त्याचे औषध देतात. सागाच्या झाडाच्या सालीची पावडर बनवून पोटाच्या विकारावर वापरतात. आंब्याच्या झाडाची साल कुटून त्याचा रस दिल्याने रक्तदाब, पातळ संडास असे आजार बरे करतात. 'शंखपुष्पी', 'बाईबडांग', व 'गुंज' झाडाच्या पानाची पेस्ट तयार करून ते तुपात देतात. त्याने बुद्धी तेज होऊन विकास होते. 'भुईनिंब' (ओटेलिंबो) चे चूर्ण दिल्याने पोटाचे विकार दुरुस्त करतात तर 'हिळ्ळा' झाडाचे फळ, 'जायफळ', 'अजवायन', 'लवंग' याचे चूर्ण करून सर्दी जुकाम दूर करतात. 'रानमोगरा' (बादरसिटी) झाडाच्या पानाची पावडर देऊन टी.बी. या रोगावर इलाज केल्या जातो. 'बनसिगाडा',

'उत्तमसागर', 'क्युकंद' या वनस्पती किडनी, वात, वॉलखराबी, कॅन्सर सारख्या रोगावर वापरतात. जंगलात सापडणारे 'इंद्रावण', पोटदुखीवर तर 'कडूजिरा', 'कडूपान' तापावर उपाय म्हणून दिला जाता. 'नारभय' या वनौषधीचा उपयोग महिलांच्या मासिक पाळीच्या समस्येकरिता केला जातो. 'पळस', 'तिनसा' याचा उपयोग पुरुषामधील कमजोरी दूर करण्याकरिता केला जातो. 'निरगूड' वनस्पतीची वाळलेली पाने वातरोगावर उपयोगात आणल्या जातात. एखाद्या व्यक्तीला भूताने किंवा बाहेरील शक्तीने झपाटल्यास त्याला 'पिंपळाचा लाख', 'लिताब', 'मसनऊद प्राण्याचे केस' किंवा चामडे याची धुनी देतात. आदिवासी यासारख्या अनेक वनौषधीचा दैनंदिन जीवनात वापर करतात. बैलाचा पाय मोडल्यास 'इफिल झारा', 'साकोम झारा' ठेचून बांधतात. हे सर्व उपाय त्यांच्या पूर्वज्ञानावर आधारित असतात. या उपचाराचा फारसा मोबदला देखील घेतल्या जात नाही. गावातच एकदम कमी मोबदल्यात ही वनौषधी मिळत असल्याने, कोरकूंचा ती घेण्यावर जास्त भर असतो. कोरकूंच्या प्रदेशात अनेक वृक्ष आढळतात. मोह, आंबा, सालई, लिंब, वड, पिंपळ, साग, जांबूळ या झाडांचा उपयोग ते आपल्या दैनंदिन जीवनातील विविध कामांसाठी करतात.

**कौटुंबिक जीवन** :

काळानुसार कोरकूंच्या कौटुंबिक जीवनाला आकार प्राप्त झाला आहे. पूर्वी भटकत्या अवस्थेत निसर्गाच्या सानिध्यात स्वच्छंदी जीवन जगणारी ही जमात आता गावागावात स्थायिक झाली आहे. पूर्वीच्या पाटोब्याव, सहपलायन, घरघस्सु, लामझना सारख्या प्रथांचे प्रचलन कमी होत चालले आहे. थोडया कालावधी करीता

का होईना कोरकू शेती करू लागले आहेत. शेतीमधील कामे संपली की रोजगारासाठी स्थलांतर मात्र बंद झालेले नाही. गावातील कुटुंबाची संख्या वाढत चालली आहे. शिक्षण, आरोग्य, माहिती-तंत्रज्ञान, दळणवळणाच्या वाढत्या प्रसारामुळे कोरकू जमातीमधील जुनी मूल्ये नाहीशी होत चालली आहेत. अनेक गावातून तर मूळ कोरकू संस्कृतीच लोप पावत चालली आहे.

**कोरकू कुटूंब** :

कोरकू जमातीमध्ये साधारणपणे लग्नानंतर कुटुंब वसवितात. एखादया कुटुंबातील लहान मुलाचे लग्न झाले की मोठा मुलगा वेगळे कुटुंब थाटतो. घराच्या बाजूला जागा असल्यास तेथे किंवा गावातील घरांच्या रागेत शेवटी तो घराची निर्मिती करतो. गावात घराच्या अनेक रांगा असल्यास शेवटच्या रांगेत घर बांधल्या जाते. सुरुवातीला सोयीनुसार घराची निर्मिती केल्या जाते. कुटूंबात पती, पत्नी, मुले राहतात. एखादया मुलाजवळ त्याचे आईवडील असतात. कोरकू जमातीत एकविवाह कुटुंबाचे जास्त प्रचलन आहे. काही ठिकाणी द्विपत्नी विवाह घडून येतो. बहुपत्नी अपवादात्मक परिस्थितीत घडतात. पहिला विवाह हा साधारणपणे 'गोनम ब्याव' असतो. या विवाहाला कोरकू जमातीत प्रतिष्ठा व सन्मानाने बधितला जातो. अनेकदा ओळखी, नातेसंबंधातून प्रेमसंबंध झाल्यास सहपलायन करतात. गोत्राची जुळणी, समाजमान्यता मिळाल्यानंतर त्याला मान्यता मिळते. एखाद्या स्त्रीला अपत्यप्राप्ती होत नसल्यास दूसरी बायको केली जाते. अनेकदा  कुटुंबात पाटोब्याव होतो. त्यालाही समाज मान्यता देतो. पाटोब्याव सोबत बरेचदा त्या स्त्रीसोबत

पूर्वीच्या कुटुंबातील मुलेही येतात. त्यामुळे कोरकू त दोन प्रकारचे पितृत्व आढळते. पहिले जे प्रत्यक्ष प्रजननासाठी जबाबदार आहे तो पिता व दुसरे म्हणजे आयते मिळालेले पितृत्व. त्यामुळे परिस्थितिनुरूप कुटुंबात व्यक्ती राहतात. म्हातारी माणसे, पती-पत्नी, मुले यांनी कुटुंब आकाराला येते. त्यात एखाद्या वेळी लामझना व त्यांची पत्नी यांचीही भर पडते. कोरकू जमातीत पितृसत्ताक कुटुंबपद्धती असल्याने कुटुंबातील सर्व व्यवहार प्रमुख व्यक्तीच पाहतो. संपूर्ण कुटुंबाकरिता अत्यावश्यक अन्न वस्त्र निवारा याची व्यवस्था लावणे पुरूषाकडे असते. दैनंदिन व्यवहारासाठी तोच जबाबदार असतो. अपरिहार्य परिस्थितीत कुटुंबाचे प्रमुखपद स्त्रियांच्या कडेही असते. तसेही कोरकू कुटुंबात स्त्रियाची भूमिका महत्त्वाची आहे. एखादा मुलगा लग्नानंतर वेगळा संसार थाटत असल्यास त्याला आवश्यक ते सामान दिला जातो. परंतु स्थावर मालमत्तेची वाटणी म्हाताऱ्या माणसाच्या सल्ल्यानुसार केल्या जाते. मुलाचे कुटुंब जरी वेगळे झाले तरी म्हाताऱ्या माणसाकडे, भावंडाकडे त्यांना लक्ष द्यावे लागते. कोरकू जमातीत साधारणपणे तीन प्रकारचे परिवार दृष्टीस पडतात. यापैकी पहिला परिवार म्हणजे प्राथमिक परिवार यामध्ये पती, पत्नी व त्यांच्या मुलांचा समावेश असतो. दुसरा एकत्र परिवार म्हणजे पती, पत्नी, मुले, आजी, आजोबा इतर भावंडांचा समावेश असतो. तर तिसरा परिवार म्हणजे संयुक्त परिवार. यात दोन ते तीन पिढीतील लोक एकत्र नांदताना दिसतात. अशा परिवारांची संख्या कोरकूत अगदी कमी आहे. डॉ. अशोक पाटील यांनी कोरकू परिवाराच्या विकासा संदर्भात आठ भागात वर्गीकरण केले आहे. त्यात त्यांनी भटक्या अवस्थेपासून तर एकविवाह परिवारापर्यंतचा आढावा घेतलेला आहे. एकंदरीत कोरकू जमातीमधील कुटुंब व्यवस्था लवचीक स्वरूपाची असून काळानूसार होणारे बदल तिने

आत्मसात केले आहेत.[३]

**कोरकू कुटुंबाचा दिनक्रम** :

कुठल्याही कुटुंबाचा दिनक्रम त्या कुटुंबाच्या व्यवसायावर ठरत असतो. जसा व्यवसाय, काम तसा दिनक्रम. कोरकू जमातीचा मुख्य व्यवसाय शेती, शेतीमजुरी, पशुपालन हा आहे. कोरकू ग्रामात फार थोड्या लोकांकडे स्वतःच्या मालकीची शेती आहे. काहींना सरकारकडून जमिनीचे पट्टे मिळालेले आहेत तर काहीची शेती वनजमिनीवरील अतिक्रमित शेती आहे. इतर लोक मात्र शेतमजुरी करून आपला उदर-निर्वाह भागवितात. इंग्रज येण्याअगोदर कोरकू जमातीचे लोक मात्र प्रामुख्याने जंगलभ्रमती, शिकार, मासेमारी करून आपली गुजरात करीत असत. इंग्रजांनी हा प्रदेश ताब्यात घेतल्यावर त्यांनी वनख्यात्याची निर्मिती करून आदिवासी कोरकूंना जंगलातून बेदखल केले. जंगलातील कोरकूच्या शेतीवर निर्बंध आले. त्या बरोबरच इंग्रजांनी शिकारीवर बंदी आणल्याने त्यांचा शिकारीचा व्यवसाय बंद झाला. त्यामुळे दऱ्याखोऱ्यातील कोरकूंनी मैदानी प्रदेशात स्थलांतर केले तर काहींनी लाकूड कटाई, बांबू तोडणी अशी दनखात्याची कामे मिळाली. स्वातंत्र्योत्तर काळात वनखात्याचे निर्बंध कायमच राहिले. उलट व्याघ्र प्रकल्पाच्या निर्मितीसाठी जंगले संरक्षित करण्यात आली, त्यामुळे आदिवासीची अनेक गावे विस्थापित झाली. जंगलभ्रमतीवर पूर्णपणे बंधने आली. तरीही आदिवासी कोरकूंनी आपला शेतीचा व्यवसाय चालू ठेवला व त्यानुरुप त्यांचा दिनक्रम बनला. कोरकूंचा दिनक्रम पहाटेच सुरु होतो. सुर्योदय झाल्यावर माणसे गुराढोरांचा गोठा साफ करून

शेतीच्या कामासाठी निधून जातात. रात्रीची उरलेली भाकरी, खिचडी असल्यास त्याची न्याहारी केली जाते. काही घरात बायका न्याहारीसाठी भाकर, खिचडी बनवितात. पुरुष शेतावर गेल्यानंतर स्त्रिया धरातील स्वच्छता आटोपून स्वयंपाक बनवितात. शेतावर नवऱ्यासाठी दुपारच्या शिदोरीसह निधून जातात. घरी म्हातारी माणसे, मुले असतात. त्यांच्यासाठी स्वयंपाक ठेवल्या जाते. घरात दिवसातून दोन वेळा स्वंयपाक बनविल्या जातो. सकाळी भाकरी भाजी बनवितात तर सायंकाळी खिचडी सारखा पदार्थ बनवला जातो. स्वस्त धान्य दुकानात आता गहू मिळू लागल्याने पोळयाही बनविल्या जात आहेत. शेतात पिकणाऱ्या धान्याबरोबरच इतरत्र उपलब्ध साधनांचा आहारात समावेश ते करतात. सण, उत्सव, बाजाराच्या दिवशी शेतातील कामे बंद ठेवतात. सणाला पुरी, भाजी, मांसाहारी पदार्थ बनवले जातात. सर्वत्र मद्य सहज मिळत असल्याने त्याचे सेवन नेहमीच सेवन नेहमीच केल जात.

कोरकूच्या शेतीमधील हंगाम भवई सणापासून सुरु होऊन दिवाळीपर्यत चालतो. कोरकू दाम्पत्य एकमेकांच्या सहकार्याने शेतीची सर्व कामे करतात. प्रसंगी शेतीच्या कामासाठी लहान मुलांनाही नेल्या जाते. हंगामाच्या दिवसात तर अनेक कुटुंबे शेतातच मुक्कामी असतात. कोरकूंचा परिसर जंगलाने व्यापलेला असल्याने अनेक जंगली प्राणी शेतातील पिकाची नासाडी करतात. अशावेळी पिकाची रखवाली करण्या करीता चोविस तास शेतातच राहावे लागते. रात्रीच्या वेळी जागल करावी लागते. त्यामुळे लहान मुले वगळता बरीचशी कुटुंबे शेतातच मुक्काम ठोकतात. दिवाळीनंतर शेतामधील कामे संपल्यावर कोरकू जमातीचे लोक रोजगारासाठी मोठया प्रमाणावर स्थलांतरित होतात. विदर्भ, उर्वरीत महाराष्ट्र, मुंबई पर्यत जे मिळतील ती

कामे करतात. साधारणपणे कुटुंबातील कर्ते स्त्री-पुरुष यात सहभागी असतात. त्यांच्या सोबतीने गावातील अनेक जण त्यांच्या सोबत जातात. गावात म्हातारी माणसे, मुले असतात. गुराढोरांकडे लक्ष, घराची राखणदारी ते करीत असतात. कामासाठी बाहेरगावी गेलेली माणसे सापडेल त्या ठिकाणी निवाऱ्यासाठी आश्रय घेतात. शेतमजुरी, विटभट्ट्या, रस्त्याची कामे, जिनिंग-प्रेसिंग, एम. आय. डी. सी मधील कामे करून उदरनिर्वाह करतात. तेथे परिस्थितिनुरूप कोरकूचा दिनक्रम बदलत जातो.

**कोरकू जमातीमधील मुले व म्हातारी माणसे** :

कोरकू जमातीत गरिबी, दारिद्र्य, निरक्षरता यांचे प्रमाण अधिक आहे. कुटुंबनियोजना बाबतही कोरकू मागासलेले असल्याचे दिसते. एक मूल झाल्यावर पुन्हा एका वर्षाच्या आत अनेकांना दुसरे अपत्य होते, अशी मुलांची संख्या बरीच असल्याने त्याच्याकडे लक्ष देण्यास आईवडिलांना वेळ नसतो. लहानपणापासूनच मुले गावात भटकत राहतात. अंगणवाडीत जाण्यास त्यांना स्वारस्य नसते. आई-वडील शेतात किंवा कामासाठी बाहेरगावी गेल्यास मुले गावात, जंगलात, गुराढोरांमागे फिरतात. बऱ्याच मुलांना त्यांचे पालक गुरेढोरे चारावयास पाठवितात. मुले मोठे झाल्यावर त्यांना शाळेत दाखल केल्या जाते, आश्रमशाळेत टाकल्या जाते. परंतु मुलांचे शाळेत लक्ष नसते. अनेक जण आपल्या लहान भावंडांचे संगोपन करतात. त्यामुळेही कित्येकांना शिकता येत नाही. शाळांचा सुमार दर्जा, शिक्षकांची अनास्था यामुळेही कोरकू मुलांबाबत त्यांच्यांत आत्मियता निर्माण होत नाही. शाळेत मराठी किंवा हिंदी माध्यमातून शिकविल्या जाते. घरात कोरकू

मातृभाषा असते. त्यामुळे लहान मुलाची स्थिती गोंधळल्यासारखी होते. काही जागरूक कुटुंबे मात्र मुलांच्या शिक्षणाकडे अधिक लक्ष देतात. नियमित मुलांना शाळेत पाठवितात. शिष्यवृत्तीचा फायदा घेतात. डी.एड.बी.,एड. यासारख्या पदव्या घेतात व नोकरीसाठी वणवण फिरतात. त्यांनी धड शेतीही करता येत नाही व नोकरीही लागत नाही. बेरोजगारी हा सुद्धा कोरकू जमातीचा मुलांसमोर निर्माण झालेला मोठा प्रश्न आहे.

बरेचदा कुटुंबातील म्हातारी माणसेही शेतावर जातात. मुलांचे संगोपन करतात. काही थकलेली वयोवृद्ध माणसे मात्र गावातच राहतात. घराची राखणदारी, लहान मुलांचे संगोपन, गुरेढोराकडे लक्ष देतात. फावल्या वेळात एखाद्या ओटयांवर बसून जुन्या आठवणीत रमून चिलिमेचा आस्वाद घेत आपले अनुभव ते इतरांना सांगतात. अपरिचित माणसांना त्यांना बोलते करण्यासाठी फार प्रयत्न करावे लागतात. एकदा विश्वास संपादन केल्यावर मात्र ते अधिक खुलेपणाने वागतात, बोलतात. जुन्या आठवणी, किस्से सांगतात. म्हाताऱ्या माणसांना नव्या पिढीचे वागणे, वर्तन मात्र खटकते. पण त्याला काही उपाय नाही, ते ऐकत नाहीत हेही त्यांना ठाऊक असते. त्यामुळे एका मर्यादेपर्यंत सांगून ते मोकळे होतात. कोरकू जमातीमधील निराधार वयोवृद्ध लोक इतरांच्या आश्रयाने राहतात. विधवा, परितक्त्या आपल्या नातेवाईकांच्या आश्रयाने राहतात. एकंदरीत कोरकू जमातीत म्हातारी माणसे, स्त्रिया यांना आपुलकीने वागविल्या जाते. अपवादात्मक परिस्थितीत एखादे वयोवृद्ध दाम्पत्य वेगळे राहून आपला उदरनिर्वाह करतात.

**कोरकू जमातीमधील स्त्रियांचे स्थान** :

कोरकूंच्या कौटुंबिक जीवनात स्त्रियांना महत्वाचे स्थान आहे. एखाद्या कुटूंबात मुलांचा जन्म झाल्यास आनंद मानल्या जातो. मुलगा किंवा मुलगी यात फारसा भेद केल्या जात नाही. मुलांप्रमाणे तिलाही कुटुंबातील विविध प्रकारची कामे करावी लागतात. लहान भावंडाचे पालनपोषण, घराची स्वच्छता, पाणी आणणे, कपडे-भांडी धुणे यासारखी कामे मुली लहानपणापासूनच करतात. आता शिक्षणाच्या सुविधा वाढल्याने मुलींना शाळेत घातल्या जाते. गावात शाळा असे पर्यंत त्या शिकतात नंतर सुद्धा इतर मोठया गावात शाळेत, आश्रमशाळेत, वस्तीगृहात राहून शिकण्याचा प्रयत्न करतात. काही मुली मात्र लहान वयातच शाळा सोडून आई-वडिलांना संसाराच्या कार्यात मदत करतात. घरकामाबरोबरच शेतीची कामे त्यांना करावे लागतात. पूर्वी कोरकू जमातीत बालविवाह होत असत. आता मात्र हे प्रचलन बंद झाले आहे. तरीही वयाच्या १६ ते १८ वर्षाच्या दरम्यान एखाद्या चांगल्या स्थळाची मागणी झाल्यास मुलीचे लग्न करण्यात येत. कोरकू जमातीत विवाहाच्या वेळी वराला वधूच्या वँडिलांना गोनम द्यावे लागते. कोरकू त्याला गोनम देऊन 'औरत खरीदना' असे म्हणतात. अनेक लोक चांगले गोनम घेऊन मुर्लीचे भवितव्य न पाहता कुठेही लग्न लावून देतात. त्यामुळे त्या स्त्रीला आयुष्यभर कष्ट सोसावे लागतात. तिची सतत उपेक्षा होत राहते. विवाहानंतर कोरकू स्त्रियांवर अनेक जबाबदाऱ्या येऊन पडतात. अपत्यप्राप्ती, मुलांचे संगोपन, कौटुंबिक जबाबदाऱ्या सोबतच शेतीची कामेही तिला करावी लागतात. पहाटे धराची स्वच्छता, स्वयंपाक, दळणकांडण, शेतीही कामे त्या करतात. अनेक गावातील स्त्रियांना दळण घेऊन दुसऱ्या गावाला जावे लागते. दूरून पायपीट करून पाणी

भरावे लागते. मोळया विकून पोट भरावे लागते. वेळप्रसंगी शेतात रात्रीअपरात्री एकटीला राखणदारी करावी लागते. एवढे करूनही पुरूष दारू पिऊन त्यांना मारहाण करतात. धरातून हाकलून देतात. यामुळेच कोरकू स्त्रिया कमालीच्या सहनशील असतात. ऋतूस्त्रावाच्या वेळी कोरकू स्त्रियांना वेगळी वागणूक, मिळते. घराच्या मागील ओसरीत तिला राहावे लागते. सर्वाच्या शेवटी त्या जेवतात. सर्वजण शेतात गेल्यावर त्यांना आंघोळ, घराची स्वच्छता करावी लागते. कोरकू पुरुष काही प्रमाणत आळसी, व्यसनी, चालढकल करणारे असतात. अशी स्थितीत स्त्रियांना दुहेरी भूमिका पार पाडावी लागते. एखाद्या कुटुंबात घुसमट होत असल्यास ती अन्याय सहन करीत नाही तर अशाप्रसंगी कोरकू स्त्री पाटोब्याव करून मोकळी होते किंवा एखाद्या परपुरुषासोबत पळून जाते. पतीलाही त्याचे काही वाटत नाही. तोही दुसऱ्या एखाद्या स्त्री सोबत लग्न करून मोकळा होतो. लामझना विवाह झाल्यास स्त्रीला माहेरीच पतीसोबत राहावे लागते, अशा स्थितीत आपल्या स्वाभिमानाला धक्का न लागू देता त्या संसार करतात. नवऱ्याला घेऊन वेगळा संसार थाटतात. सण, उत्सव, जत्रा, बाजार अशाप्रसंगी कोरकू स्त्रिया नवऱ्यासोबत सावली सारख्या असतात. कोरकू पती-पत्नीचे एकमेकांविषयीचे प्रेम हे दृढ असते. स्वातंत्र्योत्तर काळात पंचायतराज व्यवस्थेमुळे अनेक स्त्रियांना ग्रामपंचायत पंचायत समिती, जिल्हा परिषद अशा ठिकाणी प्रतिनिधित्व करण्याची संधी मिळू लागली आहे. त्यातही बहुतांश पुरुषच या महिलांच्या नावावर सत्ता चालवित असल्याचे दिसते. शहरात स्थायिक झालेल्या कोरकू स्त्रियांचे मात्र झपाट्याने शहरीकरण होत असल्याने त्या सर्व स्तरावरील परिवर्तनाच्या वाटेवर अग्रेसर झाल्या आहेत.

**मित्रता व वैरत्व**

कोरकू जमातीमचे लोक खतःला इतरापेक्षा श्रेष्ठ समजतात. त्याच्या आसपास निवास करत असलेल्या इतर आदिवासीना ते आपल्या बरोबरीच नाहीत. त्यांचा ते योग्य सन्मान करतात मात्र आपल्या जातो विषयक बाबीमध्ये किंवा-धार्मिक जीवनात त्यांना कम देत नाहीत. कोरकू ही शांतप्रिय जमात आहे. इतर जमातीशी काही बाद किंवा मांडण तंरा उदभवल्यास जमातीमघोल जेष्ठ नागरिकांचा सल्ला घेऊन मार्ग काढतात. कुठल्याही विशिष्ट जमातीशी त्याचे वैर असल्याचे दिसत नाही.

**वैश्विक तत्वाया जोवनाक्रोल प्रभाव**

धरती, आकाश, चंद्र-सूर्य यांना कोरकूंनी देवत्व बहाल केले आहे. धरती म्हणजे जीवन. तिच्या भरवशावरच मानवाचे जीवन अवलंबून असते. धरतीला ते मातेसमान मानतात. आकाश म्हणजे बाप. तो पाऊस पाडतो. त्यामुळे पृथ्वीवरील सर्व जीवांचे भरणपोषण होतो. आदिवासींचे तर जीवनच निसर्गाच्या सानिध्यात असते. सूर्याचे तेज, चंद्राची शीतलता यांचा संबंध ते जीवाच्या आत्म्याशी जोडतात. सूर्य निघाला की अंधार नष्ट होतो. सृष्टी उजळून निधते. अंधारातील भुत-प्रेतासारख्या गोष्टी नाहीशा होतात. चंद्राच्या शीतलतेमुळे मानवाला शांती लाभते. त्यामुळेच त्यांनी आपल्या लग्न प्रसंगासोबतच फुलजागनी सारख्या आत्म्याला शांती देणाऱ्या विधीत चंद्र-सूर्याला विशेष महत्त्व दिले आहे. मांडवातील खांब, सिडोलीचा मुंडा या दोन्हीवर ते चंद्र-सूर्याच्या आकृत्या कोरतात. बरेचदा या देवदेवतांच्या प्रतिमा लाकडावर कोरल्या जातात.

डोंगरदेव कोरकूंचा एक देव आहे. दऱ्याखोऱ्यात जीवन जगणारी ही जमात पूर्वीपासूनच डोंगरावर अवलंबून आहे. त्यामुळे त्याविषयीची श्रद्धा त्यांच्या मनात पाहावयास मिळते. जंगल आणि कोरकूंचा अतूट संबंध आहे. जंगलातच त्यांचे गुरे-ढोरे चरतात. त्यांच्यावर कुठलीही आपत्ती येऊ नये. जंगली श्वापदापासून संरक्षण व्हावे म्हणून कोरकू बाघदेव, डोलारबाबा या देवांची पुजा-अर्चा करतात. आखाडी सण व पोळ्याला आखाडी देव, नागपंचमीला नागदेवता, जिरोतीला कोठा गोमोज यांची पुजा केल्या जाते. सालई, गुल्लेर, बेल, जांभूळ, पिंपळ, वड, शमी, आपटा या वृक्षांची कोरकू पूजा करतात.

**कोरकू लोंकाया इतर जमातीच्या लोकांविषयीचे समन**

कोरकू जमातीचे लोक मध्यम उंचीचे असून त्यांचा रंग साधारणपणे काळा-सावळा असल्याचे दिसते. त्यांचा रंग एकदम गडद नसून थोडा कृष्णवर्णीय असल्याचे दिसते. काही मैदानी प्रदेशात रंगाने गोरे असणारे व्यक्ती कोरकू जमातीत आढळतात. त्यांचा चेहरा गोल असून नाक चपटया स्वरूपाचे असते. कोरकू गोंडापेक्षा थोडे उंच असून ते सहज ओळखता येतात. कोरकू स्त्रिया पुरुषांपेक्षा थोड्या उंच असून त्या कृष्ण वर्णाच्या दिसतात. काही स्त्रियांचा रंग गोरा असतो. तरूण पिढीतील स्त्रिया-पुरूष यांच्या राहणीमानात कमालीचा बदल होत असल्याने त्यांना सहज ओळखता येत नाहीत. जुन्या पिढीचे कोरकू सहज ओळखता येतात. बैतूल, भैसदेही परिसरातील कोरकू जमातीच्या राहणीमानावर गोंडाचा स्पष्ट प्रभाव दिसून येतो. तर निमाड परिसरातील कोरकूंनी निमाडी संस्कृती आत्मसात केली आहे. सातपुड्याच्या गांगडा परिसरातील दुर्गम भागात

राहणाऱ्या कोरकूंनी मात्र आपली वेगळी ओळख कायम ठेवली आहे. कोरकू स्त्री-पुरुष सबंधाचा मागोवा घेतल्यास आवर्जून लक्षात येते की, त्यामधील प्रेम, ओढ, आपुलकी कमालीची असते. इंग्रजी संस्कृतीप्रमाणे नवरा-बायको प्रत्येक गोष्ट एकमेकाच्या साथीनेच करतात. बाजार सण, उत्सव, यात्रा यात सहभागही एकमेकांच्या साथीने असतो. प्रसंगी नवऱ्याला वठणीवर आणण्याची हिंमतही कोरकू स्त्रिया करतात. सुख-दुःखाच्या प्रत्येक क्षणाला त्यांची साथ अतुट असते. दारूही ते सोबत पितात, शेतात सोबत राबतात. जागल करतात. एखाद्या कुटुंबात स्त्रीची कुचंबणा होत असल्यास ती सर्व सोडून एखाद्या पर पुरुषासोबत पलायन करते. पुनर्विवाहाचे अनेक प्रकार कोरकू जमातीत आहेत. त्याला समाजमान्यताही आहे. कोरकू स्त्री ही एक प्रकारती स्वतंत्र असते. त्याचप्रमाणे पुरुषाचे असते. कोरकू जमातीचे लोक मोठे कष्टाळू व जिद्दी स्वभावाचे असतात. दुर्गम प्रदेशात निवास करताना त्यांना अनेक कठीण प्रसंगाना सामोरे जावे लागते. कुठल्याही संकटाला न डगमगता सामोरे जाण्याची व हिंमत न हरण्यायी वृत्ती त्यांच्यात जन्मापासूनच असते. जंगल, डोंगरदऱ्यात असल्याने त्यासाठी अनेक कष्ट त्यांना उपसावे लागतात. दिवसरात्र कष्ट त्यांना उपसावे लागतात. मात्र शेतीच्या कामतही त्यांची काकट वृत्ती कायम असते. दिवसरात्र कष्ट उपसण्याची त्यांची तयारी असते. त्यांची शेतीची कामे संपली की ते रोजगारासाठी इतर प्रदेशात स्थलांतरित होतात. तेथेही त्यांची कष्टाती वृत्ती कायम असते. जीवनात कितीही संकटे आली तरी कोरकू आदिवासी आत्महत्या करीत नाही हा त्यांचा एक विशेष गुण असल्याने दिसते. अनेकदा दुःख विसरण्यासाठी ते दारू पितात. कोरकू जमातीतील लोक सुरुवातीला जरी अबोल, लाजाळू वाटत असले तरी त्यांचा विश्वास संपादन केल्यावर ते मनमोकळे पणाने

वागतात. त्याच्या वागण्या बोलण्यात कुठलेही द्वैष, मत्सर, लोभ दिसत नाही. आपआपल्या परीने येणाऱ्या प्रत्येकाचा आदर सत्कार करून मोठेपणाची जाणीव करून देतात. अनोळखी व्यक्तीच्या बाबत सहकार्याचीच भावना त्यांच्या ठिकाणी असते. कोरकू मधील लढाऊ वृत्ती वाखाण्यासारखी असते. गरिबी,दारिद्रय, उपासमार असली तरी ते कुणासमोर लाचारी पत्करत नाहीत. गावातील प्रत्येकाच्या सुख-दुःखाची त्यांना काळजी असते. एकमेकांविषयीचा त्यांचा एकात्मभाव, समजदारवृत्ती, धैर्यशीलता कधी कमी होत नाही. संकटात धावून जाणारा त्यांचा स्वभाव असतो. कोरकू छोट्या छोट्या समूहात राहत असल्याने त्याच्यामधील एकात्मभाव दृढ असतो. गावातील सण, उत्सव, यात्रा, सर्वाची सोय लागल्याशिवाय ते साजरा करत नाहीत. सर्वाच्या सुख-दुःखाची काळजी घेतात. सुख-दुःखात धावून जातात.

**मनोरंजनाच्वी पध्दती**

**कोरकूंच्या यात्रा**

कोरकू जमातीचे लोक उत्सवप्रिय आहेत. त्यांचे वर्षभर चालणारे सण, उत्सव, यात्रा याची साक्ष देतात. दैनंदिन जीवनातील दुःख, कष्ट बाजूला सारून मनाला आनंद मिळावा, मनोरंजन व्हावे, यासाठी ते अनेक उत्सवाचे आयोजन करतात, त्यात सहभागी होतात. कोरकूंच्या यात्रा कार्तिक पोर्णिमेपासून सुरू होतात. दिवाळी संपलेली असते. हंगामही संपल्यात जमा असतो. खिशात थोडा पैसा अडका असतो. अशा वेळी या यात्रा भरतात. अनेक गावात ग्रामदेवतांचे उत्सव साजरे केल्या जातात. कोरकूंच्या यात्रांमध्ये पूर्णा यात्रा,

ताप्ती यात्रा, बहिरम यात्रा, मोतीमाताची यात्रा, पंचमढीची यात्रा, सिंगाजी यात्रा प्रमुख आहेत. यासोबतच होळीच्या काळात भरणाऱ्या मेघनाथ यात्रा, जेरी हे उत्सव देखील ते आनंदाने साजरे करतात. कोरकूंच्या यात्रांचे स्वरुप हे संमिश्र स्वरुपाचे आहे. काही यात्रांमधील भगतांच्या सवाऱ्या नवस प्रमुख आकर्षण असतात. या यात्रांमध्ये मनोरंजनाची साधने, खरेदीविक्रीची दुकाने, खाण्यापिण्याची दुकाने विशेषत्वाने असतात. अनेक कोरकू आपल्या कुटुंबासहित मिळेल त्या साधनाने या यात्रांमध्ये येतात. तरुण मुले मुली यांच्या साठी ही पर्वणी असते. एकूणच यात्रा या कोरकू लोकसंस्कृतीचे महत्त्वाचे अंग आहे.

**मेघनाथ यात्रा** :

कोरकू जमातीच्या अनेक दैवतांपैकी रावण, मेघनाथ ही प्रमुख दैवते आहेत. रावणाची प्रत्यक्ष पूजा होत नसली तरी त्याच्याविषयी श्रद्धा कोरकू लोकांमध्ये पाहायला मिळते. रावणाचा पुत्र मेघनाथ याने तर एकदा कोरकूंचे प्राण वाचविले होते त्याच कृतज्ञतेला अनुसरून कोरकू लोक मेघनाथाची पूजा करतात. होळी सण आटोपल्यावर अनेक गावात मेघनाथाच्या यात्रा भरतात. या यात्रेमध्ये मोकळ्या जागेत सागाचे पन्नास फुटापर्यंत उंचीचे तीन खांब रोवलेले असतात. त्यावर हिरव्या बास्याची ताटी ठेऊन एक आडवा खांब बांधतात. त्या खांबाला दोन दोर असतात. मेघनाथाला नवस करणाऱ्या व्यक्ती वाजत गाजत त्या खांबाजवळ येतात. त्यांच्या अंगात सवारी असते. ती सवारी मेघनाथाच्या खांबावर चढते. तेथील भूमका त्या सवारीला त्या खांबावर आडवे बांधतो, खाली असणारे दोन लोक त्या सवारीला गोलाकार तीनदा फिरवितात. त्यावेळी

त्या व्यक्तीच्या अंगातील सवारी अधिक चढते. पुन्हा त्या सवारीला तीनदा उलटे फिरविल्या जाते. यावेळी त्या व्यक्तीच्या अंगातील देव उतरतात. त्यानंतर मेघनाथाची पूजा केल्या जाते. मेधनाथाला केवळ कोरकूच नव्हे तर सर्व लोक नवस बोलतात. पूर्वीचे नवस फेडतात. कोंबड्याचा बळी देऊन मेघनाथाची पूजा करतात. खारीक, नारळ, बादाम, अगरबत्ती घेऊन मेघनाथाला प्रसाद वाहतात. ही यात्रा म्हणजे लहान थोरासाठी पर्वणी असता. अनेक खेड्यापाड्यातून आलेले लोक पूर्ण कुटुंबानिशी यात हजेरी लावतात. गावेच्या गावे उलटतात. नातेवाईकांच्या भेटीगाठी, आवश्यक ती खरेदी केली जाते. संपूर्ण यात्रेत अनेक दुकाने थाटल्या जातात. त्यात सर्व प्रकारच्या साहित्याची खरेदी केली जाते. काळानुसार मेघनाथाच्या यात्रेचे स्वरूपही दिवसेदिवसे बदलत चालले आहे. यात्रेमध्ये आता फुटबॉल स्पर्धा, शंकरपट, ऑकेस्ट्रा, कव्वालीचा मुकाबला, क्रिकेटचे सामने आयोजित केल जात आहेत. अनेक बक्षिसे देऊन मनोरंजन केल जात आहे.

**जेरी** :

आदिवासी परिसरात मेघनाथ यात्रेप्रमाणे अनेक गावात जेरी स्पर्धेचेही आयोजन करण्यात येते. एखाद्या मोकळ्या जागेत एका वीस फुटापर्यंत उंच खांब रोवल्या जातो. त्याला गेरू, तेल चोपडून गुळगुळीत करतात. त्या खांबावर एक कपड्यात नारळ, काही पैसे बांधल्या जातात. त्याभोवती स्त्रिया गोलाकार उभ्या असतात. त्या हातात काठ्या घेऊन गीते गातात. त्या स्त्रियामध्ये ओझा (गोंडाची एक जमात) स्त्रियांचा सहभाग मुख्यत्वे असतो. त्या स्त्रियांच्या गर्दीतून एखादा तरूण त्या खांबावर चढण्याचा प्रयत्न करतो. त्या स्त्रिया

त्याला वर चढू देत नाहीत. त्याला काठीने मारतात, खेचतात. त्या स्त्रियांच्या घेऱ्यानंतर पुरुष उभे असतात. ते खांबावर चढणाऱ्या तरुणाला प्रोत्साहन देतात. सर्व अडथळयांना पार करून एखादा तरूण त्या खांबावर चढण्यात यशस्वी होतो. तेव्हा त्याला बक्षिस दिली जाते. जेरी म्हणजे आदिवासीचा खेळ, गंमतजमत, कौशल्य, नृत्य, लोकगीते यांचा संगम असतो. पूर्वीच्या काळात त्या जिंकलेल्या पुरुषाला ज्या मुलीशी लग्न करायचे तिच्याशी त्याचे लग्न लावून दिले जात होते. कोट, ता. धारणी येथील राजा कुमानसिंग, राणी कमला यांच्या काळात येथील जेरी प्रसिद्ध होती. त्याचे अनेकांना आकर्षण वाटे. अनेक लोक स्त्रियांच्या मारात मृत्युमुखी देखील पडत. पण राजा त्या स्त्रियांना माफी देत असे कारण, ती जुनी परंपरा होती. आता मात्र ती एक स्पर्धा बनली आहे.

**मॉ पूर्णा व ताप्ती यात्रा** :

दिवाळीनंतर कार्तिक पोर्णिमेच्या दिवशी मॉ ताप्ती यात्रा (बारहलिम), मॉ पूर्णा यात्रा (पोहरपूर्णा), मुलताई येथील देवीच्या यात्रा भरतात. कोरकू लोक नद्याची मातेसमान पूजा करतात. मध्यप्रदेशातील बैतूल जिल्ह्यात भैसदेही तालुक्यातील पोहरपूर्णा येथे पूर्णा नदीचा उगम आहे, तर बारहलिम येथे मॉ ताप्तीचे शक्तिस्थळ आहे. ही दोन्ही ठिकाणे आदिवासीची पवित्र स्थळे आहेत. साधारणपणे पाच दिवसापर्यंत येथील यात्रा चालतात, तसे दिवाळीपासून या परिसरातील लोकांना या यात्रेचे वेध लागतात. त्यासाठी पैसा-अडका जमा करण्यास सुरुवात होते. कोरकू जमातीचे लोकही यात्रेत मोठ्या संख्येने सहभागी होतात. दूरदूरच्या

खेड्यापाड्यातून आपल्या बैलगाडीने, ट्रॅक्टरने, बसने किंवा पायीसुद्धा लोक येतात. कुणी राहुटी टाकून रात्रीला मुक्कामी तर कुणी नुसत्या दर्शनासाठी येतात. बैलगाडीच्या प्रवासात तर बैलावरील रंगीबेरंगी झुली, त्याच्या पायातील घुंगराच्या माळा, नटूनथटून बसलेला संपूर्ण कोरकू परिवार उत्साहात असतो. यात्रेत पोहचल्यावर एखाद्या ठिकाणी तळ ठोकून तेथे राहुटी टाकल्या जाते. तेथे देवाचे ठाणे मांडून शिधाआट्याचा स्वयंपाक केल्या जातो. या यात्रेतील प्रमुख आकर्षण म्हणजे विविध भगतांच्या सवाऱ्या. अनेक गावातील आदिवासी आपल्या भगतांच्या (भूमका) समवेत या यात्रेमध्ये सहभागी होतात. भगतामध्ये स्त्री आणि पुरुष दोघांचाही समावेश असतो. राहुटीच्या ठिकाणी हे भगत चौरंगावर पूजा मांडतात. तेथे दोन त्रिशूळ, लिंबू ठेवतात. पुजा करतात. मग मुख्य भगताच्या अंगात देव येतात. त्याच्या सोबत इतरही सवाऱ्या येतात. स्त्री, पुरुष, लहान मुले अंगात सवारी आली की नाचू लागतात. ढोल, टिमकी या वाद्यासहित मग या सवाऱ्या मंदिरात जातात. तेथे पूजा केली जाते. त्यानंतर यांचे प्रस्थान नदीच्या पात्राकडे होते. तेथे पूजा अर्चा झाल्यावर देव अंगात आलेल्या व्यक्ती नदीच्या पाण्यात नाचू लागतात. त्याच्या हातात केसाचा विणलेला दोर किंवा साखळी असते. अनेक पुरुष सवाऱ्या स्त्रियाचा वेष धारण करतात. देव अंगात आले की भक्ताच्या समस्या, बिमाऱ्यावर उपचार सुरू होतात. कुणाचे कान फुकतात, कुणाचे केस धरून ओढतात. तर कुणाला लिंबू खायला देतात. ज्याचा नवस पूर्ण झाला तोही सवारीची पूजा करतो. नवसाचे  मूल झाल्यास त्याला लाकडी पाळणा करून नदीच्या पाण्यात सोडल्या जाते. अनेक गावातील भगत त्यांची मांदियाळी या जत्रांमध्ये पाहायला मिळते. यात्रेमध्ये  अनेक दुकानाची रेलचेल असते. मनोरंजनासाठी साधने उपलब्ध असतात. कोरकू

जमातीच्या सोबतच या परिसरातील अनेक आदिवासी या यात्रेत उत्साहाने सहभागी होतात.

**बहिरम यात्रा** :

महाराष्ट्र व मध्यप्रदेश यांच्या सीमेवर श्रीक्षेत्र बहिरम येथे बहिरम बाबाची यात्रा भरते. या परिसरातील आदिवासीचे हे आराध्य दैवत आहे. भैरमबाबा म्हणजे महादेवाचा आठवा अवतार. तेथील देव सूपारीपासून तयार झाला असून त्याचे स्वरूप आता अवाढव्य वाढले आहे. नवसाला पावणारा देव अशी या देवाची ख्याती असल्याने या यात्रेमध्ये दूरदूरून लोक सहभागी होतात. डोंगराच्या मध्ये या देवाचे वास्तव्य आहे. अनेक आदिवासींचे हे कुळदैवत आहे. सुखसमृद्धी लाभावी, आरोग्य लाभावे, पुत्रप्राप्ती व्हावी, चांगले पीक यावे अशा अनेक कारणासाठी या देवाला नवस केला जातो. बोकड, कोंबडा कापून नवस दिल्या जातो. बहिरम बाबाच्या मंदिराच्या बाजूलाच भांडी तलाव आहे. पूर्वी स्वयंपाकासाठी या तलावातून भांडी निघत असत, असा येथील भक्तांचा विश्वास आहे. अनेक कोरकू कुटुंबे आपल्या आप्तस्वकीयासोबत या यात्रेत सहभागी होतात. संसारासाठीचे साहित्य यात्रेतून खरेदी करतात. या यात्रेमध्ये बैतूल परिसरातील कुंभारांनी बनविलेली मातीची भांडी प्रसिद्ध आहेत. बहिरम बाबाला मांसाहारी व शाकाहारी असा दोन्ही प्रकारचा नैवेद्य चालतो. दिवसेंदिवस या यात्रेचे स्वरूप बदलत चालले आहे. या यात्रेवरील आदिवासी लोकांचा पगडा कमी होऊन इतर लोकांचे प्रस्थ वाढले आहे. मात्र, आजही अनेक कोरकूच्या मनात बहिरम बाबा विषयीची श्रद्धा अपार आहे. एक महिन्यापर्यंत ही यात्रा चालते. सर्वात लांब चालणारी यात्रा म्हणून बहिरमची यात्रा प्रसिद्ध आहे.

**पंचमढी यात्रा** :

महाशिवरात्रीला पंचमढी येथे महादेवाची मोठी यात्रा भरते. या यात्रेत कोरकू बहुसंख्येने सहभागी होतात. महादेव हे कोरकूंचे आराध्य दैवत आहे. कोरकूंना पंचमढीच्या परिसरात महादेवानेच वसविल्याच्या अनेक कथा आहेत. त्यानुसार एकदा महादेवाने सुंदर हरणाचे रूप घेतले. त्यावेळी कोरकू शिकारीला गेले होते. ते त्या हरणाच्या मोहात पडले. हरणाच्या मागे मागे ते पंचमढीच्या डोंगरात गेले. तेथे गेल्यावर ते हरीण एका गुहेत गेले. त्या गुहेतून नंतर आवाज आला. तो आवाज महादेवाचा होता. त्याच महादेवाने कोरकूंना तेथे स्थायिक होणयाच आदेश दिला. तेव्हापासून त्या पसिसरात कोरकू राहु लागले. पंचमढी हे त्यांचे तीर्थक्षेत्र बनले. या निमित्ताने दरवर्षी तेथे यात्रा भरु लागली.

शिवाय या परिसरात अनेक यात्रा भरतात त्यात प्रामुख्याने ओंकारेश्वर, पंचमढी, मुलताई, धानोरा, श्रावणतीर्थ यांचा समावेश आहे. निमाड परिसरातील संत ब्रम्हगीर, संत सिंगाजी यांच्यायात्रा प्रसिद्ध आहेत. सोबतच मोतीमाता (लोखंडीया), भैरुभिलटबाबा(मोहना) टपकेश्वर महादेव (बीजागढ), सांबरदेव (गोरीडीया), भिलटदेव (भातलपुरा) येथील यात्रामध्ये मोठ्या प्रमाणावर कोरकू जमातीचे लोक सहभागी होतात.

**कोरकूंचे सण** :

कोरकू लोकांचे जीवन हे प्रामुख्याने निसर्ग, जंगल, शेती या घटकांशी निगडीत आहे. त्यामुळे वर्षभर त्यांचे सणही विविध ऋतूमधील बदलत्या परिस्थिती प्रमाणे ठरलेले आहेत. कुठलाही सण हा सामूहिक

पदधतीने साजरा करण्याची परंपरा कोरकूंनी कायम ठेवली आहे. सणाच्या दिवशी दैनंदिन जीवनातील सर्व व्यवहार, कामधंदे बंद ठेऊन ते सण साजरा करतात. गावातील सर्व वातावरण आनंदी व प्रफुल्लित असते. गावातील प्रत्येक कुटुंबात वेगवेगळ्या प्रकारचे खाद्यपदार्थ बनवून त्याचा आस्वाद घेतल्या जातो मुळात कोरकू लोकांचे सण कमी आहेत. त्यांचे सण भवईपासून सुरू होऊन फागून पर्यत चालतात. रांडभावे, चिखलभावे, जिरोती, पोळा, दसरा, होळी हे त्यांचे महत्त्वाचे सण आहेत. परंतु बाह्यसंस्कृतीच्या प्रभावाने आता कोरकू जमातीत गणेशोत्सव, दुर्गोत्सव, दिवाळी, अक्षयतृतीया सारख्या सणाचे प्रचलन सुरू झाले आहे. पारंपरिक सण साजऱ्या करण्याच्या पद्धती लोप पावत असून अनेक नव्या गोष्टीचे प्रचलन सुरू झाले आहे. बऱ्याचदा विविध प्रकरचे सण साजरे करण्याचा दिवस, कालावधी गावातील लोक ठरवितात. गावातील लोकांची व्यवस्था, बाजारहाट, जुळवाजूळव महत्त्वाची मानतात. सर्वांना सण, उत्सव सोयीचा ठरावा ही त्यामागील भूमिका असते.

**रांडभावे (भवई)** :

कोरकू जमातीच्या सणांची सुरुवात रांडभावे (भवई) या सणापासून होते. त्यांचा हा पहिला सण असतो. जेष्ठ महिन्याच्या अमावास्येला हा साजरा करतात. उन्हाळ्यात शेतीच्या मशागती आटोपलेल्या असतात. कामे पूर्णत्वाकडे जातात. पावसाची चाहूल लागलेली असते. सगळे वातावरण कोरडे उन्हाने तापलेले असते. अशावेळी सर्व गावातील लोक हा सण सामूहिकपणे साजरा करतात. गावाच्या उत्तर दिशेला असणाऱ्या

खेडादेव, ढांडेल बाबा, वाघदेव या देवांची पूजा करतात. काही परिसरात यादिवशी वरील देवाजवळ बोकडाचा बळी देतात. गावातील सर्व पुरुष मंडळी गावाबाहेर उत्तरेला जावून खेडा देवाची पूजा करतात. नारळ, अगरबत्ती, शिऱ्याचा प्रसाद वाटतात. तेथे पांढऱ्या रंगाचा बोकड कापतात. त्याचे मुंडके देवाजवळ ठेवतात. तेथेच भाजी करून जेवतात. यासाठी गावातील लोक वर्गणी गोळा करतात. घरून भाकरी घेऊन जातात. तेथे नवसाच्या बकऱ्याची भाजी करून मद्यप्राशन करतात. यावेळी सर्व सृष्टी, जमीन, माती रांड म्हणजे कोरडी असते, म्हणून या सणाला रांडभावे म्हणतात. काही गावात खेडा देवाची पूजा झाल्यावर काही बीज जमिनीत पेरतात. बास्याच्या झाडाची एक लांब फांदी घेऊन सालीपासून गोलाकार चक्र बनवून ते घरी गृहदेवाजवळ ठेवतात. बैलाला हाकण्यासाठी पुराण्याची लाकडी काठी आणतात. जू जुंपण्याकरिता हैडवाचा दोर बनवितात व त्याच्या उपयोग वर्षभर शेतीच्या कामासाठी केल्या जातो. या सणाच्या दिवशी काही गावातले लहान मुले जांभूळ्या झाडाच्या फांदया अंगावर लावून, हाती आडवे लाकूड घेवून त्याला बेंडूक बांधतात. गावात घरोघरी फिरून शिधाआटा गोळा करतात. लोक त्यांच्या अंगावर पाणी टाकून बेडकाची पूजा करतात. गाणी गातात. नाचतात. दुसऱ्या दिवशी गावाच्या बाहेरील नदीवर किंवा विहिरीवर जाऊन पूजा करतात. तेथे सर्व गोळा झालेल्या साहित्याचे भोजन बनविल्या जाते. सर्वांना हा भंडारा खुला असतो. नदीवरून येताना एक लोटाभर पाणी घेऊन येतात. या लोट्यावर नवीन कपड्याच्या घड्या मारलेल्या असतात. यावेळी नृत्य, वाद्य यांनी परिसर गजबजून गेलेला असतो. यावेळी पुरुषमंडळी ढांडेल गीते गात आनंद साजरा करतात. वर्षभरातून केवळ एकदाच या सणाला ढांडेल गीते गायिल्या जातात. एका लाकडाच्या

काठीला घेऊन ती तीनदा एकमेकीवर आपटतात. गोलाकार नृत्य करून गीताच्या बोलावर काठी आपटतात. गीताच्या बोलावर हे नृत्य अविरत सुरू असते. गावातील अनेक पुरुषाचा यात सहभाग असतो. गीत-संगीत-नृत्य यांचा सुरेख संगमाने ढांडेल नृत्य गावागावात रंगते. गल्लीबोळात, देवाजवळ हे नृत्य केल्या जाते. विहिरीवरून गावात आल्यावर मुठवा देवाजवळ तो लोटा उबडा ठेवून त्या कापडाच्या घड्या उकलतात. ओल्या झालेल्या कापडाच्या घडीवरून येणाऱ्या पावसाचा संबंधित महिन्यातील अंदाज बांधल्या जातो. बहुतांश कोरकू शेती करतात. त्यामुळे शेतीशी निगडीत या सणाचे महत्त्व त्यांना अधिक वाटते.

**चिखलभावे** :

हा सण रांडभावे सणानंतर पंधरा दिवसांनी साजरा करतात. धरती आणि आकाश यांचे मिलन म्हणजे पाऊस. या काळात पाऊस पडलेला असतो. सर्वत्र धरतीवर हिरवी शाल पांधरल्या जाते. शेतीसाठी या पावसाचे महत्त्व तर अत्याधिक असते. जमिनीवर पेरण्या झालेल्या असतात. गुराढोरांना चारा उपलब्ध होऊ लागतो. त्यामुळे सर्वत्र चैतन्याचे वातावरण असते. या वातावरणात चिखलभावे सण कोरकू साजरा करतात. या सणात काही विशिष्ट विधी नसतो. फक्त मुठवा, खेडा, गृहदेवाची पूजा करून घरात पुरी, भात, मांसाहारी जेवण बनविल्या जाते. शेतातील पिके जोमाने वाढावीत. पाऊसपाणी चांगले यावे यासाठीची पूजा या सणाला करतात.

**जिरोती** :

कोरकू जमातीत नवीन हंगामाला जिरोतीपासून सुरुवात करतात. यालाच हरियाली अमावास्या म्हणतात. यावेळी नवे पीक येते. त्याचे नाचून गाऊन स्वागत केल्या जाते. शेतीच्या मशागतीसाठी बरेचदा वर्षभर कामासाठी नोकर ठेवल्या जातो, त्याचे पूर्ण वर्ष या सणाला होते. म्हणून या दिवशी सालगड्याना खाऊपिऊ घालतात. त्यांना पैसे देतात व नवीन वर्षाचा करार सुद्धा येथूनच सुरू होतो. जिरोतीच्या दिवशी त्याचेही ऋण फेडल्या जाते. बैलांच्या गोठ्याची पूजा करतात. बैलांचे खांदे हळद तेलाने शेकतात. त्याला जंगलातून बुमका, जंगलकांदा, जंगली लसून, मुत्सरी, सरावण, कचोरा, भरदाकुटी, शिवणकंद यासारख्या जंगली जुडीबुटी, वनस्पति धान्यात कुटून खाऊ घालतात. या दिवशी कोरकू मांसाहार करीत नाहीत. जिरोतीच्या दुसऱ्या दिवशी गावात वर्गणी करून बोकड कापल्या जातो. त्याचे हिस्से करून घरोघर वर्गणीदारांना वाटल्या जातात. मद्य सेवन केल्या जाते. दुपारी गावातील सर्व पुरुष मंडळी दंडा गीते गाऊन नृत्य करतात. तर स्त्रिया या दिवसापासून डोलार गीते गाऊन झुल्यावर झोके घेतात. जिरोतीपासून पोळ्या पर्यंत साऱ्या कोरकू प्रदेशात डोलार व दंडा गीतामुळे उत्साहाचे वातावरण पसरते.

**नागपंचमी** :

या दिवशी नागदेवतेची पूजा केली जाते. गावाबाहेरील वारूळावर जाऊन तेथे नाग देवासाठी दूध ठेवतात. वारूळाची पूजा करून प्रसाद वाटला जातो. गव्हाच्या कणकेत दूध, साखर, डालडा, लवंग टाकून

शिरा करतात व त्याचा प्रसाद वाटला जातो. यादिवशी कोणत्याही प्रकारची जमीन उखरत नाहीत. शेतीची कामे करीत नाहीत. पृथ्वी ही शेषनागाच्या शिरावर उभी आहे. जर त्यानागाला यादिवशी त्रास दिला तर धरणी वर भूकंप, प्रलय येईल असे कोरकूंना वाटते. त्यामुळे यादिवशी सर्व शेतीमातीचे कामे बंद असतात.

**पोळा** :

पोळा हा बैलाचा सण कोरकू अत्यंत उत्साहाने साजरा करतात. कोरकूंचा मुख्य व्यवसाय शेती हा असल्याने त्यांना क्षणोक्षणी बैलांची निकड भासते. त्यांच्या दृष्टीने बैल म्हणजे महादेवाचा नंदी. महादेव तर कोरकूचे आराध्य दैवत आहे. कोरकू जमातीत पोळया संबंधित एक कथा सांगितल्या जाते. एक दिवस महादेव व पार्वती कैलास पर्वतावर चौपट खेळत होते. त्यात पार्वती जिंकली पण महादेवाला ते मान्य नव्हते. तेव्हा पार्वतीने बाजूला बसलेल्या नंदीला विचारले. नंदीने पण महादेवाची बाजू घेतली. तो खोटे बोलला. यामुळे महादेव जिंकला. यामुळे आदिमाया पार्वतीला राग आला. तिने नंदीला शाप दिला की, 'तुला मृत्यु लोकांत खूप कष्ट सोसावे लागतील, तुझ्या खांद्यावर नेहमी नांगर राहील.' त्यावेळी नंदीने पार्वतीच्या पाया पडून उःशाप देण्याची प्रार्थना केली. त्यावेळी पार्वतीने त्याला उःशाप दिला ही, 'हे नंदी, वर्षातून एकदा सर्वजण तुझी पूजा करतील त्या दिवशी तुला नांगर वाहावा लागणार नाही.' तेव्हापासून कोरकू जमातीचे लोक या नंदीची मनोभावे पूजा करतात. कोरकू माणूस कितीही गरीब, दारिद्र्यात खितपत पडला असला तरी तो पोळा अत्यंत उत्साहानेच साजरा करतो. कोरकूंचा पोळा तीन दिवसांचा असतो. पाटलाच्या सांगण्यावरून

पोळा सणाची दवंडी गावात कोटवार पिटतो. पहिला दिवस म्हणजे मूल अमावास्या या दिवशी बैलांना जंगलातून जडी-बुटी आणून खाऊ घातल्या जाते. संध्याकाळी गोठ्यात जाऊन त्याची पूजा करतात. गरम पुरी तयार करून तेल, हळद लावून बैलाचे खांदे शेकल्या जातात. दुसऱ्या दिवशी जंगलात जाऊन पळसाच्या झाडाची मुळे खोदून आणल्या जातात. त्याला वाक म्हणतात त्यापासून दोर बनविल्या जातात. सकाळी बैलांना चारण्यासाढी नेल्या जाते, येतांना त्यांना नदोवर, विहिरीवर धुतले जातात. गावात आल्यावर बैलाच्या श्रृंगाराचे सर्व सामान, वाकाचे  दोर घेऊन मुठवादेव, आखाडीदेव (धनपालदेव), हनुमान, माता यांची पूजा केली जाते. नंतर मसंडी, झुल, गेठा हा श्रृंगार बैलावर चढवून त्यांच्या शिंगाला रंग लावतात. बैलांना सजवून त्याला देवाजवळ दर्शनासाठी  घेऊन जातात. संध्याकाळी गावाबाहेर पोळा भरविल्या जातो. यावेळी गावात बैल ठेवीत नाहीत. वेशीवर चौधरी वाकाच्या दोरांना आंब्याची पाने लावून तोरण बांधतो. प्रत्येक कुटुंबातील एक व्यक्ती त्या तोरणाचा पत्ता घेऊन तेथे पैशाची दक्षिणा टाकतात. तोरणापासून काही विशिष्ट अंतरावर सर्वाचे बैल उभे ठेऊन पाटलाची जोडी किंवा एका रंगाची जोडी त्या तोरणाखालून पळवितात. याला 'बैलभगाना' म्हणतात. जी जोडी ते तोरण तोडते त्याच्या मालकाला कोटवाराला किंवा चौधरीला बक्षिस म्हणून काही पैसे द्यावे लागतात. विदर्भातील काही कोरकू गावात मानाचे बैल असल्याते दिसते. त्यांची पूजा सर्वप्रथम करतात नंतर पाटील, मानकरी पोळ्यातील बैलाची पूजा करतात. इतर लोक महादेवाची गाणी गाऊन नदीवरून आणलेले जल शिंपडतात. पोळ्यातच बैलांना घाट लावल्या जातो. पोळ्यातून बैल धरी गेल्यावर त्याचे गरम पाण्याने पाय धुतात. त्यांना बाजेवर नैवद्य मांडल्या जातो. गृहिणी

त्याची पूजा करते. बैलाची पूजा झाल्यावर घराच्या मध्यभागी गृहदेवासमोर जागा सारवल्या जाते. तेथे एका शेरात (माप) ज्वारी भरून ठेवतात. बैलांला समोरच्या दारातून नेऊन ते शेराचे माप बैल ओलांडतो. यावेळी ते सांडते. पुन्हा ते भरल्या जाते. पूर्ण, भरल्यास शुभ संकेत मानतात. नंतर त्या बैलांना गावातील घरोघरी फिरविल्या जाते. घरोघर त्या बैलांना नैवद्य, मीठ खाऊ घालतात. तर सोबतच्या पुरुषाला खोबऱ्याचा तुकडा व करदोडा दिल्या जातो. रात्री सोंग करून मनोरंजन होत. पोळ्याचा तिसरा दिवस म्हणजे बाडगा. यावेळी राहिलेल्या बैलाची पूजा करतात. गावात वर्गणी करून बोकड कापले जातात. त्याचे हिस्से धरोधर वाटल्या जाऊन अनेक जण मद्य प्राशन करतात. या दिवशी पुरुष मंडळी दंडा नृत्य करून तो दंडा नदीत सोडून देतात. तर स्त्रिया गादूली नृत्य करून डोलार गीते गातात व ती डोलार नदीत सोडून देतात. म्हणजेच जिरोतीपासून सुरू झालेले दंडा व डोलार या दिवशी समाप्त होते.

**दसरा** :

हिंदूच्या दसऱ्याच्या नंतरच्या दिवशी कोरकू दसरा सण साजरा करतात. रात्रभर जागरण करून गादूली-सूसून सारखी नृत्ये करण्यात येतात. कुंभकर्णाला जागविण्यासाठी हे जागरण केल जाते, असे वयोवृद्ध कोरकू सांगतात. कोरकू जमातीच्या अनेक सणामध्ये काळानुसार अनेक बदल घडून येत आहेत. बाह्यसंस्कृतीच्या प्रभावाने आदिवासी संस्कृतीमधीले अनेक गोष्टीचा लोप होतो आहे. पूर्वी दसऱ्याच्या सणाला साजरी करण्याची एक विशिष्ट पद्धत होती. गावातील लोक वर्गणी करून त्याचे एक वगारू (हेला) आणायचे. त्याची पूजा करून

गावातून त्याची मिरवणूक काढल्या जायची. गादूली-सुसून नृत्याने साऱ्या परिसरात रंगत येत होती. रात्री त्या हेल्याच्या अंगात भाले खुपसल्या जायचे. जेणेकरून त्याच्या शरीराचा एक एक अवयव कापल्या जायचा. त्याला गावाच्या शिवेवरून फिरवल्या जायचे. जेणेकरून त्याच्या अंगातील रक्त सर्वत्र शिंपडल्या जावे. त्यामुळे पीक चांगले येऊन गावावर कुठलेही आरिष्ट येणार नाही, असा कोरकूंचा विश्वास होता. काळानुसार ही पद्धत आता जवळपास द्धपार झाली आहे. तर काही गावात तिचे स्वरूप बदलले आहे. अनेक गावात दुधी भोपळ्याला हातपाय, मुंडके त्याला कापल्या जाते. बकऱ्याचा बळी देऊन त्याचा स्वयंपाक बनविल्या जातो. सायंकाळी गावाबाहेरून आपट्याची पाने सोने-चांदी म्हणून आणल्या जातात. मुठवा, खेडा, गृहदेवाजवळ ठेऊन नंतर ते एकमेकांना देतात. लहान मोठ्याचा आशीर्वाद घेतात. या दिवशी काही लोक मांसाहार तर काही गोड पदार्थाचा आस्वाद घेतात. अनेक गावात खम्म नाट्य साजरे केल्या जाते.

**दिवाळी** :

पूर्वी कोरकू दिवाळीसण साजरा करीत नसत, परंतू आता बाह्य समाजतील प्रभावामुळे हिंदू रीतिरिवाजप्रमाणे कोरकू दिवाळी सण साजरा करतात. गृहदेवाजवळ लक्ष्मीची पूजा करतात. फटाके फोडतात. सोने, चांदी, पैशाची पूजा करतात. घरात गोडधोड पदार्थ करतात. दुसऱ्या दिवशी गायी, वासरे, बकऱ्या यांना धुवून रंग लावतात, त्याची पूजा करतात. भाऊबीजेचे प्रचलन फारसे नाही. शहरात स्थायिक झालेले कोरकू लोक मात्र भाऊबीज साजरी करतात. कोरकू प्रदेशात गोंडाचे अस्तित्व असणाऱ्या गावात दिवाळी मोठ्या उत्साहाने

साजरी होते. थाट्या गोंड तर दिवाळी झाल्यापासून नृत्य, गायन करून आनंद साजरा करतात. दिवाळी नंतर येणारा बाजार मागतात. नृत्य करतात. गाणी गातात. त्यांची नृत्याची पारंपरिक पद्धत विलोभनिय व आकर्षक असते. अनेक आदिवासी जमाती (राठवा, थाट्या) दिवाळीला बैलाची पूजा करतात. पोळा भरवितात.

**होळी** :

आदिम जमातीमध्ये तर होळीला अनन्य साधारण महत्त्व आहे. होळी हा कोरकूंचा सर्वात महत्त्वाचा व मोठा सण आहे. त्यांची होळी पंचमीपर्यंत चालते. होळीच्या सणाला सर्व गावकरी उपस्थित असतात. रोजगाराच्या शोधार्थ दूरदूर गेलेली माणसे या सणाला हमखास गावात येतात. सर्व कामधंदे बंद ठेऊन मोठ्या उत्साहाने ते होळी साजरी करतात. कोरकू होळीची तयारी बऱ्याच अगोदरपासून सुरू करतात. बाजारहाट, कपडे खरेदी, शिधाआटयाची व्यवस्था याची सर्वत्र लगबग उडते. होळीच्या अगोदरचे बाजार साहित्याने, माणसांनी फूलून जातात. होळीची लाकडे एकादशीपासून गोळा करण्यास सुरूवात होते. पहिल्यांदा पाटलाच्या धरी जाऊन नारळ, कुंकू मागितल्या जाते ते जंगलात घेऊन जातात. तेथे होळीसाठी लागणाऱ्या लाकडांची, हिरव्या बास्याची पूजा करून बैलगाडीत घेऊन येतात. होळीच्या अगोदरच्या दिवशी रात्रभर गादूली-सूसूनची नृत्याची घुम असते. पुरूष-स्त्रिया रंगात येऊन नाचत राहतात. पहाटे चार वाजताच्या सुमारास गावाच्या पश्चिम दिशेला लहान होळी (भिवला होळी) पेटविल्या जाते. त्याच दिवशी सायंकाळी गावातील पूर्व दिशेला

मुख्य होळी बनविल्या जाते. हिरवे बांबू, पळसफुल, बेल, जांभूळाच्या झाडाच्या डाहाळ्या, जुजेल वेल, टेंभरू, एरंडी यापासून नर व मादी अशा दोन होळ्या बनविल्या जातात. काही गावात दोधांच्या मध्ये पाळणा व सूप बांधतात. काही गावात एकच होळी बांधली जाते. होळी पेटविण्याचा मान पाटलाचा असतो. सर्व गावकरी ढोल, टिमकी, पावी वाजवित होरयार गीते गात पाटलाच्या धरी जातात. तेथे पाटलाला होळी पेटविण्याची विनंती करतात. तेथून सर्व मंडळी गावाबाहेर होळीजवळ एकत्र येतात. पूजा-अर्चा, नैवेद्य चढविल्या जातो. पाटील होळीला पेटवितो. सर्व लोक होळीची पूजा करून त्याभोवती फेऱ्या मारतात. स्त्रिया पुरुष वेगवेगळे होळी भोवती नृत्याचा फेर धरतात. होळीच्या बोंबा मारतात. अश्लील हावभाव, वचने बोलल्या जातात. काही नवसही फेडल्या जातात. होळीला पुरीचा नैवद्य वाहतात. होळी पेटल्यानंतर तिला खाली पडू देत नाहीत. होळीची शेंडी पाटील सर्वासमोर कापून ती होळीत जाळतो. सर्व लोक एकमेकांना शुभेच्छा देतात. त्यादिवशी काहीलोक गोड तर काही कोंबडा, बकरा कापून त्याचे जेवण घरोघरी बनवितात. दारू पितात. दुसऱ्या दिवशी गावातील लोकांच्या टोळया पहिल्यांदा पाटलाच्या घरी जाऊन फगवा मागण्यास सुरूवात करतात. नंतर गावात घरोधरी फगनई गीते गाऊन गादूली-सूसून नृत्य करून फगवा मागतात. बरेचदा दुसऱ्या गावात, बाजारातही फगवा मागितल्या जातो. पळसाच्या फूलापासून बनविलेला रंग टाकल्या जातो. पंचमीपर्यंत सर्व कोरकू प्रदेश होळीच्या रंगात न्हाऊन निधतो. पंचमीला भिवला होळी व मोठ्या होळीची भेट घडवून आणल्या जाते. बोकूड कापल्या जातो. सर्वाना जेवण दण्यात येत. काही गावात या दिवशी पुतळाही जाळला जातो. होळीच्या दिवसात मद्यप्राशन करतात. स्त्री-पुरुष दंग होऊन होळी सणाची






मजा लुटतात. सोंगे घेऊन नाचतात. गावोगाव फगनाय गीते गाऊन फगवा मागतात. स्त्रिया पुरुषांच्या टोळयाच्या टोळ्या यावेळी फिरताना दिसतात.

या वरील प्रकारच्या मुख्य सणाबरोबरच कोरकू जमातीचे लोक आखाडी, बडी पूजा, अक्षयतृतीया, रक्षाबंधन, नवरात्र, महाशिवरात्री सारखे सण साजरे करतात.






**कोरकू भाषा :**

## आदिवासी कोरकू बोली

भाषा आणि संस्कृतीचा अतूट संबंध असतो. कुठल्याही प्रदेशाची संस्कृती तेथील भाषेतून प्रकट होत असते. भाषेमुळेच संस्कृती आकाराला येते व विकसित होते. भाषा ही मानवाला मिळालेली सर्वात मोठी देणगी आहे. त्याद्वारेच मानवाचा विकास शक्य झाला आहे. आदिम संस्कृतीत बहुतांश भाषा ह्या बोलीच्या स्वरूपात असून त्या आपले वेगळेपण आजही जपून आहेत. भारताच्या एकूण लोकसंख्येच्या ८.२ टक्के आदिवासी आहेत. म्हणजेच भारतात ८४ मिलियन लोक आदिवासी भाषा बोलतात. या पैकी बहुतेक सर्व बोली असून त्यांना लिपी नाही. म्हणजेच या बोलींचा भाषा व्यवहार भाषिक आदानाप्रदाना पुरता मर्यादित आहे. भारतात आढळणाऱ्या आदिवासी बोलींचे खालील प्रमाणे भाषाकुळे सांगता येतात. १. इंडो-आर्यन, २. तिबेटी-बर्मन, ३. द्राविडीयन, ४. ऑस्ट्रो-ऐशियाटिक, ५ अंदमानीज, ६. चायनीज. या भाषाकुळामधील भाषेतून वेगवेगळ्या आदिवासी जमातीचे वैशिष्टये, प्रथा, परंपरा, रीतिरिवाज, संस्कृती विविध अंगाने प्रकट होत आली आहे. महाराष्ट्रातही अनेक आदिवासी वेगवेगळ्या भाषा कुलातील भाषा बोलतात. कोरकू या आदिवासी जमातीची कोरकू ही बोली आहे. ती ऑस्ट्रो-ऐशियाटिक भाषासमूहात्या मुंडा गटातील आहे. १९०६ साली विल्यम स्कॅचमिडक्ट यांनी ऑस्ट्रो-एशियाटीक भाषा परिवाराचे दोन भागात वर्गीकरण केले आहे. १. मॉनख्येर, २. मुंडा. यातील मुंडा विभागात त्यांनी पुन्हा दोन प्रकार सांगितले आहेत. १. दक्षिण

मुंडा, २. उत्तर मुंडा. यात कोरकू भाषेचा समावेश उत्तर मुंडा या विभागात त्यांनी केला आहे.[१]

**कोरकू बोलीचे स्वरुप :**

कोरकू बोली ही साधी सरळ व उच्चारणाच्या दृष्टीने अतिशय सोपी आहे. बाहेरील व्यक्तीला जरी तिचे स्वरुप कठीण व बोजड वाटत असले तरी कोरकू व्यक्ती बोलताना त्यातील ओघवतेपण सहज नजरेत भरते. कोरकू बोलीत साधारणपणे चार प्रकारच्या शब्दांचा समावेश आहे. मूळ कोरकू बोली ही ऑस्ट्रो-ऐशियाटिक या भाषाकुळातील मुंडा भाषेशी आपले साधर्म्य दर्शविते. दूर्गम भागातील म्हातारी माणसे या बोलीचा अस्खलीतपणे वापर करतात. त्यामधील अस्सल कोरकू शब्द भांडार, उच्चारणातील हेलकावे, वाक्याची उच्चारणे, रचना आपले वेगळेपण दर्शवितात. कोरकू ही स्वतंत्र भाषा असून तिचे शब्दाभंडार कमी आहे. त्यात मूळ कोरकू, हिंदी, मराठी, निमाडी व गोंडी मधील अनेक शब्द आपल्या स्वतंत्र ढंगाने वावरताना दिसतात. त्याच प्रमाणे कोरकू बोलीत एका शब्दाने अनेक अर्थ व्यक्त होतात. कोरकू लोक इतर लोकांशी भाषिक संपर्क आल्यास हिंदीचा वापर करतात. मराठीही बहुतांशः कोरकूंना बोलता येते. कोरकू बोलीला लिपी उपलब्ध नाही. त्यामुळे या बोलीच्या संदर्भातील काही प्रमाणात लेखन देवनागरीतून झाले आहे. मध्यप्रदेशात हिंदी तर महाराष्ट्रात मराठीतून या बोली संदर्भात लेखन झाले आहे.

**कोरकू बोलीचे भौगोलिक क्षेत्र :**

कोरकू बोलीचे भोगोलिक क्षेत्र खानदेशाला लागून असलेल्या सातपुडयाच्या पर्वतरांगापासून तर

पंचमढीच्या डोंगरारार्यंत पसरलेले आहे. कोरकू बोली निमाड मधील खरगोन, अशीरगढ, खंडवा, हरदा, बऱ्हाणपूर, बैतूल, होशंगाबाद या प्रदेशाला वळसा घालून दक्षिणेला अकोला, बुलढाणा, अमरावती या जिल्हयातील सातपुडयाच्या पायथ्यापर्यत विस्तारलेली आहे. पुढे वऱ्हाडी बोलीच्या प्रदेशाशी तिचा निकटचा संबंध आहे. बैतूल, मुलताई या प्रदेशातील कोरकूंचा गोंडी बोलीशी संबंध येतो. जसजसे आपण पूर्वेकडे जाऊ तसतसा हा संबंध कमी कमी होत जातो. म्हणजेच गांगडा, निमाड हा प्रदेश कोरकू बोलीचे केंद्रबिंदू आहे. सातपुडयाच्या पर्वतरांगामधील हा प्रदेश तापी व पूर्णा नद्यांच्या खोऱ्यांनी व्यापलेला आहे. मेळघाटात कोरकूंची उपजमात असलेले निहाल व थाटया गोंड, भिलाला मधील राठ्या या जमातीचे लोक सुदधा कोरकू बोलतात. कोरकूंची वस्ती ही महाराष्ट्र व मध्यप्रदेश यांच्या सीमावर्ती भागात असली तरी त्यांची भाषा हिंदीची किंवा मराठीची उपबोली नाही. २००१ च्या जनगनेनुसार कोरकू बोली बोलणाऱ्यांची संख्या ५,७४,००० एवढी आहे. [२]

**कोरकू बोलीचा अभ्यास** :

कोरकू बोलीचा अभ्यास प्रामुख्याने एकोणिसाव्या शतकात सुरु झाला. इंग्रजी सत्ता भारतात स्थिर झाल्यावर अनेक युरोपिन अधिकारी, वनविभागाचे अधिकारी, ख्रिश्चन धर्मगुरु यांनी कोरकू बोलीचा अभ्यास सुरु केला. ‘ऐशियाटिक सोसायटी ऑफ बेंगाल’ च्या संशोधन पत्रिकेत कोरकू बोली विषयक अनेक लेख प्रकाशित झाले. त्यामध्ये जॉन डार्क, ड्रायव्हर व्ही. एच. पी. यांच्या लेखांचा समावेश होता. १९०३ साली

जॉन डार्क याने कोरकू बोलीचे व्यावकरण प्रकाशित केले. रसेल आणि हिरालाल यांच्या 'द ट्राईब ॲन्ड कास्ट ऑफ द सेन्ट्रल प्रोव्हान्सेस ऑफ इंडिया' या ग्रंथात कोरकू विषयक लेखन प्रकाशित झाले आहे. पुढे पेंच स्टेपन यांनी 'द कोरकू ऑफ विंध्या हिल्स' या ग्रंथात कोरकूच्या जीवनार प्रकाश टाकला आहे. गिराडॅ बेरी, ॲनामाऊस, रामसे इ. डब्ल्यू, नीळकंठ प्रसाद यांनी कोरकू- हिंदी-इंग्रजी डिक्शनरी प्रकाशित केलेल्या आहेत. द्विवेदी डी.एस, यांनी सागर विद्यापीठाच्या 'मध्यभारती' या पत्रिकेत 'कोरकू नाऊन मोरोपोलॉजी' व 'कोरकू प्रोनाऊन्स' हे लेख लिहिले. नागाराजा के.एस. यांची 'कोरकू लॅग्वेज, ग्रामर, टेक्स्ट ॲन्ड होक्याबुलरी', 'कोरकू फोनोलॉजी' ही कोरकू बोलीविषयक पुस्तके प्रकाशित झाली आहेत. डॉ. एस. जी. देवागावकर, डॉ. शैलजा देवगावकर यांनी 'द टायबल ऑफ कोरकू' हा ग्रंथ लिहिला आहे. झिडे एन.एच., सुद एस. पी., क्रुक विल्यम, सिंग के.एस., शाम परमार, वाडॅ इ.एफ., डॉ. नारायण चौरे, डॉ. अशोक पाटील, डॉ. गोविंद गारे, भाऊ मांडवकर, अजितसिंह पौहार, डॉ. धमेन्द्र पारे, डॉ. काशीनाथ बराटे, डॉ. श्रीकृष्ण राऊत यांनी कोरकू विषयक लेखन केले आहे. एकंदरीत कोरकूंच्या सामाजिक, भाषिक अशा विविध अंगाने अध्ययन करण्याचा प्रयत्न झाला आहे.

**कोरकू बोलीची ध्वनिव्यवस्था** :

मानवी मुखाद्वारे उच्चारल्या गेलेल्या व भाषेत वापर होणाऱ्या ध्वनीला स्वन असे म्हणतात. कोरकू बोलीत ३६ स्वन आहेत. त्यात ६ स्वर तर ३० व्यंजने आहेत.

**स्वर** :

कोरकू बोलीत अ, आ, इ, उ, ए, ओ असे एकूण सहा स्वर आहेत. हे स्वर सघोष असून बहिः श्वसित आहेत. यांचे उच्चारण होत असताना मुखविवरातून हवा बाहेर पडते, यामध्ये 'इ' व 'ए' हे अग्र तर 'अ' व 'आ' हे मध्य व 'उ', 'ओ' हे पश्च स्वर निर्माण होतात. या स्वरांचा विनियोग शब्दाच्या आद्य, मध्य व अंत्य अशा तीनही ठिकाणी होताना दिसतो.

**स्वराचे वर्गीकरण** :

अग्र स्वर : इ आणि ए
मध्य स्वर : अ आणि आ
पश्च स्वर : उ आणि ओ
संवृत्त स्वर : उ
विवृत्त स्वर : आ
वृत्ताकार स्वर : उ आणि ओ
अवृत्ताकार स्वर : आ
अशा प्रकारे कोरकू बोलीतील स्वरांचे वर्गीकरण करता येते.

**व्यंजने** :

कोरकू बोलीत ३० व्यंजने आढळतात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| क | ख | ग | घ | ङ् |
| च | छ | ज | झ | |
| ट | ठ | ड | ढ | |
| त | थ | द | ध | न |
| प | फ | ब | भ | म |
| य | र | ल | व | |
| स | ह | ळ | | |

अशा प्रकारे कोरकू बोलीत व्यंजनाचा उच्चार आढळतो व त्याचे खालील प्रमाणे वर्गीकरण करता येते.

व्यंजनाचे वर्गीकरण

**अ. प्रयत्नावर आधारलेले वर्गीकरण** :

स्पर्श व्यंजने : क, ख, ग, घ, ट, ठ, प, फ

घर्षक व्यंजने : स

पार्श्विक व्यंजने : ल, ळ

कंपित व्यंजने : र

स्पर्श संघर्षी व्यंजने : च, छ, ज, झ

अनुनासिक व्यंजने : न, म

**आ. व्यंजनांचे स्थानानुसार होणारे वर्गीकरण :**

कंठद्वारीय व्यंजने : ह

मृदुतालव्य व्यंजने : क, ख, ग, घ

तालव्य व्यंजने : च

मूर्धन्य व्यंजने : ट, ठ, ड, ढ, ळ

दंतमूलीय व्यंजने : च, छ, ज, झ, र, त, द, ट, ड

दंत्य व्यंजने : त, थ, द, ध, ल, स

ओष्ठ्य व्यंजने : प, फ, ब, भ, म

इ. घो, आणि अघोष : ग, द, ब, क, त, प

ई. अल्पप्राण- महाप्राण : क, च, ट, त, प, ख, घ, ठ, थ, भ

अर्धस्वर : कोरकू बोलीत य आणि व हे अर्धस्वर आहेत.

**व्याकरण प्रक्रियाः**

कोरकू भाषा ही बोली असल्याने तिची लिखित व्याकरण प्रक्रिया उपलब्ध नाही. काही प्रमाणात हिंदी, इंग्रजी, मराठी भाषेतून कोरकू बोलीचे व्याकरण लिहिण्याचे प्रयत्न झाले आहेत. पण ते पुरेशे नाहीत, कोरकू बोलीची व्याकरण प्रक्रिया खालील प्रमाणे विशद करता येते.

**विशेषनामाचे प्रयोग :**

कोरकू जमातीमधील व्यक्तीनामांचे प्रयोग वैशिष्टपूर्ण आहेत. प्रत्येक पिढी दर पिढी त्यात बदल होतांना दिसत आहे. जुन्या पिढीतील नावे चटकन ओळखता येऊ शकतात तर नव्या पिढीतील नावावर बाह्य वातावरणाचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो.

**पुल्लिंगी विशेषनामे :**

| | | | |
|---|---|---|---|
| अशोक | जाटू | बाबूलाल | रवींद्र |
| अमरसिंग | जीवनलाल | बालचंद्र | राजकुमार |
| इठ्ठोल | झब्बूलाल | बालाजी | राजमा |
| कमलसिंग | झांगरू | बुडा | राजाराम |
| कमलू | झापू | ब्रजबहादूर | राजेश |
| कल्लूसिंग | झोला | भांगू | रामदास |

| | | | |
|---|---|---|---|
| कालू | झोलांग | भाकलू | रामकिसन |
| काल्या | ढोल्या | भाकू | रामलाल |
| कुंजीलाल | तानासिंग | भाकूलाल | रामसानू |
| केशोराव | तुंबडा | भाबला | रामसिंग |
| केसोरी | तुमला | भावजी | रामा |
| कैलास | दयाराम | भैयालाल | रावजी |
| गंगाराम | दादू | भैय्या | लक्ष्मण |
| गजानन | दामू | भोला | लालचंद्र |
| गणाजी | नंदलाल | मंगल | लालसिंग |
| गानू | नत्थू | मंजी | लालाजी |
| गुना | नानकराम | मधू | श्रीराम |
| गोनू | परसराम | मनाजी | संतूलाल |
| गोपाल | पूरन | मनिराम | सकाराम |
| गोमा | प्रकाश | महेन्द्र | सतीष |
| गोविंद | प्रदीप | मांगीलाल | सदाशिव |
| शंकरराव | प्रेम | मानकू | सन्तू |

| | | | |
|---|---|---|---|
| शोभाराम | प्रेमलाल | माणिक | सरजेराव |
| शेरसिंग | फागू | माणिकराम | सानू |
| शैलेन्द्र | फाटू | मारुती | साबूलाल |
| चुन्या | बंसी | मुना | सामराव |
| छोटेलाल | बबलू | मोती | सायबू |
| जगदीश | बिसू | मोतीराम | सालकराम |
| जगन | बाटू | योगेश | सिंगऱ्या |
| जनकलाल | बाबनू | रतीलाल | सुकाजी |
| जाजू | बाबू | रमेश | सुखलान |
| सुनील | सुबाजी | सोनलाल | सोमा |
| सुन्दरलाल | सुरजलाल | सोनाजी | हिराजी |

**स्त्रियांची नावे** :

| | | | |
|---|---|---|---|
| अनीता | कमलू | गंगाबाई | झाराबाई |
| इंदिरा | काली | गोनाय | झिमाय |
| कमली | काशीबाई | चंद्रकला | तुलसा |

| | | | |
|---|---|---|---|
| पार्वती | मनिषा | रामरती | सकराय |
| पुनय | मनू | रिता | संगीता |
| प्रमिला | ममता | रीना | सुनैना |
| फुन्द्रा | मंगली | रोशनी | सुमन |
| फुलय | मालाय | रेखा | सुशीला |
| फुलाबाई | मिना | लछमी | सेनी |
| बबली | मुली | लीला | सोनाय |
| भागरती | योगीता | विमल | सोमवती |
| भोरय | रत्नाय | शांती | मनकाय |
| राधा | शिनाबाई | | |

१. पूर्वी कोरकू जमातीत नवजात बालकाचे रंग, रुप, उंची यावरुन अनेक नावे ठेवल्या जात असत. एखाद्या मुलगा ठेंगणा किंवा उंचीने लहान वाटत असेल तर त्याते नाव ठेंगू, छोटूलाल तर तो रंगाने काळा किंवा गोरा असल्यास केंड्या, बाटू, कालू, भूरा, गोरेलाल, राटू, लालू, चुन्या, तुंबडा, झिपरी, भोरय, सोनाय अशी ठेवली जात असत.

२. एखाद्या मुलाचा जन्म सण, उत्सव, यात्रा, वार, तिथी या दरम्यान झालेला असल्यास त्याचा प्रभाव

नावावर दिसून येतो. उदा. फागू, लछमी, मेघनाथ, महादेव, पारबती, मंगली, सीता, सोमा, मंगल, बुधा, सोमवती इ.

३. बाहय वातावरणातील निसर्ग, डोंगर, नद्या, सृष्टीचक्र, पशुपक्षी याचाही प्रभाव नावावर पडल्याचे दिसते.

उ.दा. सरजू, सोमा, मोती, हिरा, रत्ना, गंगा, जमूनय, फुला, कमलू, चंपा, तुलसी, चंद्रकला, पुनय, मालाय इ.

४. मराठी भाषेच्या संपर्कामुळे काही नावे कोरकू जमातीत रूढ झाली आहेत. पण त्यातील क्लिष्टता काढून त्याचे सुलभीकरण कोरकूत होताना दिसते. उदा. सामराव, सरजेराव, रामदास, इठ्ठोल, शंकरराव, केसोराव, गंगाराम, परसराम, सकाराम, मोतीराम, शालीकराम, रामकिसोर, कासाबाई, झापराबाई, परमीलाबाई, पारबती, मारुती इ.

५. कोरकू जमातीच्या परिसरात अनेक हिंदी भाषिक जातीचे वास्तव्य आहे. मध्यप्रदेशाची राजभाषा हिंदी आहे. अनेक कोरकूंचे नातेसंबंध हिंदी भाषिक पटटयात असल्याने हिंदीचा मोठा प्रभाव कोरकू नामावर पडलेला दिसता. लाल, राम, जी यासारखे प्रत्यय हिंदीच्या प्रभावातूनच कोरकू नामांना लागलेले दिसते. उदा. हिरालाल, भैय्या, साबूलाल, छोटेलाल, रतीलाल, बाबूलाल, रामलाल, पतीराम, सुंदरलाल, सूरजलाल, लालसिंग, रामकिसन, जीवनलाल, साबूलाल, सोनलाल, मांगीलाल, संतू लाल, बालाजी, सोनाजी इ.

६. कोरकू परिसरात अनेक गावात खिस्ती धर्म प्रसारकांचे कार्य चालू असल्याचे दिसते. त्याचा थोडासा

प्रभाव कोरकू नामावर झाल्याचे दिसते. उदा. मरीयम, ईशु, सायबू इ.

७. गोंड जमातीच्या प्रभावातून कोरकूंनी अनेक ना स्वीकारल्याचे दिसते. उदा. सोभाराम, शेरसिंग, अमरसिंग, तानसिंग, कल्लुसिंग, कोया इ.

८. अनेकदा माणसांचा स्वभावधर्म व त्याचा व्यवसाय यावरुन अनेक टोपण नावे कोरकूत आढळतात. उदा. डिलर, चाबरा, सरपंच, पाटील, ढोल्या, पावील्या, मुखरी, कोतवाला, चौधरी इ.

९. अनेक स्त्रीपुरुषांची प्राचीन नावे वैशिष्टयपूर्ण आहेत. ती सहज ओळखता येतात. उदा. कालू, जाटू, झाबू, सुका, रावजी, आबू, गुना, मना, हिरा, मोती, फागू, जगन, भाकलू, कालू, बादू रत्नी, संता, झानो, चरखाय, लुखी, फुलकय, गोनी, नकलई, धुमय इ.

१०. आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेमुळे कोरकू जमातीवर बाहय संस्कृतीचा मोठा प्रभाव पडला आहे. त्यामुळे जुनी कोरकू नामे इतिहास जमा असून आता सर्वत्र आधुनिक नावांचे प्रचलन चालू झाले आहे. उदा. महेंद्र, प्रकाश, दिलीप, इंद्रेश, राजेश, अनिल, सुनिल, किशोर, रविंद्र, विनोद, दिपक, योगेश, अशोक, जगदीश, प्रदीप, रमेश, गजानन, कैलास, शैलेश, मनीषा, रेखा, रिता, रिना, संगीता, प्रिया, दुर्गा, माधुरी इ.

४. पारंपरिक गोत्राची नावे (कुलनामे) व आडनावे

| **अ.क्र.** | **गोत्राचे नाव** | **ओळख/खूण** | **आडनावे** |
|---|---|---|---|
| १. बेठे | गिरमारीचे झाड | बेठेकर, बेलसरे, मेटकर, पाटील, पटेल | |

| | | |
|---|---|---|
| २. मावसी | पाणी | मावस्कर, मावशे, मोवाशी |
| ३. ढिकार | लहान मासा | ढिकार, पटोकार, ढिगर |
| ४. साकोम | सागाचे पान | सावलकर, सावले |
| ५, टोटा | धांडा (ज्वारी, बाजरीचा) | धांडे, धांडेकर |
| ६. कासदा | माती | कासदेकर, काळे, भूईकर, कासोटे |
| ७. झारा | गवच | झारेकर, जावरकर, गवते, वानखडे, भास्कर |
| ८. मोरीराना | मोराचे घरटे | मोरीराना, मुरले |
| ९. टाखेर | काकडीचा वेल | ढाकरे |
| १०. जांबू | जांभुळाचे झाड | जांभेकर, जामूनकर |
| ११. सिलू | गोंदणाचे झाड | शेलोकार, सलेकार, चिमोटे, सेलूकार |
| १२. टांडेल | गवताचा प्रकार | तांडिलकर, कांडिलकर, तांडेल |
| १३. चिलाटी | एक वेल | चिलाटे |
| १४. दारशिमा | जंगली कंद | दारशिंबे, दारशिमा |
| १५. भूसूम | गवत | भूसूम, भूसूमकर |
| १६. अखंडी | एक टेकडी (पूर्ण) | अखंडे |
| १७.देही | एक झाड | दहिकर, दहेकर |

| | | |
|---|---|---|
| १८. कोयल्या | कोळसा | कोल्हेकर |
| १९. सिरम्या | एक वृक्ष | सेमलकर |
| २०. चुथार | मधमाशी(बारीक) | चुतूर, चतुरकर |
| २१. भिलावा | बिब्याचे झाड | भिलावेकर |
| २२. भूरीराना | कबूतर | भूरीराना, मुऱ्हेकर |
| २३. टांडील | मक्याचा धांडा | टांडीलकर |
| २४. कलम | कलमाचे झाड | कलमकर |
| २५. पालवे | पान | पालवे |
| २६. काजल्या | काजळ | काजले |
| २७. धावडा | एख वृक्ष | घाडसे |
| २८. आकुवा | रुईचे झाड | आकुवा |

**५. ग्रामनावे** :

कोरकू बोलीत गावाला 'ढाणा' म्हणतात. या प्रदेशातील ग्रामनामावर भोवतालच्या परिस्थितीचा स्पष्ट प्रभाव दिसून येतो. निसर्ग, नदया, नाले, पर्वत, वृक्ष, वनस्पती संबंधी घटकांना गृहीत धरुन अनेक गावाची नावे पडलेली आहेत.

**निसर्ग दऱ्याखोऱ्या, नदयांच्या नावावरील गावांची नावे :**

चिखल (चिखल) डा (पाणी)- चिखल्डा = चिखलदरा (चिखलाचा प्रदेश)
खों (खोल) गडा (दरी)=खोगडा (खोलदरी)
चौरा (चारही दिशा) कुंड (पाण्याचा प्रदेश) = चौराकुंड (चारही दिशांना पाण्याचे कुंड)
खांडू (नदीचे नाव) खेडा (गाव)= खांडूखेडा (खंडूनदीच्या किनाऱ्यारील गाव)
गावला (गाव) डोह (डोह)= गावलाडोह (डोहातील गाव)
पाच (पाच) डोंगरी (डोंगर) = पाचडोंगरी (पाचडोंगराची वेढलेले गाव)
आड (नदीचे नाव) नदी (नदी)= आडनदी (आड नदीच्या किनाऱ्यावरील दाव)

**वृक्षविषयक :**

तारु (चारोळीचे झाड) बांदा (बांध)= तारुबांदा (चारोळी झाडे असणारे गाव)
बेल (बेलाच्या झाडाचा प्रदेश) कुंड (पाणी)= बेलकुंड
जामून (जांभूळ) नाला (ओढा)= जामूननाला (जांभूळाच्या झाडांचा नाला त्या ठिकाणचे गाव)
सोसो (बिब्याचे झाड) रदा (भाग) = सुसर्दा (बिब्याचे झाडे असणारा भाग)

**प्राणीविषयक** :

डेडवा (बेंडूक) कुंड (पाणी)= डेडवाकुंड (बेडकाचे कुंड)
काट (खेकडा) कुंभ = काटकुंभ (खेकडा मिळण्याचे ठिकाण)
पोपट (पोपट) खेडा (गाव)= पोपटखेडा (पोपटांची संख्या जास्त असणारे गाव)
बिच्छु (विंचू) खेडा (गाव)= बिच्छुखेडा (विंचू आढळतात ते गाव)

**देवी व देवताची ठिकाणे** :

हनुमान- ठाणा = हनुमानढाणा (हनुमानजीच्या नावावरुन)
राम- घाटी = श्री प्रभू रामचंद्रांच्या नावावरुन
राणी- गाव= राणीचे वास्तव होते म्हणून
खट - काली = देवीचे ठिकाण
डोलार = आदिवासींचा एक देव
वैराट = आदिवासींची एक देवी

**जमीनविषयक** :

चुनखडी = खडी असलेले शेत.
पांढरी = पांढरी माती असणारे ठिकाण.

धुलघाट= धूळ असलेले गाव.
लालखेडा = लाल माती असणारे ठिकाण.
कोट = परकोट असलेले राजाचे गाव.

**इतर ग्रामनामे** :

| | | | |
|---|---|---|---|
| अढाव | खोमई | तलई | पोटीलावा |
| अमजिरी | खैरवाडा | तामापूर | पोपटखेडा |
| अमोना | गुदगाँव | तारुबांदा | बडा ढाणा |
| अंबाडी | गुल्लरघाट | तेलपाणी | बदनापूर |
| अंबापाटी | गोबरकडू | दुनी | बाटल खुर्द |
| आठनेर | गोबरगोंदी | दरवा | बानूर |
| आमझरी | गोरेगाव | दरिंदा | बापजेई |
| उतावली | गिरगुटी | दाबिका | बामणीपुरा |
| ऐकताई | घुंगरी | दिपोली | बारांताडा |
| ऐनखेडा | चिखली | देडपानी | बारी |
| ओरेटा | चिचारी | देशली | बारुखेडा |

| | | | |
|---|---|---|---|
| कन्नेरी | चित्री | देंदरी | बालनेर |
| कवळी | चिंचढाणा | धामगाम | बिच्छूखेडा |
| कवळ्या | चुना लोंभा | धामणगाव | बिबा |
| कळमखार | चुरणी | धायपाणी | बेहडा |
| कंजोळी | चोपन | धार | बेहाली |
| काटकुंभ | जनूना | धारगड | बेलकुंड |
| कामीदा | जबिदा | धावडी | बेला |
| कारंजा | जामखेडा | धावा | बैलढाणा |
| कावला | जामली | धुलघाट | बोकरी बोधी |
| कालडोंगरी | जामूननाला | धोंडी | बोरी |
| कासीया | जाबू | नवापूर | बोंडयाकूल |
| कुकरु | झल्लार | नागरतास | भटवाबोड |
| कुटुंगा | झिरी | नांगरखेडा | भंवर |
| कुंड | झिल्पी | नांदा | भिरोटी |
| कुनखेडी | टाकी | निबोरा | भिलखेडा |
| केकवा | टिटवी | नियपाणी | भुलोरी |

| | | | |
|---|---|---|---|
| केलपानी | टेम्रुसोंडा | भोकरबर्डी | भेंडो |
| केसरपूर | टेमणी | पलसपाणी | मच्छी |
| कोट | टेंबली | पस्तलई | मडकी |
| कोटमी | टेंभू | पाचडोंगरी | माखला |
| कोटुंबी | ठेमगाव | पाटकाहू | माडोसडप |
| कोयलारी | ठानी | पाटीगा | मानी |
| कोलकास | डोलार | पाटीया | मालून |
| कोलगाव | डेडवाकुंड | पातरी | मालूर |
| कोहाना | डेडा पोखरनी | पाथरपूर | मांडवा |
| कौडी ढाना | डोकोया | पांढरी | मेमना |
| खटकाली | डोडाग्राम | पिपरिया | मोड |
| खडीमाल | डोना | पिलना खुर्द | मोथा |
| खामला | डोमा | पिलाटी | मोबदो |
| खारी | ढाकणा | पिली | रत्नापूर |
| खिडकी कलाम | ढेमगाव | पिंपरखेड | रम्भा |
| रवाय | वझ्झर | शिरपूर | सोनोरी |

| | | | |
|---|---|---|---|
| राकसी | वसाडी | शिवपूर | सोमढाणा |
| राजनी | वाण | शहानूर | सेमाडोह |
| राजपूर | वारी | शाहपुरा | सुसर्दा |
| रानीगाव | वारु | सराण्डी | सिमोरी |
| रामघाटी | वारुगव्हाण | सरावडी | सिंभोरु |
| रायपूर | वालखेडा | सलोना | हरिसाल |
| रोरा | वैराट | साद्राबाडी | हातरु |
| लवादा | वैरागड | सातकुंड | लालखेडी |
| शिरजगाव | सावलीमेंढा | | |

**कोरकू बोलीतील सर्वनामे**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू वाक्य** | **मराठी वाक्य** |
|---|---|---|---|
| आबूंज | आपण | आबूंज धारणी बोवा | आपणा धारणीला जाऊ. |
| आपे | तुम्ही | आपे चोल हेचकेन | तुम्ही केव्हा आले. |
| इंज | मी | इंज सेनेबा | मी जातो. |
| आलींज | आम्ही | आलींज सेनेबा | आम्ही जातो. |

| | | | |
|---|---|---|---|
| आले | आमचे | आले खिटी | आमचे शेत. |
| आर्पींज | तुम्ही | आर्पींज चोला हेचकेन | तुम्ही केव्हा आले. |
| इंया | माझे | इंया खिटी | आमचे शेत. |
| आमन | तुला | आमन चुटो ताराईकूतुला | किती मुली आहेत. |
| आमा | तुझा | आमा आंगी | तुझा शर्ट. |
| इयेन | मला | इयेन बारी पोऱ्याकी | मला दोन मुले आहेत. |
| इंया | माझा | इंया आंगी | माझा शर्ट आहे. |
| इनिज | हा | इनिज राम | हा राम आहे. |
| इनिज | ही | इनिज सीता | ही सीता आहे. |
| इनी | हे | इनी उरा जा | हे घर आहे. |
| डी | तो, ती, ते | डी पोऱ्या ता | तो मुलगा. |
| | डी ताराई जा | ती मुलगी. | |
| | डी पोऱ्याज जा | ते मुले आहेत. | |
| डिकू | त्याची, त्याचे | डिकू सायकल | त्याची सायकल. |
| | डिकू बोऱ्या | त्याचे सामान. | |
| इनिजा | याचा, याची | इनिजा दुपट्टा | याचा रुमाल. |

इनिजा सायकल याची सायकल.

आम तू आम पोऱ्या तू मुलगा.

कोरकू बोलीत सर्वनामचे प्रयोग एकवचन, द्विवचन, अनेकवचन अशा तिन्ही वचनात आढळतात.

उदा. एकवचन - इनज (मी)

द्रिवचन - आलगज (आपण दोधे)

अनेकवचन - आले (आम्ही)

प्रथमपुरुषी सर्वनामांच्या एकवचनात 'इनज' (मी) या एकमेव सर्वनामाचा प्रयोग होतो. द्रिवचनात व अनेकवचनात मात्र समावेशी व व्यावर्तक अशी दोन रुपे वापरली जातात. कोरकू बोलीत द्रितीय पुरुष एकवचनात 'आम'(तू) या अनैपचारिक सर्वनामांचा प्रयोग केला जातो. मराठी, हिंदी या आर्यभारतीय भाषांमध्ये लहान व समवयस्कांसाठी 'तू' चा प्रयोग होत असतो. कोरकू बोलीत तृतीय पुरुषी सर्वनामांचा मानवप्राणी व मानवेत्तर प्राणी यांच्यासाठी स्वतंत्र प्रयोग केला जातो. माणूस अथवा स्त्रीच्या संदर्भात बोलायचे असल्यास एकवचनात 'डिज्' (तो, ती) द्रिवचनात 'डिकिनज' (ते दोघे, त्या दोधी) आणि अनेकवचनात 'डिक' (ते, त्या) असे प्रयोग केले जातात. मानवेत्तर प्राण्यांच्या संदर्भात तीनही वचनात 'डी' (ते) या एकाच रुपाचा प्रयोग केला जातो.

**कोरकू बोलीतील विशेषणे :**

| कोरकू | मराठी | कोरकू | मराठी |
|---|---|---|---|
| खाट | मोठा | सोबाका बन | विद्रुप |
| सानी | लहान | सोबा | सुंदर |
| पसा | रुंद | लीचीलीची | धारदार |
| सकळा | अरुंद | टया कपरा | फाटलेला कपडा |
| पुरा | पूर्ण | सुकेन | शिवलेला |
| पाळा, आधा | अर्धा | राटा | लाल |
| सरका | सरळ | निला | हिरवा |
| काचा | वाकडा | काकडा | गोरा |
| टळाङ्गो, उचा | उंच | फिकाय | फिक्का |
| ओथरा | ठेंगणा | गरद | पक्का |
| जुना | जुना | खट्टा | आंबट |
| उनी | नवीन | खारा | खारट |
| ताजा | ताजे | सिम्बील | गोड |
| आराङ्गा | शिळे | चरका | तिखट |

| | | | |
|---|---|---|---|
| पुलूम | पांढरा | कटिज | कडू |
| केनडे | काळा | अच्छाका | चांगला |
| लंबा | लांब | बुरा | वाईट |
| आकुड | कमी, आखूड | साफा | स्वच्छ |
| म्या कुटका | एक कोर (पाव) | कुमू | अस्वच्छ |
| आधा खांडा | अर्धी भाकर | चतरा | हुशार |
| सगळा | पूर्ण | बाहयाळ | वेडा |
| आफई कुटका | तीन तुकडे | च्याटा | गरम |
| सुर्कीज | वास | | |

**कोरकू बोलीतील संख्याविशेषणे :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| म्या | एक | इलार | आठ |
| बारी | दोन | आरई | नऊ |
| आफई | तीन | गेल | दहा |
| उफून | चार | इसा | वीस |

| | | | |
|---|---|---|---|
| मोनाई | पाच | तिसो | तीस |
| तुरई | सहा | चालीसो | चाळीस |
| एई | सात | पचासो | पन्नास |
| साठो | साठ | म्या शेड्डी | शंभर |
| सत्तर | सत्तर | म्या शेड्डी म्या | एकशेएक |
| अंशी | अंशी | बारीशेड्डी मोनाई | रुपया दोनशे रुपये |
| नव्वद | नव्वद | म्या हजार | एक हजार |

**समुदाय वाचक विशेषणे**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| म्याखोम | एक | बारखोम | दोन |
| आफइखोम | तीन | ऊफून खो | चार |
| मोनाईकू | पाच | तरईकू | सहा |
| एईकू | सात | इलारकू | आठ |
| आराईकू | नऊ | गेलकू | दहा |

अशा रितीने कोरकू बोलीत गणनासूचक संख्येला शेवटी 'खोम', 'कू' हा प्रत्यय लागला की समूदाय

वाचक शब्द तयार होतात.

**आवृती वाचक विशेषणे :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| म्याबेरा | एकदा | बारीबेरा | दोनदा |
| आफईबेरा | तीनदा | गेलदा | दहादा |

अशा रीतीने कोरकू बोलीत गणनासूचक संख्येला 'बेरा', 'दा' हा प्रत्यय लागून आवृतीवाचक संख्या तयार होतात.

**क्रियाविशेषणे :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| आय | आता | डिफिन | पूर्वी |
| हरटेम | नेहमी | लय | पुष्कळ |
| इंगन | इकडे | डिंगन | तिकडे |
| इगाटेन | येथून | मेराटेन | जवळून |
| इफार | येथून | डिफार | तसा |
| खुबो | खूप | टुंगन | कोठे |

| | | | |
|---|---|---|---|
| येरांन | जवळ | सम्मन | समोर |
| टाउन | मागे | टेईन | आज |
| रोजो | नित्य | घळीघळी | पुन्हापुन्हा |
| म्याबार | एकदा | येटा | पुन्हा |
| इफर | असे | डिफर | तसे |
| झल्दी | लवकर | होनेज | खूप |
| आरोमबटे | हळूहळू | लंकन | दूर |
| इटन | खाली | नियन | वर |
| चिबोळेन | अरूंदा | येटींटायन | येथपर्यत |

**क्रियापदे** :

कोरकू बोलीत क्रियापदाचे वेगवेगळ्या काळात विविध रूपे आढळून येतात.

**क्रियापदांचे वर्गीकरण** :

एक अवयवी क्रियापदे

उदा. जोम (खाणे), नुनू (पिणे), सेने (जाणे), हाजे (येणे), सा (घेणे), जू (देणे).

**द्रि अवयवी क्रियापदे** :

उदा. चाराय (चारणे), जोमेय (खाणे), डोडो (पाहणे), माडी (बोलणे), नाडा ( हसणे), जम (रडणे), गिटीज (झोपणे), सुबन (बसणे), म्हामा ( कापणे), डेडेज (बोलणे), रोटोटीम (थांबणे).

**त्रि अवयवी क्रियापदे** :

उदा. पोचायेन (पोहोचणे), टेंगने (उभे राहणे), इटान सुबान (खाली बसणे), नियन सेने (वर जाणे), टाऊन हाजे ( मागे येणे), सम्मा सेने (पुढे जाणे), मेरानसा (जवळ घेणे).

**क्रियापदाचे प्रकार** :

कोरकू बोलीत क्रियापदाचे अकर्मक व सकर्मक प्रकार आढळतात.

अकर्मक क्रियापदे : सुबाय ( बसणे), सेने (जाणे)

सकर्मक क्रियापदे : डो (पाहणे), अधीर (पोहचणे)

केवल क्रियापदे : कोरान् सेने ( रस्त्यावर जा)

सामान्य क्रियापदे : हाजेबा (येणे), ओलेन (गेलो)

आज्ञार्थ क्रियापदे : सेने (जा), टेंगेने (उभे रहा), सुबाय (बसा)

नकारार्थ क्रियापदे : बान (नाही), बकी (नको), येबू (नाही)

होकारार्थी क्रियापदे : हो (हा)

**संयुक्त क्रियापदे :**

नागाटे मांडीकेन (हसत बोललो), उरान सेने लाक्केन (धरी जात आहे)

१. अपूर्ण वर्तमान काळ : आले सेनेलाक्केन (आम्ही जात आहोत.)

२. अपूर्ण भूतकाळ : ओल सेनेलाक्केन डन्ने ( आम्ही जात होतो.)

३. अपूर्ण भविष्यकाळ : ओले सेनेबा लाक्केन होंगा (आम्ही जात असू.)

४. पूर्ण वर्तमानकाळ : ओले हेयेन (आम्ही आलो.)

५. पूर्ण भूतकाळ : आले ओलेन डान (आम्ही गेलो होतो.)

६. पूर्ण भविष्यकाळ : आले हेयेन होंयन गा (आम्ही आलेलो असणार.)

७. रीती वर्तमान काळ : आले सेने लाक्केन डा ( आम्ही जात असतो.)

८. रीती भूतकाळ : आले सेनेला कुडा ( आम्ही जात असू.)

**९. रीती भविष्यकाळ :**

आले सेने चालेबा (आम्ही जात जाऊ.)

**कोरकू बोलीत क्रियापदाचे वेगवेगळया काळात विविध रुपे आढळून येतात. अधिक स्पष्ट करण्यासाठी आलेख पुढीलप्रमाणे –**

| काळ | वाक्य |
| --- | --- |
| वर्तमानकाळ | रामा इस्कुलेन सेनेबॉ |
| भूतकाळ | रामा इस्कुलेन ओलेन |
| भविष्यकाळ | रामा इस्कुलेन सेनेबा |

अ- कारांत क्रियापदाच्या शेवटी अनेकवचनी प्रत्ययाचे ‘इनकु’ हे रुप येते.

साळप + इनकु = साळुपिनकु ( पळणारे)

जोजोम + इनकु = जोजोपिजकु  (जवणारे)

जाम + इनकु = जामिनकु ( रडणारे)

‘इठाक’ हा क्रियावाचक एकवचनी प्रत्यय लागतो.

कमाय+ इठाक = कमायइठाक (कामकरी)

खेटि + इठाक = खेटिइठाक (शेतकरी)

दुकान + इठाक = दुकानइठाक (दुकानदार)

अशा रीतीने कोरकू बोलीत क्रियापदांचे स्वरुप आढळते. कोरकू बोलीला लिपी नसल्याने क्रियापदाची निश्चित प्रक्रिया कुठेही उपलब्ध नाही. त्यामुळे अनेक क्रियापदे उच्चारणाच्या प्रक्रियेत एकमेकात मिसळून जातात. त्यांचा नेमका उलगडा होत नाही.

**विभक्ती प्रत्यय** :

कोरकू बोलीत प्रथमा पासून संबोधनापर्यंत विभक्तीचे प्रत्यय आढळतात. ते पुढील प्रमाणे.

| प्रत्यय | एकवचन | द्विवचन | अनेकावचन |
|---|---|---|---|
| प्रथमा | ...... | किनज | कू |
| द्वितीया | खे/केन/के | किनजखे /केन/के | कुकेन |
| तृतीया | टेन/गोन | किनजटेन/गोन | कुटेन/ गोन |
| चतुर्थी | खे/केन/के | किनजखे/केन/के | कुकेन |
| पंचमी | टे/टेन | किनजटे | कुटेन् |
| षष्टी | आ/गा | किनजा/जगा | कुगा/का |
| सप्तमी | येन/गेन/न | किनजेन/गेन | कुएन् |
| संबोधन | ..... | ..... | ..... |

कोरकू बोलीत द्वितीया आणि चतुर्थीचे प्रत्यय समान आहेत तर संबोधनाचे प्रत्यय नाहीत.

**लिंगप्रत्यय** :

१. मनुष्य प्राण्यातील 'पुरुष' या शब्दासाठी 'धोटा' आणि स्त्री या शब्दासाठी 'जपाय' हा शब्द वापरला जातो.

२. मनुष्योत्तर प्राण्यांचा लिंगभेद दर्शविण्यसाठी या शब्दांचा सामाजिक शब्दांसारखा उपयोग केला जातो.

धोटाकुला - वाघ जापायलुका - वाघीन

धोटासिटा - कुत्रा जापायसिटा - कुत्री

३. पल्लिंगी नातेवाचक नामास 'टे' 'जे' हा प्रत्यय लागला की, स्त्रीलिंगी नाम तयार होते.

कारार् (नातू) कुरारटे (नात)

गागटा (पुतण्या) गागटाटे ( पुतणी)

कोनजे (स्वतः ची मुलगी) कोनजेटे (दुसऱ्याची मुलगी)

बोकोंजे (स्वतः ची धाकटी बहीण) बोकोजेटे (दुसऱ्याची धाकटी बहीण)

हिंदी आणि मराठी या आर्यभारतीय भाषांकडून स्वीकारलेल्या व्यवसाय वाचक पल्लिंगी नामांना कोरकू बोलीतील 'किनज' हा स्वतंत्र प्रत्यय जोडून स्त्रीलिंगी रुप साधले जाते. उदा.

कुंभार + किनज = कुंभारकिज (कुंभारीन)

खाटी + किनज = खाटि किनज ( लोहारीन)

डॉक्टर + किनज = डॉक्टर किनज (डॉक्टरीन)

४. अतिनिकट आणि अतिदूर असलेली सजीव किंवा निर्जीव वस्तू दर्शविण्यासाठी वेगवेगळी दर्शक सर्वनामे वापरली जातात. अतिनिकट असणाऱ्या सजीव प्राण्यासांठी निज (हा, ही) व निर्जीवांसाठी नि (हा)

निकट असणाऱ्या सजीवांसाठी इनिज् (हा, ही) व निर्जीवांसाठी इनि (हा) थोड्या दूर असणाऱ्या प्राण्यांसाठी डिज (तो, ती) व निर्जिवांसाठी डी (तो) आणि अतिदूर असणाऱ्या सजीव प्राण्यांसाठी हुडड/ हुजेडड(तो ड ड, ती ड ड ) व निर्जिवांसाठी हा ड ड / ते ड ड या दर्शक सर्वनामांचा प्रयोग केला जातो. कोरकू बोलीत स्थलवाचक दर्शक सर्वनामांचे वैशिष्ट्यपूर्ण प्रयोग आढळतात. निकटत्व दर्शक सर्वनामांच्या अग्रस्थानी डि किंवा डे हे रुप लावले की दूरत्व दर्शक सर्वनामांची निर्मिती होते. कोरकू बोलीत वस्तूवाचक नामांना लिंगाचे विकार होत नाहीत.

**वचन प्रत्यय** :

संस्कृत भाषेप्रमाणे या बोलीत एकवचन, द्विवचन, अनेकवचन असे तीन प्रकार आहेत. सजीवांच्या नामांना प्रत्यय लागतात, निर्जीव वस्तूंच्या नामांना प्रत्ययागम होत नाही.

| | | |
|---|---|---|
| कोरा (ए.व.) माणूस | कोरोकिनज (द्वि) दोन माणसे | कोरकू (अनेक माणसे) |
| सिटा (ए.व.) कुत्रा | सिटाकिनज (द्वि) दोन कुत्रे | सिटाकु (अने.) कुत्रे. |

निर्जीव वस्तूंच्या नावापुढे 'कु' हा प्रत्यय लागल्यावर सजीवांच्या समूहवाचक शब्दांची निर्मिती होते.

उरा + कु = उराकु (घरातील माणूस)
गाव + कु = गावकु (गावातील माणसे)
हाटि + कु = हाटिकु (बाजारातील लोक)

कोरकू बोलीतील क्रियापदांना इठाक, किनज, मिनकू असे व्यक्तिवाचक प्रत्यय लागून एकवचन, द्विवचन आणि अनेकवचन रूपाची साधना येते. क्रियापदांच्या बहुतांश रूपांना हे प्रत्यय लागत असल्याने त्यांना नियमित प्रत्यय म्हणतात.

क्रियापद-जोजोम (खाणे)

एकवचन- जोजोमकिनज (खाणारा)

द्विवचन- जोजोमकिनज (दोघे खाणारे)

अनेकवचन- जोजोमिनकु (खाणारे)

अव्यये

कोरकू बोलीत चार प्रकारची अव्यये आढळतात. त्यापैकी क्रियाविशेषण अव्ययात आय (आता), डिफिन (पूर्वी), हरटेम (नेहमी), लय (पुष्कळ), इंगन (इकडे), डिंगन (तिकडे), इगाटेन (येथून) अशा प्रकारची अव्यये समाविष्ट करता येतात. तर उभयान्वी अव्ययात डा (आणि), बान (नाही), मका (तर), पेने (परंतु), लाका (म्हणून), डिमारे (त्यामुळे), डिकालाका (त्यासाठी), चोजाकि (कारण की), कि (की) यांचा समावेश होतो. शब्दयोगी अव्ययामध्ये बादोन (नंतर), इटा (खाली), टलान (आत), इटाटेन (खालून), घल्या (साठी), टे (पैकी) या अव्ययांचा समावेश होतो. केवलप्रयोगी अव्ययामध्ये साब्बास (शाब्बास), हुडळ (हुड), ओड (ओ) या सारखी अव्यये समाविष्ट करता येतात.

**वाक्यरचना :**

वाक्य ही भाषेतील सगळयात मोठी रचना आहे. बोलीतील वाक्यरचना कर्ता-कर्म-क्रियापद यानुसार असल्याचे दिसते. कोरकू बोलीत वाक्य, संयुकत वाक्य, मिश्र वाक्य असे तीन प्रकार आढळतात.

**केवल वाक्य :**

| उदा : **कोरकू** | **मराठी** |
|---|---|
| इनी म्या उरा. | हे एक घर आहे. |
| आमा बोकेजई इस्कुलेन सेनेबा. | तुझी बहीण शाळेत जाते. |

केवल वाक्याचे खालील प्रकार दिसून येतात.

| **कोरकू** | **मराठी** |
|---|---|
| होकारार्थी वाक्य : इंजा माय खेटीन ओलेन | माझी आई शेतात गेली. |
| नकारार्थी वाक्य : इन खेटीन बन हाजे | मी शेतात येणार नाही. |
| विधानात्मक वाक्य : हिया माय धारणीन ओलेन | माझी आई धारणीला गेली. |
| प्रश्नार्थी वाक्य : आमा गावा तुनी ? | तुझे गाव कोणते आहे ? |
| आज्ञार्थक वाक्य : म्या गिलास डा सगे | एक ग्लास पाणी आण. |
| उद्‌गारवाचक वाक्य : आमनी मा ! | |

**संयुक्त वाक्य**

संयुक्त वाक्ये कोरकू बोलीत डो (आणि), डो (व), येटा (आणखी), लेकीन (पण), लेकीन (परंतु,) बन्नमका (किंवा) अशा अव्ययांनी जोडल्या जातात.

उदा. डिज मेटे गोयनका डो डिजा आंटे खूप पस्ताटीयू डाके. (ती नंतर मेली आणि तिच्या आईला खूप पश्चाताप झाला.)

**मिश्र वाक्य** :

कोरकू बोलीत एक वाक्य मुख्य आणि बाकीची उपवाक्य अशा रचना असल्याचे दिसतात. उदा. म्या दिन डी टारेगा बाटे उरा टालान उखूटे सुबानकेन डेटोगेन डी चानडवा जापाय उराटालान मुयन. (एक दिवस त्या मुलीचा बाप घरात लपून बसला. तेवढयात ती शेजारची स्त्री घरामध्ये घुसली.)

**कोरकूंची बहुभाषिकता** :

भाषेच्या दृष्टिकोनातून कोरकू जमात अधिक लवचिक व उदारतावादी दिसून येते. अनेक भाषांचा ते चपखलपणे वापर करतात. रोजगारासाठी स्थलांतर केल्यास तेथील भाषेशी मिळतीजुळती भाषा ते बोलण्याचा प्रयत्न करतात. एखादा व्यक्ती कोरकूंच्या सहवासात राहिल्यास त्याला कोरकू येणार नाही, मात्र एखदा कोरकू पर भाषिकाच्या सानिध्यात राहिल्यास तो तेथील बोली लवकर आत्मसात करतो. कोरकू हा बहुभाषिक समाज आहे. ‘एखाद्या व्यक्तीच्या किंवा समाजाच्या देशाच्या व्यवहारत तीन किंवा त्याहून अधिक

भाषांचा उपयोग केला जातो. तेव्हा अशा संज्ञापन व्यवहाराला बहुभाषिकता असे म्हणतात'[३] समाज, कुटुंब, बाजारहाट, विधी, उत्सव अशा ठिकाणी कोरकू आपल्या कोरकू बोलीचा वापर करतात. तर शासन व्यवहार, जनसंपर्क, शिक्षण, माहिती तंत्रज्ञान इ. व्यावहारिक कार्यासाठी हिंदी व मराठीचा वापर करतात. समाज अंतर्गत कुठलाही व्यवहार कोरकू  शिवाय होत नाही. कुठल्या वेळी कोणती भाषा वापरावी याचे लंकेत ते वेळेनुसार व कार्यानुसार ठरवितात. शिक्षण, शासन व्यवहार, माहिती तंत्रज्ञान यासाठी मध्यप्रदेशातील कोरकू हिंदी, महाराष्ट्रातील कोरकू मराठी वापरतात. या दोन्ही भाषांचे मिश्रण कोरकूते आढळून येते. यामुळेच अनेक कोरकूंना हिंदी, मराठी या सारख्या भाषा येतात. एवढेच नव्हे तर अनेक कोरकू व्यक्तींना गोंडी व भिल्ली या भाषा बोलता येतात. त्यांच्या संरचनेविषयी त्यांना पूर्ण ज्ञान असल्याचे दिसते. अगदी वयोवृद्ध कोरकू मात्र इतर भाषा समजू शकत नाहीत किंवा त्यांना बोलताही येत नाही. या वरून असे दिलते की, अलीकडच्या काळात कोरकूंशी बहुभाषिकता वाढलेली आहे.

**कोरकू व इतर भाषांचा परस्पर संबंध :**

भाषा आणि मानवी जीवनाचा संबंध अनन्य साधारण स्वरूपाचा असतो. भाषेशिवाय मानवी संस्कृती आकार घेऊ शकत नाही. सामाजिक बदल झाल्यास त्याचे प्रतिबिंब भाषेत पडत असते म्हंणजेच ते बदल भाषेतही जाणवतात. कोरकू बोली बाबतही असेच म्हणावे लागते. जसजसा कोरकूंच्या सामाजिक स्थितीत बदल घडून आला तसतसा कोरकू बोलीतही बदल झाल्याचे दिसते. इंग्रज पूर्व काळात कोरकूंचा परिसर बाह्य

आक्रमणापासून बराच अलिप्त होता. मोगल, मराठे यांच्या काळात या परिसरावर फारसा बाह्य संस्कृतीचा परिणाम फारसा झालेला नव्हता. इंग्रजांनी या प्रदेशावर सत्ता काबीज केल्या नंतर त्यांनी नैसर्गिक संसाधनांच्या व्यापारासाठी या परिसरात दळणवळणाच्या सुविधा निर्माण केल्या. अनेक ख्रिस्ती मिशनऱ्यांचे कार्य येथे सुरू झाले. त्यामुळे कोरकूंचा बाहेरील जगाशी संपर्क वाढत गेला. स्वातंत्र्योत्तर काळात मात्र कोरकूंच्या सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक जीवनात वेगाने बदल झाला. त्याचा परिणाम कोरकू बोलीवर देखील झाला. भौगोलिक दृष्टया हा भाग पूर्वीपासूनच मराठी, हिंदी, निमाडी, गोंडी, भिली अशा भाषिक पटटयांशी निगडित असल्याने या भाषांचा परिणाम कोरकू बोलीवर दिसून येतो. इंग्रजांच्या राजवटीत कोरकूंचा परिसर सी.पी,अँन्ड बेरार या प्रांतात समाविष्ट होता. साधारणपणे १०६० पर्यंत विदर्भासह मध्यप्रदेशातील हा परिसर मध्यप्रांत म्हणून अस्तित्वात होता त्यामुळे मराठी आणि हिंदी या भाषांचा प्रभाव कोरकूवर वाढल्याचे दिसते.

**कोरकू : मराठी :**

कोरकू लोकांची वस्ती ही महाराष्ट्र व मध्यप्रदेश यांच्या सीमाप्रदेशात आहे. हा प्रदेश सातपुड्याच्या पर्वत रांगांनी व्यापलेला असून या प्रदेशाच्या भोवताल मराठीचा प्रसार झालेला आहे. गाविलगडाच्या पर्वत रांगापासून निमाड पर्यंत, तापी नदीच्या दक्षिणेकडील प्रदेश या शिवाय बैतुल, मुलताई, नागपूर पर्यंत या प्रदेशाला मराठीने विळखा घातलेला आहे. कोरकूंच्या अनेक गावात मराठी बोलणाऱ्यांची संख्या मोठी आहे. प्राचीन काळापासून कोरकूंचा हा परिसर विदर्भाशी एकरुप झालेला आहे. स्वातंत्र्य पूर्व काळाक हा प्रांत

अहमदनगरच्या निजामशाही कडे आला. त्यावेळी राजपुत्र मुरार याने बेरारची राजधानी बाळापूरला बनविले. त्याचे अकबराच्या सेनापतीशी सलोख्याचे संबंध होते. मुरादच्या मुत्यूनंतर १६११ साली हा प्रदेश मलीक अंबरच्या अधिपत्याखाली होता. त्यानंतर औरंगजबाने १६३६ साली या प्रदेशाचे चार सुभ्यात विभाजन केले. त्याची मुख्य राजधानी इलिचपूर ही होती. नंतरच्या काळात मराठ्यांनी या भागावर वर्चस्व प्रस्थापित केले. पेशवा बाळाजी विश्वनाथ याने येथे चौथाई वसूलीचे अधिकार मोगलांकडून घेतले. १९०२ साली इंग्रजांनी हैद्राबादच्या निजामा कडून हा प्रदेश २४ लाख रुपये देऊन आपल्या अधिपत्याखाली आणला. पुढे लॉर्ड कर्झनने हा प्रांत सेंट्रल प्रोव्हीसेसला जोडला. तेव्हापासून हा प्रांत सी.पी. अँन्ड बेरार या नावाने ओळ्याखल्या जाऊ लागला. त्या आधी १८५९ साला पासूनच इंग्रजांनी या भागात प्रशासन व्यवस्था निर्माण केले होते. इंग्रजांनी सागवानी लाकूड याच्या व्यापारासाठी त्यांनी रेल्वे, रस्ते, पूल निर्माण केले होते. इंग्रजांनी सागाचे वृक्ष तोडण्यासाठी कोरकू जमातीच्या लोकांना येथे आणले. असा एक मत प्रवाह आहे. स्वातंत्र्यानंतर १९६० पर्यंत हा प्रदेश मध्यप्रदेशाचाच एक भाग होता. स्वातंत्र्यानंतर वऱ्हाड हा प्रदेश महाराष्ट्रात जाऊन बाकी प्रदेशात राहिला. त्यामुळे कोरकूंच्या प्रदेशाचे आपोआप विभाजन झाले. मराठ्यांच्या काळता या प्रदेशवार अनेक मराठी सरदारांचे राज्य असल्याने अनेक मराठी कुटुंबे तेथे स्थायिक झाल्याचे दिसते. त्यामुळे मराठी संस्कृतीचा प्रभाव या परिसरावर मोठ्या प्रमाणावर पडत आला आहे. इंग्रेजी सत्ता स्थिर झाल्यावरही ही परिस्थिती होती. त्यामुळे विदर्भातील जनजीलनाशी या परिसरातील लोकांचा अत्यंत घनिष्ट संबंध होता. त्यातूनच मराठीतील वऱ्हाडी बोलीच्या प्रभावामुळे येथील हिंदी व इतर आदिवासी जमातीच्या भाषा प्रभावित

झाल्याचे दिसते. वऱ्हाडी बोलीच्या प्रभावामुळे येथील हिंदी व इतर आदिवासी जमातीच्या भाषा प्रभावित झाल्याचे दिसते. वऱ्हाडातील रीतिरिवाज, प्रथा, परंपरा यांचा यात समावेश असल्याचे दिसते. हा संपूर्ण सीमावर्ती प्रदेश डोंगर, दऱ्या, जंगले यांनी व्याप्त असल्याने तेथे रोजगारासाठी संधी पूर्वीपासूनच उपलब्ध नव्हत्या. त्यावुळे उपजिवीकेसाठी पावसाळा संपली की हे लोक रोजगारासाठी महाराष्ट्रात येत असत. आजही ते येतात. त्यामुळे कोरकू मराठी भाषा संकर घडून येताना दिसतो. कोरकूंच्या अनेक ढाण्यात (वस्तीत) कुणबी, लोणोरे व इतर मराठी भाषिकांची वस्ती आढळते. हे लोक बहुतांश मराठीचा वापर तरतात. मेळघाटात कोरकू बहुसंख्येन राहतात. हा परिसर महाराष्ट्रात येत असल्याने विविध शासकीय व्यवहार, शिक्षण, व्यापार, उद्योगस, दळणवळण मराठीतूनच होत असल्याने कोरकू जनजीवनावर त्याचा अनपेक्षित प्रभाव पडल्याचे दिसते. या सर्व कारणामुळे कोरकू बोलीवर मराठीचा पकिणाम झालेला आढळतो.

कोरकू बोलीत मराठी शब्दाचा उपयोग हा कधी वर्णदृष्टता जसाच्या तसा तर कधी वर्णप्रक्रिया होऊन केला जातो.

१. मराठीतील ‘अ’ करांत शब्द कोरकू बोलीत ‘ओ’कारांत होतात.

| | | | |
|---|---|---|---|
| उदा. अलप-अलपो | ऊस-ऊसो | कापूस-कापुसो | खांब-खांबो |
| ढेप-ढेपो | तास-तासो | नाराज-नारोजो | पीक-पिको |
| भूत-भुतो इ | | | |

२. काही मोजक्या शब्दांतर्गत योणाऱ्या ‘अ’ चाही कोरकूत ‘ओ’ होताना आढळतो.

उदा. कप-कोप बरोबर-बराबोर फनी-फोनी

३. क्वचित शब्दांतर्गत येणाऱ्या 'ओ' चा लोप होतो.

उदा. बारोमास-बारमास ओसरी-उसरी

४. काही शब्दात येणाऱ्या 'अ' ह्या स्वराचा कोरकू बोलीत 'आ' होतो.

उदा. शब्दारंभी : अटा-आटा (अन्न)

मध्यस्थानी : जवाई-जावाई लबाड-लाबाड, साकळी-सकळी,

अत्यंस्थानी : कपार-कपारा, काथ-कथ्या, चिंच-चिंचा, ढेमसं-तवा-तावा, नाथ-नाथा.

५. तर कधी 'आ' ह्या स्वराचा 'अ' होतो.

उदा. आरपार-अरपार आराम-अराम जनावर-जनवर.

६. 'आ'कारांत शब्द 'ई'करांत होतात.

उदा. अंगठा-अंगुठी पावा-पावी

७. 'ए'कारांत शब्द 'आ'कारांत होतात.

उदा. कांडे (उसाचे वगैरे) - कांडा, फावडे-फावडा.

८. कोरकू बोलीत मूर्धन्य 'ण'चा दन्त्य 'न' होतो.

उदा. अडचण-अडचन कापणी-कापनी ग्रहण, फणस-फनस

९. 'ळ' चा उच्चार 'य,ड,र,ल' होतो.

उदा. ळ-य फाळ-फाया हराळ-हराय.

ळ-ड : गूळ-गूड.

ळ-र : आंधका-आंधारा चुंबळ-चुबंरी नाळा-नारा

ळ-ल : आवळा-आवला काजळ-काजल.

१०. वऱ्हाडीच्या प्रभावाने अनुसाराचा लोप होतो.

उदा. कुंकू-कुकू गांजर-गाजर नांगर-नागर बुंदी-बुदी.

११. 'ह' ह्या महाप्राणाचा लोप होते-

उदा. गव्हाण-गवनी पाहुणा-पावना

१२. वर्णलोप : अमावास्या-अमासो आयना-आना आंधळा-अंधा

**१३. वर्णात बदल झालेले शब्द अनेक आढळतात–**

| **मराठी** | **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** |
|---|---|---|---|
| आतळी | अतळी | किल्ली | कुनजी |
| अलग | अलगणो | खिचडी | खिचडी |
| आजोबा | आजा | खराब | खराबो |
| कपाळ | कपार | पाहुणा | पावना |

| | | | |
|---|---|---|---|
| कळसी | करसी | आंधळा | आंधारा |
| कावड | कावली | | |

**१४. कोरकू बोलीत काही मराठी शब्दांचा उच्चार होताना काही शब्दात स्वरलोप होतो तर काही शब्दात स्वरचा आगम होताना दिसतो :**

**लोप :**

| **मराठी** | **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** |
|---|---|---|---|
| आजूबाजू | अजूबजू | अर्धा | अदा |
| अंबाडी | अंबडी | कोंबडा | कोंबा |
| गाय | गई | साबण | साबू |

**आगम :**

| | | | |
|---|---|---|---|
| आळस | आळसा | ऊस | ऊसो |
| चिंच | चींचा | उडीद | उळिदो |
| खारिक | खारिको | चंद्र | चांदो |
| सूर्य | सुरजो | खंबा | खांबो |

**कोरकू बोलीत आढळणारे मराठीतील शब्द :**

अंतर. आरी, आंबा, कपबशी, कुलूप, कैची, खलबत्ता, गंजी, गोटा, गोमंतीर, गेठा, गुरुजी, घळ्ळी (घागर), चाळी, चूना, जागा, जिरा, झूल, झेंडा, टिका, टोपी, डोंगर, ताटी, दंव, दालव्या, दोरा, धुरा, पाऊल, पान, पावडर, पास, पोर, पेटी, फायदा, फूल, फुग्गा, बदक, बाजरी, बांगडी, माय, मावशी, वाई (कोळपणी), लवंग, लोणीस शाल, शेंदूर, सावकार, सुपारी, सुरी, लिंबू, हेला (म्हैस प्राण्यातील नर), हात इ.

**हिंदी आणि कोरकू :**

कोरकू आणि हिंदीचा संबंध अतिशय घनिष्ट आहे. कोरकू ही बोली ज्या प्रदेशात बोलल्या जाते त्या प्रदेशाच्या उत्तर व पश्चिम दिशेला हिंदी भाषिक पट्टा आहे. उत्तरेकडे असणाऱ्या मध्यप्रदेशाची राजभाषाच हिंदी आहे. मध्यप्रदेशातील पूर्व-पश्चिम निमाड, हरदा, बैतूल, होशंगाबाद या प्रदेशात बहुःतांश कोरकूंचे वास्तव्य आहे. त्यामुळे प्रत्येक ठिकाणी कोरकू बोलीत मिसळून गेले आहेत. शहराशी संपर्क आलेल्या कोरकूंनी तर पूर्णपणे हिंदी आत्मसात केली आहे. कोरकू बोलीला लिपी नसल्याने तिचे लेखन हिंदी भाषेतून करण्याचे प्रयत्न झालेले आहेत. अनेक कोरकू लोकगीतामध्ये हिंदीचेच प्रचलन वाढल्याचे दिसते.

**कोरकू बोलीतील हिंदी शब्द :**

| मराठी | कोरकू | मराठी | कोरकू |
|---|---|---|---|
| अक्कल | अक्कल | अच्छा | अच्छाटे |
| आयना | आयना | उजाला | उजला |
| कम | कम | कर्ज | करजो |
| कागज | कागज | कुर्सी | कुरसी |
| किस्सा | किस्सा | खास | खासो |
| खारा | खारा | खाल | खाल |
| खेती | खेटी | गर्दन | गरदन |
| गलती | गलती | बियाव | ब्याह |
| प्यार | प्यार | उमर | उम्र |
| मंदिर | मंदिर | दस्तखत | दस्तखत |
| बीमारी | बिमारी | कमजोर | कमजोर |
| दोस्त | दोस्त | गुरुजी | गुरुजी |
| गोत्र | गोत्र | रेल | रेल |

**कोरकू : इंग्रजी :**

इंग्रेजी आणि कोरकू बोलीचा प्रत्यक्ष असा संबंध नाही. इंग्रजांचे राज्य असताना कोरकू हे घनदाट जंगलात राहत होते. इंग्रजांनी या भागात लाकडाचा व्यापारासाठी कोरकूची मदत घेतली. त्यामुळे इंग्रजांनी या परिसरात अनेक आदिवासी कुटुंब त्यामुळे जंगलात स्थायिक झाली. इंग्रजांनी अनेक ठिकाणी रस्ते, पूल, विश्रामगृहे बांधली. प्रशासन व्यवस्था, न्याय प्रक्रिया व वनखात्याचे अधिकारी यांच्या संपर्कातून इंग्रजी भाषाचा परिचय कोरकूंना घडून आला. इंग्रजांच्या काळात अनेक ख्रिस्ती मिशनरीही या भागात काम करु लागली. त्यांनी शिक्षण, आरोग्य या सारख्या सुविधा निर्माण केल्या. अनेक आदिवासीना प्रलोभने दाखून धर्मातरित करण्यात आले. यात कोरकूंचाही समावेश आहे. मात्र आदिवासींच्या विकासाच्या दृष्टीने अनेक प्रयत्न करण्यात आले. या पार्श्वभूमीवर कोरकू परिसरात वीज, रस्ते, शिक्षण, आरोग्य, दळणवळण, बँका, पंचायत राज या सारख्या सुविधामुळे या परिसरातील लोकांच्या जीवन मानात अनेक बदल घडून येऊ लागले. नव्वद नंतरच्या काळात मात्र हे बदल अधिक तीव्र होत गेले. हिंदी, मराठी या भाषांबरोबरच इंग्रजीचा परिणाम कोरकू बोलीवर होऊ लागला. गावा गावात वीज पोहचल्याने टीव्ही, रेडिओ, डिटीएच, मोबाईल या सारखी साधने घराघरात पोहचली. रस्ते निर्माण झाल्याने दळणवळणाची साधने वाढली व त्यातून शहरांशी संपर्क वाढला. पाश्चात्य संगीता सोबत तरुण पिढी नाचु लागली. चायना मोबाईल सारखी साधने प्रत्येकाच्या हातात दिसू लागली. अनेक तरुण शहरात जाऊन रोजगार शोधु लागले. यातून अनेक बदल घडून येत होते. पारंपरिक संस्कृती कालबाह्य ठरुन नव्या संस्कृतीचा प्रभाव सर्वत्र वाढत राहिला. याचा सर्वात जास्त परिणाम

पारंपरिक कोरकू बोलीवर झाला. नवीन पिढीला कोरकू बोलीचे विस्मरण होऊ लागले. जुनी मूल्ये, रीतिरिवाज, प्रथा, परंपरा, लोकवाङ्मय या बाबत अनास्था निर्माण झाली. नव्या पिढीच्या वागण्या बोलण्यात अनेक इंग्रजी शब्दांची रेलचेल वाढली. काही इंग्रजी शब्द कोरकूंनी आपल्या कोरकू बोलीत अनुरुप बनवून टाकले. त्यांचा उच्चार, लय बदलवून ते कोरकू बोलीचा अभिन्न हिस्सा बनले.

उदा.

| **मराठी** | **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** |
|---|---|---|---|
| स्कुल | इस्कूल | मिटर | मिटर |
| कार्ड | कारटो | एंटेना | येनटीना |
| ग्लास | गिलासो | लाईट | लाईट |
| डॉक्टर | डाकटर | बटन | बटन |
| रेडिओ | रेडू | डिपी | डिपी |
| टीव्ही | टीवी | मिटर | मिटर |
| टाईम | टेम | ट्रेक्टर | ट्याकटर |
| कंडक्टर | कंडकटर | टायर | टायर |
| फोन | फॉन | टयुब | टुब |
| कॉल | काल | प्लेट | पिलेट |

| | | | |
|---|---|---|---|
| मिसकॉल | मिसकाल | आयडिया | ऐडिया |
| कंपनी | कंपनी | शुटींग | सुटिंग |
| चार्जर | चारजर | | |

**कोरकू बोलीतील शब्दसंग्रह :**

**नातेदर्शक शब्द**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| अई, आयोम, अंटी | आई | कनकर | सासू |
| अई | मावशी | काकी | काकू |
| अजा, अबा | वडील | कुनकर | सासरा |
| अबी | मोठी बहीण | कुरार | नातू |
| अबा, आबा डाई | वडील | किमीन | सून |
| आजा | आजोबा | कोन | मुलगा |
| इखेनेज | मुलगी | कोनजई | मुलगी |
| इलूर | दीर | कोनठोके | नातू |
| इवाई | व्याही | कोसेरेड | भाचा, भाची |

| | | | |
|---|---|---|---|
| उरामिठाज | बायको | खाडबा | मोठे बाबा |
| काका | काका | खाडमा | मोठी माय |
| कट्याक | लेकरु | खाटकिमीन | मोठी सून |
| कतळ्या | मूल | जापाय | बायको |
| तरई | मुलगी | भांज्या | भाचा |
| डाई | भाऊ | मामा | मामा |
| डुकरी | बायको | मामी | मामी |
| डोटा | नवरा | मालाय | मुलगी |
| फुफू | आत्या | ओऊ | वहिणी |
| पोऱ्या | मुलगा | साना | म्हातारा |
| बई | बहीण | सानी | म्हातारी |
| बुड्डी | म्हातारी | | |

**धरती व निसर्गासंबंधीचे शब्द :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| असमान | आकाश | डबरा | डोंगराखालची जमीन |

| | | | |
|---|---|---|---|
| अगासो | आकाश | ड्या | दिवस |
| ओटेन | जमीन | डा | पाणी |
| इफिल | तारा | रातान | संध्याकाळ |
| उनडा | उन्हाळा | दियागोमेज | सूर्य |
| कासदा | माती | रातोगोमेज | चंद्र |
| कोंबाड | पहाट | डागाधार | मुसळधार पाऊस |
| शिंहाळा | हिवाळा | भरकाळ | मध्यरात्र |
| गाडा | नदी | फेजर | सकाळ |
| टमकूलोंनडेय | इंद्रधनुष | बरसादो | पावसाळा |
| चखान | लाकूड | सिंगरुपहाट | दुपार |

**शेती संबंधी शब्द :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| आखू | बैलगाडीची आख | खेयान | खळे |
| आऊत | औत | गाडीडोबा | बैलगाडी |
| आखई | कुऱ्हाड | घुचिडी | गोचीड |

| | | | |
|---|---|---|---|
| आखेर | कडब्याची कुट्टी | जागली | शेतातील जागरण |
| ओखर | वखर | झारा | गवत |
| ओरो | पिक, धान्य | डाटोम | विळा |
| ओरोडरा | कणूस | दतवा | दताया |
| उडिदो | उडीद | निवळा | गवत |
| कउसो | कुंदा | बिटके | पेरणी |
| केकरी | निंदन | बोरा | पोते |
| खट्टो | खत | सब्बोल | सब्बल |
| खेटी | शेत | हुंबी | ओंबी |

**प्राणी पशु-पक्षासंबंधी शब्द :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| आक्याडोबा | नंदीबैल | कटकोम | खेकडा |
| उटो | उंट | कठोम | कासव |
| उलटापंचरखोर | वटवाघूळ | कफलीज | फूलपाखरु |
| येट्टी | हत्ती | कोपटूर | कबुत्तर |

| | | | |
|---|---|---|---|
| करा | बगळा | मुगसो | मुंगूस |
| काकू | मासा | सिटा | कुत्रा |
| कुला | सिंह | शिळी | बकरी |
| कुवाली | ससा | सीम | कोंबडी |
| किंडीज | विंचू | सुकळू | डुक्कर |
| किल्ला | माकोडा | कोंबा | कोंबडा |
| केखेमरेड | सरडा | गई | गाय |
| गिदळी | गाढव | गोथडी | हरीण |
| तेरेमकू | मधमाशी | चिखोर | डास |
| नलपी | कुत्री | चितोर | गोमाशी |
| बिटखील | म्हैस | चिडी | चिमणी |
| डुगी | माकड | च्याटी | मुंगी |
| पियू | कोकीळा | जगली | कातीन |
| पुची | उंदीर | टेंबळ्या | लांडगा |
| बाना | अस्वल | डेडरा | बेंडूक |
| मिठ्ठ | पोपट | नांगो | नाग |

**फळेभाज्या व वृक्ष संबंधीचे शब्द :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| आलू | बटाटा | टाखेर | काकडी |
| अंबीडा | आंबटचुका | धांडाई | ऊस |
| आवला | आवळा | तुडी | मोहाची फुले |
| येंगन | वांगे | पलको | पालक |
| ककडी | काकडी | पोपीया | पपोई |
| कांडे | कांदे | मकेई | मक्का |
| कुडू | भोपळा | सोरकांदे | हिरवे कांदे |
| केरेल | कारले | ओडा | वड |
| गजरे | गाजर | आंबा | आंबा |
| गुडीआरा | पालेभाजी | पाळसा | पळस |
| चिचा | चिंचा | बुबूड | बाभळीचे झाड |
| चिथनो | मिरची | बेल | बेल |
| चेवलाई | बरबटी | भोसय | एक वृक्ष |
| जांबो | पेरु | महनार | एक वृक्ष |

| | | | |
|---|---|---|---|
| जांबू | जांभूळ | मोवा | मोहाचे झाड |
| झुमकी | दोडका | रिठा | एक झाड |

**शरीराचे अवयव विषयक शब्द :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| अंगुठा | अंगुठा | कलम | कल्ले |
| हूप | डोक्याचे केस | भोई | भुवई |
| कपार | डोके | गारा | बुभूळ |
| लुतूर | कान | मू | नाक |
| भोकरा | कानाचे छिद्र | मुच्छा | मिसूर |
| तिर्डींग | दात | मायांग | कंबर |
| चाबू | पोट | गत्तल | पुरुष लिंग |
| ओटा | हनवटी | बुलू | मांड्या |
| लान | जीभ | मोंडा | पाय |
| गरदन | मान | बोटो | बोट |
| खांदा | खांदा | नेक्को | नख |
| भूजा | दंड | मेट | डोळे |

| | | | |
|---|---|---|---|
| खुइनी | ढोपर | कुल्ली | स्त्री लिंग |
| कड्डु बोट | आंगठा | बांबू | गांड |
| बुचू | स्तन | पिंदळी | टोग्याचा खालचा भाग |
| शिपळा | बरगड्या | मोंडा | टाक |
| बोंबलीच | बेंबी | लेलभे | ओठ |

**कोरकू बोलीतील वारांची नावे :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| सोम्मार | सोमवार | मंगलवार | मंगळवार |
| बुधवार | बुधवार | बिस्तरवार | गुरवार |
| सुकरार | शुक्रवार | सिनिचर | शनिवार |
| इतवार | रविवार | | |

**कोरकू बोलीतील कोरकू महिने :**

| **कोरकू** | **मराठी** | **कोरकू** | **मराठी** |
|---|---|---|---|
| चेटो | चैत्र | दसेहरा | आश्विन |
| अखटीजो | वैशाख | दिवाळी | कार्तिक |

| | | | |
|---|---|---|---|
| राडभवई | जेष्ठ | अगेन | मार्गशीर्ष |
| चिखलभवई | आषाढ | पुसो | पौस |
| जिरोती | श्रावण | म्हा | माघ |
| पोळा | भाद्रपद | फागून | फाल्गुन |

**कोरकू बोलीतील वाक्यप्रचार :**

आम भलतई का झवूपन डा - हेलपाटे घेणे
गत्तल होलेन - मुठ्ठया मारणे
इटाऊन कामाय घईयेन - नसते काम लागणे
घाव म्याका बारी तुकडा - एक घाव दोन तुकडे
उटा कपरा नेयेन साये - घर डोक्यावर घेणे
उफुन मुखा लक्कन कु - चार हात दूर राहणे
उरा सूबनजन ज धंदा डुबणे, धंदा बंद होणे
ओठयान बोचो - पदरात पाडून घेणे
ओरा सरीव लज्ञेन - दशा पालटणे
कपरा नियेन पेपळेज - डोक्यावर घेणे

कुतनी माडी कोकमारा - कान उघडणी करणे
खिजोनी मुनीयन - तळ ठोकणे
खुपखिजो हेन - संताप व्यक्त करणे, राग येणे
चाबु इटान बन बोचो - शब्द खाली न जाऊ देणे
चाबून डा हाजे लझेन - तोंडाला पाणी घालणे
चावडी सूबन जेन गूयकू - मैत्री जमणे
चिटनी मिटानं - खत पाणी घालणे
चेमनी आडा सेनेबा - दिवा लावणे
च्याट मुमुडा - दांडी मारणे
छाती नीअेन कुळूप डोके - छातीवर गोटा ठेवणे
छाती टे छाती मिमला - टक्कर देणे
जाना हूप टेंगेनजा - आंगला काटे फुटणे
जानूम पे जानूम पोकला - काट्याने काटा काढणे
जेका बकी हार्जी - मज्ञाव करणे
टुटुल डो सोसोट - गचांडी देणे
टुले दोडोय - उचल बांगडी करणे

टिलीयन टुटुल - दिवाळे काढणे
डीज टी आंडाये - थुक्याला थुका लावणे
डोबूकू चाल्लाकेन - ढोरं वायनं
ढोपोरेन दम होना - गांडीत दम नसणे
ढोपोरेन जुट आटाये - गांडीत शेपूट घालणे
तिर्डीन चाफाडू रोंगोटे - दात खाऊण भिडणे
नागाडे नांगा डोडो - पावलावर पाऊल टाकणे
निळे लक्केन - पल्ला गाठणे
बसोन हजे - तळाख्यात सापडणे
बारा बावने शेने - बाराच्या भावात जाणे
बूरा घई लाके - खराब वाटणे, दुःख वाटणे
भगवान उराभरातीने जिले - घर भरून देवाने देणे
भावडी मूमू डाय - शाबासकी देणे
मटका टेव - येल पाडणे
मन यनसा - मनावर घेणे

मयन रेडेवे टोना - कंबर कसणे
मेरा साजडी उरा - घरोबा असणे
म्याका नगन तयार - एका पायावर तयार असणे
म्यागेट जा - बळी देणे
म्या मुटी पेरा गे - खुणगाठ बांधणे
लबाड मांडी - च्याट देणे, लबाडी करणे
लाज कासू - पोट दुखणे
लुस लास डडा - पोटात धसणे
लूतूरने टी डोयेन - कानावर हात ठेवणे
लेन देन बंने - घेणे देणे नसणे
वजन थाड - वजन असणे
वोयाका वोलेन - उद्ध्वस्त होणे
सारासारी डडा - सारवासारव करणे
सिगेलाडा - आगीत तेल ओतणे
सिंगील ऐन सुनी आंडा - आगीत तेल ओतणे

सोय आडा - तजवीज करणे, व्यवस्था करणे

**कोरकू बोलीतील म्हणी :**

- अच्चा बाई गलीजा सिटा ट्यागेना सिनाल लिजा गोमेज पडीयो- पतिव्रतेची साडी कुत्रे तोडे, सिनालीची साडी देवावर दढे.

- आपणा लालन डाबा कोरकू खेडो शेंबडू आपलाला मुगेन- आपणा हसे लोकाले, शेंबूड आपल्या नाकाले.

- आरगाई थाडबन, सिटाई बनजो- शिळं रायना, कुत्रा खाई ना.

- आंधळा घोटा, टिटे गतल उठाये- फुटका नवरा करा, हातात चोमन धरा.

- आंधा जाटीबा डो सिटा कोलोम जोजमबा- आंधळा दळतो कुत्र पीठ खातो.

- इच्छा खाटका, खर्च्या सानीका- हौस बडी, खर्चीं थोडी.

- इंयन होजवा जम, डामा चुफर हे खर्चय -मले येते लडू, पैसा कसा खर्च करु.

- कसूवा तुगंका, डो घालेवा तुगंका- दुखते कुठे अन सांगते कुठे.

- कातडया नागा झोळीन डोगोहा- लेकराचे पाय पाळण्यात दिसतात.

- किडीया गाठी भावडीन - विंचवाचे बिहाड पाठीवर.

- कुंकू झेगळा, डो सिटा के मुंडा- लेकराचं सण बोकडयाची गरदन.

- कोलज्या चोटोकाबी आबूये डेरोका केडे- कोळसा उगाळावा तितका काळाच.
- गरजाटियू मीटच बरसाटियू बा की चोझ ? - जो गरजेल तो बरसेल काय ?
- गिरेबा जपाय सबाईकू ओऊ - गरिबाची पत्नी सगळयांची वेनी.
- गेडळी रा टोडेन काबी पापंडा बा- गाढबाचा गोंधळ लाथांचा सुकाळ.
- धामडे लान चुजका बी बाकाटेबा- उचलली जीभ लावली टाळयाला.
- टाखा डिडीज दिवळी डो बान टा सो होळी- असेल त्या दिवशी दिवाळी नसेल त्या दिवशी होळी.
- डीडुम मिटच आराटे, बंजली टवून लघाटेंजन- दुभती सोडून वांझोटीच्या मागे लागणे.
- चंडाकू हेक्कड बेवा, डो दारोमेन डिकू सिळी- शेजारीन मोठी अकरी तिच्या दारात बकरी.
- जपाय रे झगळा साटे चुच चाखान जुये - बायकोशी वाकडे राहावे तरी काय.
- जपाय जेवाटेमुन जोजो बान- काई देना तवा बुवा राईना
- जूजूमा लाडू डो कामायन गांडू- खाया काळ, भुईला भार.
- दीळ चमळीगा सौदा, बारा डोबा कुंका - दीड चमडीया सौदा, बारा बैलाचा.
- धामाडे लान चुजका बी बाकाटेबा- उचलली जीभ लावली टाळ्याला.
- फुकट खुकीज, डो लंकन बो मेंटों मंडीबा- फुकट तर झवते, दुरही चाल म्हणते.
- मांडी पिटीज्या च्याबू डुबूवा- बोलणाऱ्याचं तोंड दिसते.

- बोटो मोटे खाकाट- बोटं घालून मोठं करणे.
- मानवकेनेच टासोन गोमेज नही तो ढेंगा- मानला तर देव नाहीतर दगड.
- मुमडा मिटजा टि डडाउवा मंडी मिटडा चुज ?- मारणायाचा हात पकडल्या जाता पर बोलणायाचे काय
?
- मोनई बोटो म्या बन्ने- पाचही बोटे सारखी नसतात.
- राजा मंडी, दाळी होलई- राजा बोले दाढी हाले.
- रिंडी जपाय बे गदलके हिंगरवा- जात रांडीच, लवळ्याचा भेव.
- लंका लंका सुबन डा, मेंडा चुफरटे ओजेय- दूर दूर बसू अन डोळे कले पुसु.
- लंबा लंबा मांडी, डो ढुपोरेन पांडा जोमेन- बडया बडया बाता, गांड खाये लाथा.
- लाच मुंडाटे, सानाके चराय वा - पोट मारते अन नवयाला चारते.
- साधा डुगुवा पन घागल जेकेके घगलबन- भोई दिसते जनाले, मत नाही देत कोणाला.
- हत्ती चेलके हाटी, सिटा बुगे हजार- हत्ती चले बजार कुत्रे भोके हजार.

## कोरकूंची लोकनृत्ये, लोकसंगीत व लोकनाट्य

लोकनृत्य, लोकसंगीत हा कोरकूंच्या जीवनाचा महत्त्वाचा घटक आहे. निसर्गाच्या कुशीत मुक्तहस्ताने आनंदाचा उपभोग घेणारी ही जमात आपल्या आनंदाला वाट मोकळी करून देण्यासाठी लोकनृत्याचा आधार घेताना दिसते. मुक्त वातावरण, चैतन्याचा, आनंदाचा वारसा जपत हजारो वर्षापासून हे आदिवासी आपली संस्कृती जपून आहेत. आदिवासी कोरकूंच्या लोकनृत्यावर भौगोलिक परिस्थितीचा परिणाम झाल्याचे दिसते. निसर्ग, डोंगर कपारीत जीवन जगणारी ही जमात निसर्गातील अनेक गोष्टीचे अनुकरण करताना दिसते. त्यांच्या नृत्यशैलीवरही हा प्रभाव जाणवते. प्राण्यांचे हावभाव, चाल, गती यांना त्यांनी लोकनृत्यात समाविष्ट केले आहे. नागमोडी चाल, प्राण्यांसारखे आरोह, किंकाळ्या, मोराचे नाच यातील अनेक गोष्टी त्यांनी स्वीकारल्याचे दिसते. याशिवाय नृत्याच्या वेळी मोराच्या पिसाचे टोप, कवडयाचे हार, झाडापासून बनविलेले रंग, नैसर्गिक घटकांपासून बनविलेली वाद्ये त्यांच्या, लोकनृत्याचे अभिन्न अंग आहे. पारंपरिक रीतिरिवाज, विधिविशेष, लोकाचार, सणोत्सव, मंगलकार्य अशा आनंदाच्या प्रसंगीच नव्हे तर सिडोली सारख्या मृतात्म्याच्या प्रतिष्ठापणे प्रसंगी कोरकू लोकनृत्याचा अविष्कार सादर करतात. लोकनृत्याच्या वेळी कोरकू आपले वयाचे भान विसरून एकत्रित नृत्य करतात. गरीब-श्रीमंत, लहान-मोठा, जात-धर्म-वर्ग सगळे विसरून एकत्र येतात. खेळीमेळीच्या वातावरणात, खुल्या मनाने, खुल्या दिलाने आनंदाच्या उपभोग घेतात. उत्साह,

आनंदाचे जणू उधान सगळीकडे आलेले असते. कोरकू ही जमात केवळ धार्मिक प्रसंग असताना नृत्ये करीत नाहीत तर वर्षभर त्यांचे आयोजन केल्या जाते. घराचे अंगण, मुठवा-खेडा देवासमोर, सार्वजनिक ठिकाणी खुल्या जागेत आदिवासी नृत्ये रंगतात. गावातील म्हाताऱ्या माणसापासून तर लहान मुलापयत सर्वाचा त्यात उत्स्फूर्त सहभाग असतो. वाद्याचा नाद, सुर कानावर पडले की आदिवासाचे पाय थिरकायला लागतात. प्रयोजन कुठलेही असो कुणालाही निमंत्रण दयावे लागत नाही. गावातील काही उत्साही तरुण, तरुणी, स्त्रिया, पुरुष, म्हातारी माणसे सज्ज होतात. रंगीबेरंगी पेहराव, आकर्षक पगडी, त्यात खोवलेले मोराचे पीस, पायात घुंगराच्या माळा असा पुरुषांचा पेहराव तर स्त्रियानी हातात घरलेली थापटी, डोक्यावरचा पदर, उलट्या पदराचे लुगडे किंवा साडी सर्वाचे लक्ष वेधून घेत असते. टीमकी, ढोल, पावी यांचे स्वर की पडले की आपोआप कोरकूंची पावले नृत्य करू लागतात. एकदा नृत्य सुरू झाले की, सर्व स्त्रीपुरुष देहभान विसरून आपल्या वेगळ्याच मस्तीत दंग होऊन सर्वस्व विसरून जातात. कोरकू भाषेत एक म्हण आहे, 'ढोल पावी का बाजा, कोरकू राजा'. संगीताच्या मोहक वातावरणात नृत्य करणारे कोरकू खरेच धरतीचे राजे वाटतात. निसर्गाच्या मुक्त वातावरणात स्वच्छंदी जीवन जगणारे हे लोक जणू आनंदाची उधळण करीत असतात. चंद्राच्या मंद प्रकाशात, कधी मशालीच्या उजेडात, रात्रीच्या निरव शांततेत, डोंगरदऱ्याच्या कुशीत निनादणारे स्वर वातावरण प्रफुल्लित करीत असतात. कोरकू नृत्याच्या वेळी विविध वाद्ये वाजविल्या जातात तर काही नृत्य फक्त गीताच्या ताल व ठेक्यावर केले जातात. कोरकू नृत्यामध्ये विविधता आहे. जीवनात येणारे रागलोभ, हर्षखेद हे विसरून बेभान होऊन नाचणारे आदिवासी कोरकू वेगवेगळ्या प्रकारचे नृत्य करतात.

त्यांचे प्रयोजनही वेगवेगळे असते. मात्र काही विशिष्ट नृत्ये विशिष्ट प्रसंगीच केल्या जातात. इतर वेळी त्याचे आयोजन निषिद्ध असते. खेळ मनोरंजनाची नृत्य मात्र कधीही कुठेही केल्या जातात. धार्मिक संबंधित नृत्य धार्मिक प्रसंगी केले जातात.

**कोरकू लोकनृत्याचे प्रकार :**

'लोकनृत्य आदिवासी जीवनाचे अविभाज्य अंग आहे. कोरकू जमातीत अनेक प्रकारची लोकनृत्य केली जातात. 'गादूली सूसून' नृत्य के कोरकूंच्या जीवनातील महत्त्वाचे नृत्य आहे. यामध्ये स्त्रिया आणि पुरुष सहभागी होतात. मोकळ्या जागेत ते फेर घरतात. मध्यभागी ढोल, पावी वाजविणारे लोक असतात. ढोल, पावीच्या लयींवर त्यांच्याभोवती स्त्रिया व पुरुष रिंगण घरून नाच करीत असतात. यावेळी स्त्रियांच्या हातात घुंगराचे वाद्य थापटी असते. काही फेर झाल्यानंतर त्या विरुद्ध दिशेने फिरतात आणि नृत्य करु लागतात. तर खाली मान घालून नाचणारी मंडळी एकमद तोंड वळवून समोरच्या दिशेने नृत्य करतात. पायाने त्रिकोण पावलावर पुढे पुढे सरकणारी सर्व स्त्रियांची रांग पुढे पुढे सरकत असते. एकाच्या हातात घुंगराची माळा असते. पुरुषांचा पेहराव म्हणजे अंगात काळ्या रंगाचे जॅकेट, धोतर, डोक्यावर बांधलेला दुप्पटा, त्यात आकर्षक खोचलेला फुलांचा गुच्छा असतो. काही हौसेने डोळ्यावर काळा चष्मा घालतात. स्त्रियांच्या डोळ्यावरचे उलटे पदर, रंगीबेरंगी वस्त्रे, हातातील थापटी नावाचे घुंगराचे वाद्य अशा शृंगारिक वातावरणात लोकनृत्ये केली जातात. यातील दुसरे नृत्य स्त्रियापुरुष आपले पाय एकमेकांना जोडून पुढे पुढे सरकवितात. हाताच्या घुंगराच्या

नादात नजर खाली असते. तर नृत्यामध्ये पुरुष स्त्रियांच्या साड्याचे घागरे घालतात, डोक्यावर रुमाल बांधून त्यात फुले खोचतात. दोन्ही हातात रुमाल घेऊन जोरजोराने हातवारे करीत एकमेकांना साद घालीत नृत्य करतात. पुरुषांच्या या रिंगणा आत स्त्रिया असतात. तर त्यांच्याही आत वाद्यकऱ्यांचा समावेश असतो. गादूली-सूसून हे नृत्ये गीतविहीन आहेत. यामध्ये गीते गात नाहीत फक्त नृत्य महत्त्वाचे असते. ही नृत्य करीत असताना वाद्ये विशिष्ट लयीत वाजविल्या जातात. लय बदलली की नृत्याच्या ढंग ही बदलतो. या व्यतिरिक्त 'गादूली' हे फक्त स्त्रियांचे नृत्य आहे. यात विविधता असते. त्यामध्ये स्त्रिया एकमेकीचा हात धरून गोलाकार फेर घरून नृत्य करतात. या नृत्यात कुठल्याही वाद्याचा वापर केल्या जात नाही तर गीते गायिल्या जातात. पहिला गट गीताला सुरुवात करतो तर दुसरा गट तेच गीताचे बोल पुनरुक्त लय धरतात. महिला गीताला लय देऊन एक सुरात गाणी गातात. स्त्रीया एक पाय पुढे तर एक पाय मागे टाकून, डोक्यावर पदर घेऊन, नजर जमिनीकडे ठेऊन, कधी जमिनीकडे झुकून, तर कधी रिंगण करून शांततेने हे नृत्य करतात. यात स्त्रियांची मग्नता, हळुवारता, गेयता वैशिष्टपूर्ण असतो. 'सूसून' म्हणजे फक्त पुरुषांचे नृत्य हे गीतविहीन असून यातील पुरुषांचा जोश, आनंद ओसंडून वाहणारा असतो. मोठ्या मोठ्या उडया मारून एकमेकांना साद घालून ही पुरुष मंडळी वातावरण दणाणून टाकतात. यातील वाद्येही जोराजोराने वाजविल्या जातात. कोरकू लोक वर्षभर विविध सण उत्सव, विधी प्रसंगी वेगवेगळ्या प्रकारची नृत्य करतात. गीते गातात. जिरोती झाल्यावर गावागावात स्त्रिया डोलारची गीते झुल्यावर बसून गातात. तर काही वेळा हातात लाकडाच्या टिपऱ्या घेऊन स्त्रिया नाचतात, त्याला 'डोलार नृत्य' म्हणतात. तर पुरुष जिरोती, पोळा या सणा दरम्यान दंडा गीते गाऊन

'दंडा नाच' करतात त्यावेळी त्यांच्याही हातात लाकडाच्या टिपऱ्या असतात. कोरकू परिसरात हंगाम संपल्यावर रिकाम्या वेळात अनेक गावात 'खम्म' रोवल्या जातो. त्यात रात्रीच्या वेळी अनेक मनोरंजनाचे कार्यक्रम आयोजित केल्या जातात. या प्रसंगी आयोजित नृत्यात पुरुष मुठवा देवाभोवती रिंगण धरून 'खम्म नृत्य ' करतात. उन्हाळयात चंद्राच्या मंद प्रकाशात 'चाचरी गोग्गलजा' या लोकनृत्याचे आयोजन केल्या जाते. यावेळी रात्रभर स्त्रीपुरुष एकत्र-येऊन गीते गातात व नृत्य करतात. होळी सणात फग मागताना कोरकू नृत्य करतात. यावेळी 'होरयार' या नृत्यात पुरुष दोन गटात विभागून काठी घुंगराच्या मदतीने नृत्य करतात. 'चिलुडी' या नृत्य प्रकार फक्त स्त्रिया सहभागी होऊन एकमेकींचा हात पकडून नृत्य करतात. सिडोली या मृत-आत्म्याच्या प्रतिष्ठापणे प्रसंगी अश्लील हाव भाव करून नृत्य केल्या जाते. हे फक्त त्या विधीच्या वेळीच होते. इतर वेळी होत नाही. या नृत्याव्यतिरिक्त कोरकू लोक वर्षभर विविध सण उत्सव, विधी प्रसंगी वेगवेगळ्या प्रकारची नृत्य करतात. गीते गातात. अशाप्रकारे विविधारंगी आकर्षक लोकनृत्याची रेलचेल वर्षभर कोरकू जमातीत चालू असते. सुख दुःखाच्या प्रसंगी स्त्रिया आणि पुरुष एकत्रित येऊन जीवनातील प्रत्येक क्षणाला जगण्याचा प्रयत्न करीत असतात.

**कोरकू लोकवाद्ये :**

लोकसंगीत हा कोरकू जीवनाचा महत्त्वाचा घटक आहे. लोकगीते, लोकनृत्य करताना त्याला संगीताची जोड देण्यासाठी वाद्याची भूमिका फार महत्त्वाची असते. वाद्याशिवाय लोकसंगीत, नृत्याला परिपूर्णता येऊ

शक्त नाही. गायन, वादन, नर्तन या तीनही गोष्टी एकमेकांना पूरक अशा आहेत. कोरकू लोकसंस्कृती मध्ये सुद्धा अनेक लोकवाद्ये आहेत. जन्म, मृत्यू, विवाह, सण, उत्सव, देवपूजा, नवस, शेतीतील हंगाम अशा नानाविध प्रसंगी या वाद्याचा वापर केला जातो. या वाद्याची निर्मिती निसर्गातील विविध वृक्ष, वनस्पती व प्राणीजन्य वस्तूच्या घटकांपासून पारंपरिक पद्धतीने केली जाते. कोरकू लोकवाद्यांचे साधारणपणे तीन प्रकारचे विभाजन करता येते. १. सुषिर वाद्ये (फुंक वाद्ये), २. चर्मवाद्ये, ३. घन वाद्ये. आदिवासी संस्कृतीत लाकूड, चामडे, मातीचे भांडे यांचा वाद्ये निर्मितीसाठी खुबीने वापर केला जातो.

**१.सुषिर वाद्ये** :

या प्रकारात वाद्य वाजविण्यासाठी हवेचावापर करण्यात येतो. तोंडाद्वारे हवा भरून ती विशिष्ट पद्धतीने सोडून, त्यातून नाद  निर्माण होतो. यात खालील प्रकारची वाद्ये आहेत.

**बासरी** :

बासरी किंवा पावा हे कोरकू जमातीचे महत्त्वाचे वाद्य आहे. साधारणत : हातभर बांबूची निर्दोष नळी घेऊन त्याची बासरी बनवितात. एका बाजूला ते क़ांड्याच्या अगोदर कापतात. त्यामुळे तीचे एक टोक आपोआप बंद राहते. त्यापासून चार बोटाच्या अंतरावर तोंडाने हवा फुंकण्यासाठी एक छिद्र पाडल्या जाते. यापासून आणखी काही अंतरावर एका बोट अंतर ठेऊन स्वराकरिता काही छिद्रे पाडतात. बांबूचे दुसरे टोक खुले असते. बासरी ओठावर घरून त्यात हवा फुंकल्या जाते व हाताची बोटे त्या नळीच्या छिद्रावर पटापटा

उचलून, ठेवून स्वरनिर्मिती होते. ढोलाच्या तालावर बासरीचे स्वर काढल्या जातात.

**सिंगी** :

हे वाद्य रेडा किंवा बैलाच्या शिंगापासून बनवितात. रेड्याचे एक सिंग घेऊन त्याच्या निमुळत्या टोकाला छिद्र पाडून त्याच्या साहाय्याने यात तोंडाद्वारे हवा फूंकल्या जाते. दुसऱ्या मोठ्या टोकातून त्याचा मोठा ध्वनी बाहेर पडतो. सातपुड्यातील गोंड या जमातीत हे वाद्य अधिक प्रचलित आहे. कोरकूत देवकुदानाच्या वेळेस हे सिंगी वाजविल्या जाते. तुरळक ठिकाणी पितळेच्या धातूपासून सिंगी बनवली जाते.

२. **चर्मवाद्ये** :

चर्मवाद्य म्हणजे पोकळ वस्तूच्या तोंडावर चामडे लावून, त्याला ताणून जे वाजविव्यात येते. अशा वादांना ताल वाद्ये म्हणतात. कोरकू जमातीत चर्मवाद्य जास्त लोकप्रिय आहेत.

**ढोल** :

कोरकू जमातीत सर्वात लोकप्रिय ढोल आहे. याशिवाय कोरकूचा कोणाताही विधी पूर्ण होऊ शकत नाही. ढोलाचे खोड लाकडाचे असते. त्याची लांबी दोन फुटापर्यंत असून, रुंदी वेगवेगळ्या प्रकारची असते. आंबा, वड, सिरस, बीजा यासारख्या झाडाच्या खोडापासून ढोल बनवितात. त्या पोकळ खोडाला दोन्ही बाजू चामड्याने मढवितात. त्याला चामडी वाद्यांनी आवळल्या जाते. त्याला लाकडी काठीने, हाताने वाजविल्या

जाते. ढोल वाजविण्याच्या विविध पद्धती आहेत. गीते, नृत्य, भजन यानुसार त्याचे ताल बदलतात. हे वाद्य मुख्यत्वे पुरुष वाजवितात. ढोलात लहान व मोठा असे दोन प्रकार असतात. पुरुषांची भजने, नृत्य, लोकगीते गाताना मोठया ढोलाचा वापर होतो तर, स्त्रियांच्या गादूली नृत्यात लहान ढोल वाजवण्यात येतो. ढोलाचा आवाज गंभीर व वातावरणात घुमणारा असतो.

**टिमकी** :

टिमकीची निर्मिती मातीच्या खोलगट मडक्यापासून करतात. त्या मडक्यावर वरील बाजूला चामडे लावून ते खाली चामड्याच्या दोराने ताणल्या जाते. याला दोन लाकडी काठयाच्या साहाय्याने वाजविल्या जाते. ह्या वाद्यालाही पुरुष कधी गळयात अडकवून तर कधी जमिनीवर ठेऊन वाजवितात. टिमकीचा आवाज ढोलापेक्षा अधिक कडक, टणक असतो. त्यामुळे टिमकीचे स्वर वातावरणात अधिक गुंजतात.

**मृदंग** :

निमाडी लोकभजनाचा प्रकार कोरकूमध्ये प्रचलित आहे. हे भजन गाताना मृदंगाचा वापर होतो. हे मूळ कोरकू वाद्य नाही. निमाडी लोकांच्या सहवासाने कोरकूमध्ये या वाद्याचे प्रचलन वाढले आहे. मृदंग लाकडाच्या खोडाला दोन्ही बाजूने मढवितात. त्याची उजवी बाजू लहान आकाराची असते. त्याच्या मध्यभागी शाई घोटविल्या जाते. तर दुसरी बाजू मोठी असून त्यावर कणकेचा गोळा लावतात. दोन्ही चामड्यांना ताणण्यासाठी चामड्याच्या वादीचा वापर केलेला असतो. मृदंग मांडीवर, जमिनीवर किंवा उभे राहून

वाजवितात.

**डमरू** :

कोरकूमध्ये देवपूजा, देवकुदानाच्या वेळी डमरू वाजविल्या जाते. महादेवाचे वाद्य म्हणून त्याचे महत्त्व अधिक आहे. कोरकू महादेवाची सर्वाधिक आराधना करतात. देवपूजा करताना हमखास डमरू वाजवला जाता. हाताच्या पाचही बोटांच्या साहाय्याने पकडून ते गोल फिरविण्यात येत. त्यामुळे त्यातील ध्वनी, नाद वैशिष्टपूर्ण वाटतात.

**३. धनवाद्ये :**

या प्रकारच्या वाद्यामध्ये झांज, थापटी, घुंगरू, ताट याचा समावेश करता येतो. पितळ, काशाच्या घातूपासून याची निर्मिती करतात.

**झांजा** :

कोरकूच्या लोकसंगीता मधील निमाडी लोकभजनात याचा वापर केला जातो. पितळेच्या दोन चकत्या ज्यांना मध्ये खोलगट भाग असतो व त्याला एक छिद्र असते. त्यात हाती धरण्यासाठी कापडाची मुठ बनविलेली असते. झांजा एकमेकांवर आपटून नाद निर्माण होतो. इतर वाद्याबरोबर याचा ताल वाद्य म्हणून वापर करतात. भजन गाताना मृदंगाच्या तालावर दोन्ही हाताने झांजा वाजविल्या जातात. काही मोठ्या

झांजा ढोला सोबत वाजवितात.

**थापटी :**

हे कोरकू स्त्रियांचे एकमेव वाद्य आहे. सण, उत्सव, लग्न प्रसंगात स्त्रिया हाताच्या बोटात धरून ही थापटी एकमेकावर आपटतात. ही थापटी हे चापट लाकडापासून बनवितात. त्याला दोन ठिकाणी कोरून त्यात घुंगरू मढविल्या जातात. त्यावर नक्षी काढतात. त्या कधी स्वतंत्र तर कधी इतर वाद्याच्या सोबत वाजवितात. थापटीच्या लयावर फेर धरणाऱ्या कोरकू स्त्रियांचे नृत्ये मोठे विलोभनिय वाटते.

**घुंगरू :**

कोरकू लोकनृत्यात घुंगराचे स्थान महत्त्वाचे आहे. पितळ काशाच्या धातूपासून बनविलेल्या छोट्या छोट्या घुंगराच्या माळा बनवून त्या वाजवितात. कधी पायात तर या घुंगराला थापटी सारख्य वाद्यात वापरले जाते. घुंगराशिवाय कोरकू जीवन सूने असल्याचे दिसते. बैलाच्या गळ्यात बांधल्या जाणाऱ्या घुंगराच्या माळाही वाद्य म्हणून वापरतात.

**थाली/ताट :**

कधी कधी ताल घरण्यासाठी थाली किंवा ताटाचाही वापर केला जातो. धातूपासून बनविल्या ताटाला वाजवून अनेकदा  देवपूजा कोरकू लोक करतात.

याशिवाय दंडा नृत्यात लाकडाचा दंडा वाद्य म्हणून वापरतात. सोयीनुसार लोक लाकडाचे तुकडे करून ते हाताने टिपऱ्या सारखे वाजवितात. याशिवाय होरयार गीताच्या गायनावेळी एखाद्या काठीला घुंगरू वांधून ते वाजवले जाते. अशा प्रकारच्या वाद्याचा उपयोग कोरकू लोकसंस्कृतित केल्या जातो. याशिवाय या वाद्याच्या मदतीला तोंडातून वेगवेगळ्या आवाजाच्या उपयोग केला जातो. तालबदध टाळ्या, हाताची चुटकी, पाय जमिनीवर आपटणे, हुंकार, डरकाळया, पक्षांचे आवाज यांचा तालासाठी कोरकू अनेकदा वापर करतात. त्यामुळे त्याच्या लोकगीताला, लोकसंगीताला वेगळा साज चढतो.

**७.३. कोरकू लोकनाट्य :**

कोरकू जमातीमध्ये 'खम्म' हा नाट्यप्रकार प्रचलित आहे. कोरकूंचा हा नाटय प्रकार त्यांनी धार्मिक विधीशी जोडलेला आहे. देवदेवतांची सोंगे, वेशभूषा, मुखवटे, नृत्य, भजन, वाद्यांचा वापर याप्रसंगी केला जातो. सुरुवातोला गणेश वंदना करून पहिले सोंग गणपतीचे घेतल्या जाते. त्या नंतर अनेक देवदेवतांची वेशभूषा करून सोंगे घेतले जातात व त्यानुरुप भजने मेहणतात जातात. खम्म मध्ये अनेकदा सामाजिक जीवनावर उपहासात्मक भाष्य केले जाते. काही लोक याला मेघनाथाच्या पूजेशी जोडतात. गणेशोत्सव किंवा दिवाळी सण झाल्यावर कोणत्याही दिवशी याचे आयोजन केले जाते. पूर्वीच्या काळी मनोरंजनाची कुठलीच साधने उपलब्ध नव्हती. त्यामुळे खम्म द्वारा लोकांचे मनोरंजन केले जात होते. आजही अनेक गावात ही प्रथा जिवंत आहे. खम्म म्हणजे एक खंबा. गावातील हौशी, कलावंत लोक याचे आयोजन करतात. संगीत, नृत्य,

नाट्य यांचा विलोभनिय मिलाफ यात दिसून येतो. खम्मच्या कुठल्याही नाटय संहिता उपलब्ध नसून त्या पात्रे वेळेवर मौखिक व हजरबाबीपणे रंगवितात. गावातील मोकळ्या जागेत, मुठवा देवाच्या बाजूला, खुल्या जागेत रंगमच तयार करण्यात येतो. एक गोल चाक घेऊन ते एका उंच खांबावर बांधतात. त्याला चोहोबाजूंनी दोर बांधून तंबू तयार करतात. त्या तंबूला साडया व पडदे लावून सजविले जाते. त्याखाली चुना, गेरुने रेषा आखल्या जातात. त्या समोर प्रेषकांच्या बसण्याची सोय केली जाते. सर्वप्रथम त्या खांबाची पूजा करून खम्म चालू केला जातो. यामध्ये खम्म भजन व सोंगे असे दोन प्रकार असतात. बरेचदा यांचे मिश्रणही करतात. खम्म मध्ये विविध प्रकारची सोंगे घेतले जातात. त्यांची वेशभूषा, केशभूषा सोंगाप्रमाणे ठरविण्यात येते. चेहऱ्यांना काथा, चुना, गेरू, हळद, कणीक, झाडापासून बनविलेले रंग, तागाच्या मिशा, केस लावल्या जातात. स्त्रियांची पात्रे माणसेच करतात. साडी, लुगडे, घोतर असे सोंगानुरूप पेहराव घेतले जातात. हास्य, विनोद, उपहास याद्वारे अनिष्ट चालीरीतीवर प्रहार केले जातात. जांगडी लोकांचा बेगडीपणा, अधिकारी-कर्मचाऱ्यांची हातचलाखी, शिकलेल्या स्त्रियांचे नटटे थटटे, तरुणांचे बिघडलेले वर्तन, नवऱ्याची फजिती, सासू सूनेचे भांडण अशा विषयावर गावातील हौशी कलावंत पात्रे रंगवितात. यातील संवाद हजरबाबी असतात, त्यामुळे त्यातून लोकांचे खूप मनोरंजन होते व लोकप्रबोधनाचा हेतू साध्य होतो.

**कोरकू बोलीतील:**

**कोरकू बोलीतील लोकसाहित्य :**

कोरकू बोलीत विपूल प्रमाणात लोकसाहित्याचा खजिना दडलेला आहे. हजारो वर्षापासूनच्या मानवी अंत : करणातील विविध भाव, जीवन दर्शन, भाषिक सामर्थ्य, निसर्ग सौंदर्य त्यातून सहजगत्या प्रकट होते. मानवी मनाला निखळ आनंद देऊन व  जगण्याची नवी प्रेरणा या लोकसाहित्यातून मिळते. कोरकू लोकसाहित्याचे चार भागात वर्गीकरण करता येते, १. लोकगीते २. लोककथा ३. म्हणी ४. उखाणे. यात लोकगीतांची संख्या सर्वाधिक आहे. कोरकू जीवनाचे सर्वांगीन दर्शन कोरकूंच्या लोकगीतातून व्यक्त होते. कोरकूंच्या लोकजीवनाचे असे एकही अंग नाही की, त्यावर लोकगीत नसेल म्हणून. एकूणच कोरकूंच्या समग्र लोकजीवनाला लोकगीतांनी व्यापून टाकले आहे. कोरकूंच्या लोककथांमध्ये पद्य व गद्य अशा दोन्ही प्रकारच्या लोककथा आहेत. त्यात प्रामुख्याने दैवत कथा, उत्पत्ती कथा, परिकथा-अदभूत कथा, बोधकथा-प्राणीकथा इत्यादी कथांचा समावेश करता येतो. निसर्ग, पशू-पक्षी, प्राणी यांच्या वर्णनिबरोबरच कोरकूंच्या मानवी प्रवृत्तीवर या कथांमधून प्रकाश पडतो. कोरकू बोलीत अनेक प्रकारच्या म्हणी, वाकप्रचार, उखाणे असल्याचे दिसते. जीवन जगतांना पावलोपावली येणारे भाव या लोकसाहित्यातून व्यक्त होतात. त्यातील सहजता,

स्वाभाविकता, ओधवतेपणा वैशिष्टपूर्ण आहे.

**कोरकू लोकगीते :**

लोकगीते ही साहित्य आणि संस्कृतीचा आरसा असतात. त्यांची निर्मिती ही कुठल्याही व्यक्तीच्या नाही तर समाजाच्या मुखातून झालेली असते. हजारो वर्षापासून समाजातील विभिन्न अंगाना स्पर्श करणारी लोकगीते समाज जीवनाचा अभिन्न घटक बनलेली आहेत. काळानुसार त्यात अनेक बदल होत आलेले आहेत. तरीही त्याची लोकप्रियता कमी झालेली नाही. आदिम संस्कृतीमध्ये लोकगीतांचे प्रचलन अधिक आहे. त्या अनुषंगाने माणसाच्या जन्मापासून तर मृत्यूपर्यत संपूर्ण जीवनाला या लोकगीतांनी व्यापून टाकल्याचे दिसते. लोकजीवनातील राग-लोभ, हर्ष, खेद, सुख-दुःख, विरहादी संघर्षाला ही लोकगीते अभिव्यक्त करतात. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे हस्तांतरित होणारा हा अनमोल वारसा आपल्या संस्कृतीची अमूल्य धरोहर आहे. समाजातील समकालीन परिस्थितीचे रेखाटन त्यातून होत असते. लोकगीतांची ही गंगोत्री कोरकू जमातीत हजारो वर्षापासून निरंतर प्रवाहीत आहे. मानवी जीवनातील भावनांचे विरेचन त्यातून होत आहे. कोरकू बोली ही लोकगीतांनी समृदध बोली आहे. या बोलीतील लोकगीते साधे, सरळ, लचविक आहेत. त्यामधील सौंदर्यात्मकता नजरेत भरणारी आहे. तर माधुर्य व गोडवा अंत : करणाला वेगळी अनुभूती प्रदान करते. कोरकू बोलीत लोकगीतांच्या खाणीच्या खाणी आहेत. हजारो वर्षापासून आपल्याच ढंगात, रंगात ही गीते कोरकूंनी ह्दयात जपलेली आहेत. या गीतांमध्ये जन्मापासून ते मृत्यूपर्यतच्या सर्व भावावस्था रेखांकित होताना

दिसतात. मूल जन्माला आल्यानंतर गीते गाऊन त्याचे स्वागत केल्या जाते. त्याचे संगोपन करताना त्याला विविध गीते ऐकवून मोठे केले जाते. त्याच्या सुखी व निरोगी आयुष्याकरिता विविध देव देवतांना गीतामधूनच आराधना केल्या जाते. त्याच्या जीवनातील संस्कार गीताद्धारेच केल्या जातात. आयुष्य जगतांना विविध सण, उत्सव, जत्रा-यात्रा प्रसंगी गीतेच त्याला साथ देत असतात. कोरकू लोकगीतांच्या लिखित संहिता कुठेही उपलब्ध नाहीत. एका पिठीकडून दुसऱ्या पिढीकडे ते आपसूकच हस्तांतरित होत आले आहेत. कोरकूंची अनेक लोकगीते ढोल, टिमकी, झांज, मंजिरा, थापटी, घुंगरु यासारखी वाद्य वाजवून गायिल्या जातात तर काही लोकगीते ही वाद्यविहीन आहेत. अशा गीतांमध्ये सुर, लय, ताल हेच गीतांचे अलंकार बनून त्यांचे सौंदर्य वाढवितात. कोरकू लोकगीतांमध्ये स्त्रियांची लोकगीते विपुल आहेत. कोरकू लोकगीते प्रत्यक्ष एकाला मोठी बहारदार असतात. त्या गीतामधील प्रत्येक ओवी आपला स्वतंत्र अर्थ सांगणारी असते. कोरकू जे जीवन जगतात तेच जीवनानुभव त्यांनी अनुभवलेले असतात, डोळ्याने पाहिलेले असतात आणि तेच त्यांनी गीतातून गायिलेले असतात. प्रत्येक कडव्याचा स्वतंत्र रचनाबंध असल्याचा दिसतो. धृवपदापासून सुरु झालेली गीत आपल्या स्वतंत्र ढंगाने पूर्णत्वाकडे जाते. अनेकदा गीतातली कडवे पुन्हा पुन्हा गायिल्या जातात. त्यामुळे त्यातील यमक व लय वैशिष्टपूर्ण ठरते. कोरकूंच्या लोकगीतांच्या चालीत बरेचदा साम्य दिसते. एकच चाल अनेकदा बऱ्याच गीतांना लावल्या जाते. स्त्रिया-पुरुष जेव्हा ही लोकगीते गातात. तेव्हा एक ठराविक प्रकारची लय आपोआप निर्माण होते, आवाजाचा चढउतार कडव्यानुरूप बदलता जातो. डोळे यात महत्त्वाची भूमिका बजावताता. गीतामधील अलंकार गीताला सौंदर्य प्राप्त करून देतात. हृदयातील भावनांना वाट

मोकळी करून देण्यासाठी कोरकू लोकगीतांचा आधार घेतांना दिसतात. त्यातूनच ओठावर आलेले दु:ख शब्दरूप होऊन गीताद्वारे पाझरत जाते. शेती, घर अशा ठिकाणी कष्टाचे काम करता करता गीतेच कोरकूंच्या मदतीला धावून जातात.

**कोरकू लोकगीतांचे प्रकार :**

कोरकू जमातीत विपुल प्रमाणात लोकगीते आढळतात. ही लोकगीते कोरकूंच्या जीवनाशी निगडीत आहेत. यामध्ये पुरुष-प्रधान लोकगीते, स्त्रीप्रधान लोकगीते, बालकांची गीते व इतर असे वर्गीकरण करता येते. कोरकू वर्षभर वेगवेगळया ऋतूत, मौसमात, सणउत्सवात वेगवेगळया प्रकारची गीते गातात. कोरकूंच्या पुरुषप्रधान लोकगीतांमध्ये चाचरी-गोग्गलजा, दंडा, ढांडेल, होरयार, झामटा, फगनाई अशा प्रकारची गीते आहेत. चैत्र, वैशाख महिन्यात पुरुष दिवसभऱ्याचे श्रम विसरुन रात्री चाचरी-गोग्गलजा ही गीते गाऊन नृत्य करतात. चंद्राचा मंद प्रकाश, थंडगार वाहणारा वारा अशा वातावरणात या गीतांची रंगत वाढत जाते. पुरुषांच्या उत्साह, आनंद यावेळी ओसंडून वाहतो. पावसाळ्यात जिरोती पासून पोळया पर्यत कोरकू पसरात पुरुषराच्या दंडा गीताची धूम असते. ढोल टिमकीच्या तालावार लाकडाची दंडे एकमेकावर आपटून पुरूष नृत्य करतात. होळी या सणात कोरकू तन-मन-धन विसरुन कोरकू सहभागी होतात. रंगून जातात. झामटा, होरयार, फगनाई अशा विविधारंगी गीताची बहार या सणात असते. होळी संपल्यावर फगनाई गीते विशेषत्वाने गायिल्या जातात. कोरकूंच्या प्रदेशावर निमाडी लोकसंस्कृतीचा देखील प्रभाव असलल्याचे दिसते.

त्यातुनच कोरकूत निमाडी लोकभजन हे सर्वत्र रुजल्याचे दिसते. या गीताच्या रचना हिंदीत असून त्यांना स्वतंत्र चाली आहेत. ही निमाडी लोकभजने कोरकू लोकगीतांचा अभिन्न अंग बनलेली आहेत. यामधील विविध भजने हार्मोनियम, तबला, मृदंग यांच्या साहाय्याने गायिल्या जातात. कोरकू जमातीत स्त्रियांची लोकगीते वैशिष्टपूर्ण आहेत. पाची, विवाह, चिलुडी, झामटा, डोलार, दसवा, फुलजागनी अशा प्रकाराची गीते स्त्रिया गातात. अनेकदा स्त्रियांचे दोन समुह करुन गीते गायिल्या जातात. गेयता हा कोरकू लोकगीतांचा धर्म आहे. त्याशिवाय गीते ओठांवर यातच नाहीत. कोरकूंचे धार्मिक जीवन हे लोकगीतांशिवाय पूर्ण होऊ शकत नाही. स्त्रिया व पुरुष मिळून देवगीते गातात. कोरकूंचा प्रत्येक सण व त्या प्रसंगी म्हणावयाची गीते त्यांना जगण्याची नवी प्रेरणा देतात. विविध प्रकारचे श्रम व कष्टाची कामे करताना कोरकू स्त्रिया जात्यावरील गीते, निंदाई गीते गातात. सोबतच लहान मुलांच्या मनोरंजनासाठी अनेक प्रकारची अंगाई गीते कोरकू स्त्रिया गातात.

**चाचरी –गोग्गलजा गीते** :

चाचरी गोग्गलजा हा पुरुषप्रधान कोरकू लोकगीतांचा एक प्रमुख प्रकार आहे. होळीचा सण संपल्या नंतर उन्हाळयाची चाहूल लागते. दिवसा सर्वत्र रखरखते ऊन असते. अशा दिवसात रात्री चंद्राच्या प्रकाशात गावागावात चाचरी-गोग्गलजाचे आयोजन केल्या जाते. रात्रीचा गार वारा, चंद्राचा शीतल उजेड, आकाशातील चांदण्या अशा मोहक वातावरणात कोरकूंची गावे न्हाऊन निघतात. दिवसभऱ्याचे कष्ट संपून रात्रीला शरीराला

आराम देण्याची ही वेळ असते. पण कोरकू पुरुष मंडळी यावेळी चाचरी-गोग्गलजा नृत्य करतात. रात्री जेवण झाल्यानंतर गावातील पुरुष एकत्रित येतात. दोन समांतर टोळयांमध्ये विभाजित होतात. आणि चाचरी-गोग्गलजासाठी वातावरण निर्मिती व्हायला प्रारंभ होतो. चैत्र आणि वैशाख महिन्याचा हा काळ असतो. फागुनची मस्ती संपून गेलेली असते. पावसाळयाला थोडा अवधी असतो. शेतीच्या कामातून फुरसत मिळते. अशावेळी रात्रभर चाचरी-गोग्गलजाची रंगत वाढत जाते. ही गीते गातांना नृत्य केल्या जाते. ही गीते वाद्यविहीन असून हाताची टाळी व आरोळ्या ठोकून ही गीते गापिल्या जातात. एखाद्या वेळी घुंगराची मदत घेतल्या जाते. या गीतांचे प्रयोजन म्हणजे जलदेवता प्रसन्न व्हावी, शेती मातीत समृदधता यावी, सर्वाचे भरणपोषण व्हावे यासाठी देवतांना केलेली आराधना असते. खेडा-मुठवा, चंद्र-सूर्य, धरती-आसमान, भिमा-अर्जुना या देवांना प्रार्थना करून प्रसन्न करण्याचा प्रयत्न केला जातो. चाचरी-गोग्गलजात सुरुवातीला गोग्गलजा ही गीते गायिल्या जातात. एक व्यक्ती आंचनी गाऊन गीताला प्रारंभ करतो. त्यानंतर इतर व्यक्ती त्या गीताला उचलतात. धृवपद संपल्या नंतर उपस्थित पुरुष आरोळी ठोकतात. गोग्गलजा म्हणजे गोलाकार नृत्य, श्रीकृष्णाच्या रासलीले सारखे गोल गोल फिरुन हे नृत्य केल्या जाते. गीते गायिल्या जातात. गतिमानतेचे प्रतीक असणारे हे गोग्गलजा नृत्य जीवनात निरंतर चालत राहण्याचा संदेश देते. यामध्ये गीत चालू असतांना पुरुषांच्या दोन टोळयापैकी एक टोळी गीताला सुरुवात करते. ती अर्ध्या पर्यत सरळ गोलाकार नृत्य करीत फिरते. अर्ध्यात गेल्यावर परत फिरते. अशाप्रकारे एका मागोमाग दोन टोळया सरळ उलट फिरत जातात. टाळयांची लय, आरोळया, बध्याचे प्रोत्साहन यामुळे नृत्याला रंगत येते. साधारणपणे मध्यरात्रीपर्यत

गोग्गलजा हे नृत्य व गीते गायील्या जातात. त्यानंतर चाचरी गीताला सुरुवात होते, येथे गीत बदलले की नृत्याचा प्रकारही बदलतो. पूर्वीच्या गोलाकार फिरणाऱ्या टोळया समोरासमोर होतात. एका टोळीतील पुरुष एक पाय समोर व एक मागे टाकून नृत्य करतात. यावेळी टाळी व आरोळी यांचा समन्वय साधल्या जातो. यावेळी दुसऱ्या टोळीतील लोकांचा एक पाय मागे असतो. त्यांनी तो पाय पुढे टाकला की, समोरच्या टोळीतील माणसे आपला पाय मागे घेतात. खाली वाकून टाळया वाजवितात. अशा रितीने नृत्य केले जाते. चाचरी-गोग्गलजा या गीतांचे विषय कोरकूंच्या सामाजिक जीवनातील असतात. थट्टा, मस्करी, मनोरंजन यातून केले जाते. प्रत्येक प्रहराला गीत बदलत जाते. भवई सणापर्यत कोरकूंचे हे चाचरी-गोग्लजा गीते व नृत्य चालु असते. इतर दिवशी प्रेक्षक बनलेल्या स्त्रिया शेवटच्या दिवशी यात सहभागी होतात. दु:ख, कष्ट, चिंता यांना कवटाळून न बसता जीवनाचा प्रत्येक क्षण आनंदाने जगण्याचा प्रयत्न करणारे कोरकू आदिवासी खरेच धन्य वाटतात. खालील गोग्गलजा गीतात, कन्हैया गोल गोल नाचत आहेत, तेव्हा इतर देवतांनी सुदधा यावे असे आवाहन केले आहे.

गोग्गलज्या रे रे रांगे नाचे बैकनिया
गोग्गलज्या रे रे रांगे नाचे बैकनिया
तोने माज्या देवा, ताके राजा बैमानिले
गोग्गलज्या रे रे रांगे नाचे बैकनिया
खेडा माज्या मुठवा के राजा बैमानिले

गोग्गलज्या रे रे रांगे नाचे बैकनिया
तोने माज्या देवा, ताके राजा बैमानिया
गोग्गलज्या रे रे रांगे नाचे बैकनिया
चांदे माज्या सुरजो के राजा बैमानिया
गोग्गलज्या रे रे रांगे नाचे बैकनिया
तोने माज्या देवा, ताके राजा बैमानिले
जारा माज्या जो धाके राजा बैमानिले
गोग्गलज्या रे रे रांगे नाचे बैकनिया

**स्त्रोत** : रामलाल साबू कासदेकर, साबूलाल बाटू पटोरकार ग्राम, सुसर्दा, ता. धारणी, जि. अमरावती.

**शब्दार्थ** :- गोग्गलजा-नृत्याचा एक प्रकार, रांगे-गोल, कनिया-कन्हैया, तोने-कोणत्या, नाचे-नाचणे.

**भावार्थ** : गोग्गलजा नृत्यात कन्हैया गोल गोल नाचतो आहे. तुम्ही कोणाला देव मानले आहे ? तर आम्ही खेडा, मुठवा, चंद्र, सूर्य, जारा यांना देव मानले आहे, त्यांनी सुदधा यावे असे वर्णन या गीतातून व्यक्त होते. विविध देवतांचा कृष्णाशी संबंध या गीतातून जोडल्या जातो. या गीतातील धृवपद वारंवार गायिल्या जाते. त्यामुळे या गीताची लय शेवटपर्यंत कायम राहते.

हो खेनजा नांगरो जा भाग्या खंडव्या जा हिडा बोरोटे भाग्या चलकेन
हो खेनजा नांगरो जा भाग्या खंडव्या जा हिडा बोरोटे भाग्या चलकेन
जिवडी ओजा टे भगनी हाजेडो भाग्या नारी डो इडे
जिवडी ओजा टे भगनी हाजेडो भाग्या नारी डो इडे
भाग्या रे डो भगनी इडे डो जिरी जो बीना भाग्या चलकेन
भाग्या रे डो भगनी इडे डो जिरी जो बीना भाग्या चलकेन
जिवडी ओजा टे भगनी हाजेडो भाग्या नारी डो इडे
जिवडी ओजा डे भगनी हाजेडो भाग्या नारी डो इडे

**स्रोत** : बाबूलाल ढोल्या कासदेकर, ग्राम-सलोना, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : भाग्या-नोकर (कामावरचा गडी), खेनजा नांगरो- लाकडी नांगर, खंडव्या-खांद्यावर, हिडा-नदीच्या, बोरोटे-दिशेने चलकेन- जात आहे, जिवडी-जू, ओजा-खांद्यावर घेणे, नारी-न्याहारी, इडे -आणणे, हाजेडो-येणे.

**भावार्थ** :

कोरकू ही मेहनत करणारी जमात आहे. शेती मातीवर कष्ट करून पोट भरणारी ही माणसे सदैव एकमेकांना साथ देतात. या चाचरी गीतातून हे दिसून येते. एका गावातील शेतकरी दाम्पत्याचे प्रेम या गीतातून प्रकट होते. भाग्या हा कामवरचा गडी नांगर खांद्यावर घेऊन नदीच्या दिशेने शेतात जात आहे. तो

आपल्या बायकोला म्हणजेच भगनीला म्हणतो की, 'तू न्याहारी घेऊ ये. मी खांद्यावर जू घेऊन पुढे जातो.' कोरकूंचे दाम्पत्य प्रेम कमालीचे अतुट असते. जीवनात येणाऱ्या प्रत्येक प्रसंगाला ते एकमेकांच्या सोबतीने तोंड देतात, याचा प्रत्यय या गीतात येतो.

पान खायो डो जमूनय मुँहमे रांगा गये डो
डिजा बने डो जमूनय कोरा डो रे
पान खायो डो जमूनय मुँहमे रांगा गये डो
डिजा बने डो जमूनय कोरा डो रे
आम्मा बोरोनडो जमूनय चुजारे सोना डो
डिजा बने डो जमूनय कोरा डो रे
आम्मा बोरोनडो जुमानय चुजारे सोना डो
डिजा बने डो जमूनय कोरा डो रे
आम्मा बोरोनडो मोंडी रे सोना डो
डिजा बने डो जमूनय कोरा डो रे

**स्रोत** : मोतीलाल हिरालाल तांडेलकर, मु. पो. हरिसाल, ता. धारणी जि. अमरावती.

**शब्दार्थ** : मुँहमे- तोंडात, कोरा- रस्ता, बारोंनडो-बनविणे, मोंडी-अंगठी, डिजा-तिची, डोरे- वाट पाहणे, आम्मा-मी, चुजारे- काय, कसले, बनेडो-करीता, साठी.

**भावार्थ** : कोरकूंचे जीवन प्रेमाने भरलेले आहे. निसर्गाच्या सानिध्यात, प्रकृतीच्या मोहक वातावरणात त्यांचे प्रेम अधिकच खुलते, जंगल, शेती, नदी, विहिरी, गाव, घर अशा ठिकाणी अनेक प्रेमवीर प्रेमाच्या आणाभाका घेतात, साथ देण्याची वचने देतात. आपला जीवन साथी निवडतात. त्यातूनच कोरकूंच्या प्रेमविषयक भावना अनेक लोकगीतांचा विषय बनतात. प्रस्तुत गीत हे असेच एक प्रेमगीत आहे. या गीतात नायकाने आपली प्रेयसी म्हणजे जमूनय साठी सोन्याची अंगठी बनविली आहे. पान खाऊन त्याने आपले तोंड रंगविले आहे. रस्त्यावर तो तिची वाट पाहत आहे. एका प्रियकराचे आपल्या प्रेयसीप्रती असणारे प्रेम व आतूरता या गीतातून व्यक्त होते. प्रियकराचे पान खाऊन तोंड रंगविणे, तिच्यासाठी अंगठी बनविणे या प्रेमसुलभ भावना या गीतातून रेखाटल्या गेल्या आहेत.

अरे जा गारगोटी डो साकरागोटी कमला, बाऊना गारागोटी डो साकरागोटी कमला रे
अरे जा गारगोटी डो साकरागोटी कमला, बाऊना गारागोटी डो साकरागोटी कमला रे
अरे जा बाऊना आमाना बोटो मोडी सुवाना का डो बुवा डो गारगोटी डो साकरा गोटी कमला रे
अरे जा बाऊना आमाना बोटो मोडी सुवाना का डो बुवा डो गारगोटी डो साकरा गोटी कमला रे

**स्रोत** : भुलली धांडेकर, ग्राम अढाव, ता. चिखलदरा जि. अमरावती.

सागरगोटी.

शब्दार्थ : साकरागोटी-सागरगोटी, आमाना-माझी, बोटो-बोटे, मोडी-अंगठी

**भावार्थ** : कोरकू स्त्रियांना दागिन्यांची खूप हौस असते. तारूण्यात पदार्पण करणाऱ्या मुली तर खास

करून नटतात. दागिने घालून प्रियकराला साद देतात. प्रियकर सुद्धा त्यांच्या भावना ओळखून त्यांची हौस पूर्ण करतात. या गीतामध्ये अशाच एका प्रियकराने आपल्या प्रियसीच्या बोटातील अंगठीचे वर्णन केले आहे. अंगठी हा कोरकू बालांचा आवडता दागिना आहे. या गीतातील नायक त्याच्या प्रियसीला म्हणतो, 'तुझ्या हाताच्या बोटातील अंगठी खुप सुंदर आहे. ती गारगोटी, सागरगोटी सारखी मृदू मुलायम आहे.' अंगठी हा दागिना असा आहे की त्यामुळे प्रेम द्विगुणीत होते. प्रियसीच्या सौंदर्याबरोबरच तिच्या दागिन्यांची स्तुती करणारा हा प्रियकर अशा अनेक प्रयत्नातून तिचे प्रेम प्राप्त करतो.

काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे वा, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे
काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे वा, काल्या वेल्या बोर डोंगरा भिगी चेलो रे
तोटीमा काट नायो रे मारो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे
तोटीमां काट नायो रे मारो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे......काल्या वेल्या
राजा का टेंगन बांधो चलो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे
राजा का टेंगन बांधो चलो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे ...काल्या वेल्या
का झाडो चढो बांधो चलो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंग भिगी चेलो रे
का झाडो चढो बांधो चलो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे .....काल्या वेल्या
का गीरी चोढन मारो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे
का गीरी चोढन मारो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे

का गीरी चोढन मारो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे....काल्या वेल्या
केनी टायन मारो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे
केनी टायन मारो वेल्या, काल्या वेल्या बोर डोंगर भिगी चेलो रे.....काल्या वेल्या

**स्त्रोत** : शेकलाल मनाजी बेसलरे, ग्राम. अढाव, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : काल्या वेल्या-बैलाचे नाव, भिगी चेलो रे-हळूहळू चला, बोर डोंगर- डोंगराचे नाव, तोटी-कुंपण, नायोरे- तोडू नका, टेंगन-उभे, झाडे-झाडा झुडपे, गिरी चोढन-डोंगर चढणे, केनी टायन-कोणत्या वेळेला.

**भावार्थ** :

या गीतातील नायक आपल्या काल्या वेल्या नावाच्या बैलांना म्हणतो आहे, 'तुम्ही हळूहळू बोर डोंगर चढा. आजूबाजला लागणाऱ्या शेताचे कुंपण तोडू नका. झाडा झुडपातून हळूहळू डोंगर चढा. गिरी डोंगराचा चग हळूहळू चढा. किती वेळ झाली आहे तेव्हा चला.' कोरकू जमातीचा मुख्य व्यवसाय शेती हाच आहे. त्यांची शेती ही डोंगर दऱ्यातील कष्टाची शेती आहे. या शेतीत त्यांच्या मदतीला बैल हेच असतात. या बैलांना उददेशून वरील गीत गायिल्या गेले आहे. एका व्यक्तीचा आपल्या बैलाप्रती असणारा स्नेहभाव, प्रेमभाव या गीतातून व्यक्त होतो.

चाचरी-गोग्गलजा या प्रकारातील गीतांचे विषय कोरकूंच्या दैनंदिन जीवनाशी निंगडित आहेत. पारंपरिक जीवन मूल्ये, शेतीविषयक कामे, त्या विषयीची कृतज्ञता, कौटुंबिक नातेबंध, प्रेमाच्या सौंदर्यसुलभ

भावना या गीतांतून प्रकट होते. एकमेकांप्रती असणारा स्नेहभाव, आपुलकी, प्रेम यातून वाढीस लागते. चाचरी गोग्गलजा म्हणजे सर्वांना एकत्र आणून आनंद घेणे, असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

**ढांडेल गीते** :

कोरकू पुरुष ढांडेल गीते रांडभावे या सणाच्या दिवशी गातात. हा सण जेष्ठ महिन्याच्या अमावास्येला साजरा केल्या जातो. पावसाच्या स्वागतासाठी हे आयोजन करण्यात येत. या सणाला अनेक गावात खेडादेवाची पूजा करुन त्याला पांढऱ्या रंगाच्या बोकडयाचा नवस देतात. गावाच्या उत्तरेला असणाऱ्या खेडादेवा जवळ पुरूष मंडळी एकत्र येऊन पूजाअर्चा करतात. परत येताना  हिरव्या बास्याचे नवीन पुराने आणतात. वर्षभर त्याचा उपयोग बैलांना हाकलण्यासाठी केला जातो. त्यासोबतच हिरव्या बास्याचे एक गोल चक्र बनवून ते गृहदेवा जवळ ठेवतात. वर्षातून केवळ एक दिवस ही गीते गायिल्या जाऊन नृत्य केले जाते. ठांडेल गीते गाताना त्यात पंधरा ते वीस पुरुषांचा सहभाग असतो. आडा ढांडेल व चाचरी ढांडेल असे ढांडेलचे दोन प्रकार असून त्यातील नृत्य देखील वेगवेगळे असते. ढोल, टिमकी, लाकडाचे दंडे या गीतात संगीतासाठी वापरले जातात. यावेळी पुरुष लाकडाचे दंडे एकमेकावर जोडी जोडी ने तीनदा मारुन नृत्य करतात. भगवान श्रीकृष्णाच्या रासलीलेसारखे हे नृत्य असून या वेळी म्हणावयाची गीते वैशिष्टयपूर्ण आहेत. प्रेम व शृंगार हे या गीतांचे खास वैशिष्ट असते. अनेक ढांडेल गीतामधून देवाविषयीची श्रद्धा, मानवी हृदयातील प्रेमभावना, सौंदर्यात्मक पद्धतीने अभिव्यक्त होतात.

महादेव गौरनिजा ब्याव, डाऊ माजोय, महादेव गौरानिजा ब्याव, डाऊमारो
तोनीमा देवता केजा महादेव न्योता भेजा, महादेव गौरानिजा ब्याव, डाऊमारो
चांदमा सुरजा केजा महादेव न्योता भेजा, महादेव गौरानिजा ब्याव, डाऊमारो
महादेव गौरानिजा ब्याव, डाऊ माजोय, महादेव गौरानिजा ब्याव, डाऊमारो
तोनीमा देवता केजा महादेव न्योता भेजा, महादेव गौरानिजा ब्याव, डाऊमारो
खेलजा मुठवा केजा न्योता माजोय, महादेव गौरानिजा ब्याव, डाऊमारो

**स्त्रोत** : नंदू चिमोटे, ग्राम भांडूम, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : महादेव गौरानिजा-महादेव पार्वती, डाऊ माजोय-होत आहे, ब्याव-लग्न, तोनीमा-कोणत्या, न्योता-निमंत्रण.

**भावार्थ** : ढांडेल गीतातून अनेकदा देवदेवतांची आराधना केलो जाते. कोरकूंच्या देवामध्ये महादेवाचे स्थान महत्त्वपूर्ण आहे. महादेव हे त्यांचे आराध्य दैवत आहे. त्यातूनच अनेक कोरकू लोकगीतातुन महादेवाच्या जीवनाचे मानवीकरण केल्याचे दिसते. प्रस्तुत गीतामध्ये महादेवाच्या लग्नाच्या वर्णन आलेले आहे. महादेव पार्वतीचे लग्न होत आहे. त्यासाठी कोणकोणत्या देवांना निमंत्रण पाठविले आहे ? तर या लग्नासाठी चंद्र, सूर्य, खेडा-मुठया या देवांना निमंत्रण पाठविले आहे, असे वर्णन या गीतात येते.

ये टिपो जाटी डो टिपो ताडायेन, भोपा जाटी का नांडो रे
ये टिपो जाटी डो टिपो ताडायेन, भोपा जाटी का नांडो रे

येनी गावाकू चोजामा त्यौवार डोडो भोपा जाटी का नांडो रे
येनी गावाकू चोजामा त्यौवार डोडो भोपा जाटी का नांडो रे
येनी डो गावको भवई त्योहार डोडो भोपा जाटी का नांडो रे
येनी डो गावको भवई त्योहार डोडो भोपा जाटी का नांडो रे

**स्त्रोत** : भूलजी धांडेकर, ग्राम अढाव, ता. चिखलदरा, जि. अमरावती

**शब्दार्थ** : टिपो-जात्याचा मधील भाग, ताडायेन-तुटले, येनी-या, गावाकू-गावातील, त्यौवार-सण, डोडो-करीत आहे.

**भावार्थ** : या ढांडेल गीतामध्ये अनेकदा रोजच्या जगण्यातले प्रसंग वर्णन केल्या जातात. प्रस्तुत गीतात जात्याचा संदर्भ आलेला आहे. पूर्वीच्या काळात जाते हे कोरकूच्या जीवनातील एक महत्वाचे साधन होते. पहाटेच उठून कोरकू स्त्रिया जात्यावर दळत असत. या गीतामध्ये पुरूष म्हणतात, 'जात्याच्या मधील लाकडाची खुट तुटलेली आहे. त्यामुळे ते आता कुठल्याही कामात येणार नाही. या गावात आता कोणता सण साजरा होतो आहे तर या गावात भवई सण साजरा होत आहे.'

ढांडेल गीतामधून अशा प्रकारे कोरकू लोकसंस्कृती मधील अनेक गोष्टींचे वर्णन अभिव्यक्त होते.

**दंडा गीते** :

कोरकूंनी आपल्या मनोरंजनासाठी निसर्गातील विविध घटकांचा खुबीने वापर करून घेतला आहे.

विविध प्रकारची वाद्ये, त्यातील ध्वनी, त्यावरील नृत्य व त्यातून मनोरंजन यांचा सुंदर मिलाफ कोरकूंच्या लोकसंस्कृतीत दिसून येतो. दंडा गीतांच्या बाबतीतही हेच तत्व लागू पडते. हिरव्या टणक बास्याचे केलेल दंडे, ढोल, टिमकी यांचा सुरेख संगम दंडा गीतात साधल्या जातो. हे गीते पुरूष प्रधान असून ती नृत्य करून गायिल्या जातात. दंडा खेळ हा दंडयाचे ध्वनी, ढोलाचा ताल, गीताची लय यावर अवलंबून असतो. दंडा हा खेळ गावागावात जिरोती पासून पोळयापर्यत खेळल्या जातो. दिवसा वेळ मिळाला की, गावातील पुरूष एकत्र येऊन हा खेळ खेळतात. हे पावसाचे दिवस असतात. त्यावेळी सृष्टी पावसाने चिंब भिजून गेलेली असते. रानावनावर हिरवा शालू पांघरलेला असतो. शेतातील पिके मौजेने डुलत असतात. आकाशात ढगांचा लपंडाव सुरु असतो. कधी हलक्या तर कधी जोराच्या पाऊसधारा आकाशातून बरसत असतात. धरणीवर हिरवा चारा गुरा ढोरांना उपलब्ध झालेला असतो. नद्या वाहत असतात. वृक्ष वेलीनी जणू हिरवा शृंगार केलेला असतो. माणसांना पेरणी, मशागती पासून थोडी उसंत मिळालेली असते. अशा अल्हादायक वातावरणात दंडा गीते गाऊन नृत्य केल्या जाते. दंडा नृत्य व गीतांची उत्पत्ती राम-लक्ष्मण वनवासात असताना त्यांनी केल्याचे पौराणिक दाखले अनेक दंडा गीतात सापडतात. त्या राम लक्ष्मणाचा वारसा हजारो वर्षापासून मोठया प्रयत्न पूर्वक व निष्ठेने आदिवासींनी जोपासलेला आहे. दंडा गीताना सुरुवात करण्यापूर्वी लेंगी गातात. लेंगी म्हणजे एक प्रकारचा प्रश्न असतो. या प्रश्नाने गीताला सुरुवात केलो जाते. लेंगी गातांना ढोलाचा ताल वेगळा असतो. लेंगी संपताच गीताला सुरुवात केला जाते व त्या लेंगीचे उत्तर गीतातून दिला जातो. दंडा नृत्य हे गोलाकार पदधतीने केला जात. गोलाकार नृत्य करणारे पुरुष एका ठिकाणी थांबतात. त्यापैकी एक व्यक्ती

लेंगी गातो. त्या लेंगीवर दुसरा व्यक्ती गीत उचलतो. इतर लोक गोलाकार नृत्य करून त्या गीताला साथ देतात. गीताच्या ठेक्यानुसार नृत्याचे स्वरुप बदलते. साधारणपणे एका कडव्या पर्यत सरळ दिशेने नृत्य करणारे लोक कडवे बदलले की उलटया दिशेने फिरतात. अशा रितीने पुरुषांच्या टोळयाच्या टोळया गल्लोगल्ली नृत्य करीत फिरतात. आपल्याच मस्तीत दंग होऊन प्रेमिकांना साद घालतात. सृष्टी विषयी कृतज्ञाता प्रकट करतात. एकमेकांविषयीचे प्रेम, आपुलकी, एकता यातून वाढील लागते. पोळयाच्या दुसऱ्या दिवशी दंडा गीताची सांगता होते. त्या दिवशी लोक नृत्य करीत गावाला प्रदक्षिणा घालतात. नाचत गात नदीवर जाऊन दंडयाचे विसर्जन करतात. मद्य पिऊन भोजन करतात व आनंद व्यक्त करतात. दंडा गीतांचे विषय हलके फुलके रोजच्या जगण्यातले असतात. सृष्टी, निसर्ग, देवतांची गीते, प्रेमविषयक भावना या गीतांमधून व्यक्त होतात.

पक जाय आंबो का निचे अरे मोरो आंबोये
ये गंगा जमूना को आंबे लाये अरे जमूना को
ये चाँद ओ सुरजा को, ये रे जमूना को, ये चाँद ओ सुरजा को
पकया देना धरती को, अरे जमूना को, ये गंगा जमूना बहे चले रहेजा
ओ ये नदी किनारे, ये गंगा समूंदरा कोना को, चारी कोना समुंदरा बहे चले जा
ओ ये जमूना बहे चले जा, धिना अधीरताये गंगा समुंदरा बहे रे चले जा.

**स्त्रोत** : गंगाराम पत्तीराम बेलसरे, ग्राम. बोरी, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : पकजाये-पिकणे, आंबो-आंबा, समुंदरा-समुद्र, गंगाजमूना- नद्यांची नावे.

**भावार्थ** : आमराईतून पिकलेले आंबे आणलेले आहेत. चंद्रसूर्य, गंगा-जमूना यांच्यासाठी आणलेले आहेत. गंगा-जमुना या नद्या अविरत वाहत आहेत. समुद्राला जाऊन मिळत आहेत. त्यांचे अविरत वाहणे, समुद्राला जाऊन मिळणे, माणसाला चालत राहण्याचा संदेश देतात, असा भाव या गीतातून व्यक्त होतो.

अरे बिजा झाडो का ढोल बनियो नरे, अरे बिजा झाडो का ढोल बनियो नरे
अरे हरण का चमडा लगा रे, अरे हरण का चमडा लगा रे
अरे हरा बांस का कोंड लगा, अरे हरा बांस का कोंड लगा
अरे ढोलल का आवाज सुना, अरे ढोलक का आवाज सुना रे

**स्त्रोत** : ग्रामस्थ मंडळी ग्राम, गडगाभांडूप, ता. धारणी, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : बिजा-एक झाडाचा प्रकार, ढोल-एक वाद्य, चमडा-चामडे, कोंड-ढोलाला तान येण्याकरिता वापरावयाचे हिरव्या बास्याची साल.

**भावार्थ** : वाद्ये ही कोरकू लोकसंस्कृतीचे महत्त्वाचे अंग आहे. या दंडागीतामध्ये कोरकूंचे प्रमुख वाद्य असलेल्या ढोलाची निर्मिती प्रक्रियाच उलगडली गेली आहे. बिजा झाडाच्या खोडापासून ढोल बनविला आहे. त्यावर दोन्ही बाजूने हरणाचे चामडे लावले आहे. ते चामडे हिरव्या बांबूच्या सालीने तानून घेतले आहे, त्या ढोलाचा येणारा आवाज सर्वांनी ऐकावा, असे वर्णन या गीतात येते.

बारा बारासो बाजोंटी बाजोंटीवाले बैई बारा बारासो बाजोंटी

कुणीयाला देवानो सेवारे सेवानावाले बैई बारा बारासो बाजोंटी
खेरयाला देवानो सेवारे सेवानावाले बैई बारा बारासो बाजोंटी
चांदयाला देवानो सेवारे सेवानावाले बैई बारा बारासो बाजोंटी
भोला चुक सेवारे सेवानावाले बैई बारा बारासो बाजोंटी

**स्त्रोत** :रामलाल साबू कासदेकर, साबूलाल बाटू पटोरकार, ग्राम. सुसर्दा, ता. धारणी, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : बारा बारोसो-बाराही महिने, बाजोंटी-निपुत्रिक, कुणीयाला-कोणत्या, सेवारे-पूजा करणे, सेवानेवाले- सेवा करणे.

**भावार्थ** : या गीतामध्ये एका निपुत्रिक स्त्रीचे वर्णन आलेले आहे. त्या स्त्रीला मुलबाळ नसल्याने सगळे लोक तिला हिणवतात.तिला चांगली वागणूक मिळत नाही. त्यामुळे ती स्त्री लेकरासाठी अनेक प्रयत्न करते. ती निपुत्रिक स्त्री वर्षभर कोणत्या देवाची सेवा करते तर ती प्रामुख्याने खेडा, चंद्र, सूर्य, महादेव अशा देवतांची सेवा करते, असे वर्णन या गीतात आलेले आहे.

ढोलजा साना ढोला थाळा रुकेजा, इनसेनेवा पावी रुरु
ढोलजा साना ढोला थाळा रुकेजा, इनसेनेवा पावी रुरु
इनसेकेलई इनके डोटे लाडा केन इनसेनेवा पावी रुरु
इनसेकेलई इनके डोटे लाडा केन इनसेनेवा पावी रुरु
ढोलजा साना ढोला थाळा रुकेजा, इनसेनेवा पावी रुरु

ढोलजा साना ढोला थाळा रुकेजा, इनसेनेवा पावी रुरु
इन रुमका ढोला ताळा डुबका केंडो इनसेनेवा पावी रुरु
इन रुमका ढोला ताळा डुबका केंडो इनसेनेवा पावी रुरु

**स्रोत** : भुलजी धांडेकर, ग्राम. अढाव, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : ढोलजा साना-ढोल वाजविणारा, थाळा-तुझा, रुकेजा-वाजविणे, इनसेनेवा-मी जातो, पावी- बासरी, रुरु-वाजविणे, इनके -मला, डोटे -पाहणे, लाडाकेन-हासणे, रुमका-एका मुलीचे नाव, डुबका केंडो-धक्का देणे.

**भावार्थ** : प्रस्तुत गीतात नायक म्हणतो, 'दंडा खेळण्याकरिता ढोलजा याने आपला ढोल वाजविला आहे. मी बासरी वाजवायला जातो आहे. रूमका नावाची एक चलबिचल मुलगी मला पाहून हसली आहे. त्या मुलीने ढोल वाजविणाऱ्याला धक्का दिला आहे. ढोल वाजत आहे.' दंडा गीतातील नृत्याची ओढ या गीतातून प्रकट होते.

जांबू थाळा माकी आबा माकीजा इनसेनेवा दंडा होंजो
जांबू थाळा माकी आबा माकीजा इनसेनेवा दंडा होंजो
जिरटी त्यौवार हेचकेनजा आबा हेचकेनजा इनसेनेवा दंडा होंजो
जिरटी त्यौवार हेचकेनजा आबा हेचकेनजा इनसेनेवा दंडा होंजो
जोबू थाळा माकी आबा माकीजा इनसेनेवा दंडा होंजो

जोबू थाळा माकी आबा माकीजा इनसेनेवा दंडा होंजो

पोळा त्यौहार हेचकेनजा आबा हेचकेनजा आबा हेचकेनजा इनसेनेवा दंडा होंजो

पोळा त्यौहार हेचकेनजा आबा हेचकेनजा आबा हेचकेनजा इनसेनेवा दंडा होंजो

**स्रोत** : भुलजी धांडेकर, ग्राम. अढाव, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : जांबू-जांभूळ, थाळा-लाकडे, दंडा, माकी-कापणे, तोडणे, आबा-एक संबोधन, माकीजा-कापून आणणे, इनसेनेवा-मी जातो, होंजो- खेळणे, हेचकेनजा-आला आहे.

**भावार्थ** : या गीतात नायक म्हणतो, 'दंडा खेळण्याकरीता हे आबा, तू जांभुळाच्या झाडाचे दंडे कापूण आण. मी दंडा खेळायला जातो. जिरोती व पोळयाचा सण आलेला आहे. तेव्हा मी दंडा खेळायला जातो.' अशा प्रकारे पुरुषांच्या मनातील उत्साह, जोस, दंडा गीतातून व्यक्त होतो. दंडा गीते म्हणजे मनोरंजन व आनंद यांची पर्वणी असते.

**फगनाई गीत** :

दिवाळी झाल्यानंतर कोरकूंच्या प्रदेशात होळीचे वारे वाहू लागते. प्रत्येक स्त्री-पुरुष आतुरतेने फागूनची वाट पहायला लागतात. उन्हाच्या झळा जाणवू लागतात. थंडीचा जोर कमी झालेला असतो. शेतीमातीतील कामे संपल्यात जमा असतात. निसर्ग वसंत ऋतूच्या आगमनामुळे बहरलेला असतो. पळसाची फुले आपली दाहकता प्रकट करू लागतात. सगळे वातावरण आपल्या मस्तीत दंग होते अशा प्रेरणादायी, रमणीय काळात

फागून येतो. कोरकू बोलीत याला 'फाग पर्व' असे म्हणतात. कार्तिक पोर्णिमेच्या पूर्णा, मुलताई, ताप्ती, नर्मदा या यात्रा संपल्यानंतर हे पर्व सुरू होते. तेव्हापासून गावागावात फगनाई गीते गायला प्रारंभ होतो. हे गीते स्त्री-पुरुष समूहाने गातात. गावागावात स्त्रिया-पुरुष आप-आपल्या टोळ्या बनवितात. नाचतात, गातात. स्त्रियांची फगनाई गीते वाद्यविहिन स्वरुपाची असतात. ती फक्त एका सुरात लयीत, गायिल्या जातात. पुरुष फगनाई गीते गाताना मात्र अनेक वाद्ये वाजवितात. ढोल, टिमकी झांज या वाद्यांच्या साथीने पुरुषांच्या फगनाई गीताना रंगत येते जाते. दिवाळीपासून होळीपर्यतच्या कालावधीत या गीतांना गायिल्या जाते. गावागावात माणसांच्या टोलच्या टोळ्या यात दंग होतात. स्त्रिया रस्त्या रस्त्याने सामूहिक स्वरुपात एकमेंकीचा हात घरुन नृत्य करतात. फेर घरतात. साधारणपणे दोन गटात ही गीते गायिल्या जातात. स्त्रियांचा पहिला गट गीताला सुरुवात करतो तर दुसऱ्या गटातील स्त्रिया त्या गीताला पुनरुक्त करुन गातात. फगनाई गीतामध्ये कोरकू जनजीवनाचे अनेक रंग प्रकृतिचे सौंदर्य, प्रेमविषयक भावना थट्टा मस्करी प्रकट होते. अनेक विषय गीतातून मांडल्या जातात. स्त्रियापुरुषांच्या भावभावना हर्ष-खेद, राग-लोभ सामूहिक स्वरुपात या गीतामधून प्रकय होतात. होळीनंतर पंचमीपर्यत कोरकू गावागावात फगवा मागतात. प्रत्येक धराधरातून महिला, पुरुष यांच समूह यात सहभागी होतात. साधारणपणे गावागातील पाटील, भूमका, सरपंच याच्या धरापासून फगवा मागण्यास सुरुवात होते. पुरुषांच्या टोल्या टिमकी, ढोल झांज धेऊन गीते गातात सूसून नृत्य करतात. धराच्या ओट्यावर बसून फगनाई गीते गातात. धरोधरी त्यांचे औक्षण कैल्या जाते. धान्य, पैसा, सिधा आटा त्यांना दिला जातो, तेथून मग पुढच्या धरी ती टोळी निघून जाते. याप्रमाणे स्त्रिया सुद्धा

गल्लीगल्लीत एकमेकीच्या हात धरुन नाचतात. फेर धरतात. फगवा मागतात गावात येणाऱ्या व्यक्ती, पाहुणे यांच्या कडूनही फगवा वसूल करण्यात येतो. आजबाजूच्या गावातही लोक फिरतात. बाजाराच्या दिवशी दुकानदारकडून फगवा घेतला जातो. पंचमीपर्यत सारा प्रदेश फगनाई गीतानी दणागून जातो. लहाना पासून मोठ्या पर्यत सारे यात मोठ्या आनंदाने सहभागी होतात. पंचमीच्या दिवशी गोळा झालेला फगवा आपापसात वाटून घेतात किंवा त्याचा सामूहिक भंडारा, नवस केला जातो. बोकडा कापला जाता. म्हणजेच होळीचा शेवट खाऊनपिऊन संपन्न होतो. खालील प्रकारची फगनाई गीते कोरकू लोकसंस्कृतीत आहेत, त्यात विविधिता आहे. अनेक पारंपारिक गुणवैशिष्टे आहेत.

रावणा पोवणा को राजा रे रावणा रे
रावणा पोवणा को राजा रे रावणा रे
टोनी मा देवता येली जोय केली जोय राजा रे रावणा रे
टोनी मा देवता येली जोय केली जोय राजा रे रावणा रे
किलजा मुठवा येली जोय केली जोय राजा रे रावणा रे
रावणा पोवणा को राजा रे रावणा रे
टोनी मा देवता येली जोय केली जोय राजा रे रावणा रे
चांदमा सूरजो येली जोय केली जोय राजा रे रावणा रे

**स्रोत**: मुच्छा बाटू ढिकार , ग्राम चौराकुंड, ता. धारणी, जिः अमरावती.

**शब्दार्थ**:-टोनी कोणत्या, येली जोय-इकडे येणे चांदमा-चंद्र, सुरजो-सूर्य

**भावार्थ**:- कोरकू लोकसंस्कृती सर्वाथाने निराळी आहे. रामलक्ष्मण जसे त्याचे दैवत आहे, तसेच ते रावणाला सुद्धा पुजनीय मानतात. रावणाच्या बाबतीत त्यांच्या मनात आदर आहे. त्याविषयीचे उल्लेख अनेक लोकगीतातून व्यक्त होतात. प्रस्तुत लोकगीतात होळीच्या सणात सहभागी होण्यासाठी राजा रावणाला आवाहन केले आहे. होळीत सहभागी होण्यासाठी हे रावणा तू ये. सोबतच चंद्र, सूर्य, खेडा, मुठवा देवता या सर्वांना सुध्दा आवाहन केल जात. सर्व देवदेवतांची कृपादृष्टी होऊन सुख समृद्दी नांदावी ही त्या मागील भावना असते.

हम खेले खेले होली डो किनीडा
किनीडा बाबा के बकरा माने डो
हम खेले खेले होली डो किनीडा
किनीडा बाबा के खारीका माने डो

**स्रोत**:-रामकू भैयालाल तांडीलकर, प्यारी कास्देकर, रामकई ताडीलकर, ग्राम केसरपुर, पो. चिखली ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ**:-किनीडा- देवाचे नाव, मानेडो-बळी देणे, खारीका-खारोक

**भावार्थ**:-होळीच्या दिवशी स्त्रिया किनीडा बाबाला होळी खेळण्यासाठी आवाहन करतात. त्याला

बकऱ्याचा, खारीकेचा नैवध चढवू या, अशा म्हणतात, असे वर्णन या गीताता आले आहे.

चाराटो गाढी डो चाराट जेडो
नाली गांठी डो बेंगोठ जे
डो पैसे डैगा पोरी नाळी तोडने दे
चाराटो गाठी डो चाराट जेडो
नाली गांठी डो बंगोठ जे
डो पैसे डैगा पोरी नाळी तोडने दे

**स्त्रोत** : मुच्छा बाटू ढिकार, ग्राम चौराकुड, ता. धारणी, जि. अमरावती

**शब्दार्थः**-नाली -दोरा, गाढी-गाढ.

**भावार्थः**- होळी सणात अनेक विधी कोरकू करतात. अशा एका विधीचे वर्णन या गीतात आले आहे. होलीच्या वेळेस पाटलाच्या अंगणात एक लोटा ठेवलेला असतो. त्याला दोरी बांधलेली असते. तेथे गावातील मुली येतात. तेव्हा गावातील पाटील त्या पोरींना दोन पैसे देऊन तो दोरा तोडून धेतो. तो दोरा तोडाण्याचा प्रसंग या गीतातून व्यक्त झाला आहे.

सजन रे सजन रे, सजन पुकारे सजना रह गये पाहाड
होरे होरे सजन, रह गये पाहाड
सजन रे सजन रे, सजन पुकारे सजना रह गये पाहाड

होरे होरे सजन, रह गये पाहाड
पाहाडो से उतरो विदेश, बिरज गये रे सजना
सजन रे सजन रे, सजन पुकारे सजना रह गये पाहाड
होरे होरे सजन, रह गये पाहाड
मायो बापो जलम दियोरे तो रह गयो एकली परान
होरे रे रे रह गेयो एकली परान
पाहाडो से उतरो विदेश, बिरज गये रे सजना
रामरे लछमन जलम दियो रे तो सितामाई रे जलमा
होरे रे रे सीतादेही जलमा रे
पाहाडो से उतरो विदेश, बिरज गये रे सजना

**स्त्रोत**:- बाबूलाल ढोल्या कासदेकर, ग्राम -सलोना, ता. चिखलदरा, जि. अमरावती

**शब्दार्थ**:- पाहाडो-पहाड, सजन -प्रियकर, विदेश-दुरचा देश, परान- राहणे.

**भावार्थ**:- होळीचा सण आहे. सर्वत्र आनंदी आनंद आहे. अशा स्थितीत या एका स्त्रीचा पती दूरदेशात गेला आहे. तो अजूनही परतलेला नाही. त्याच्या आठवणीने ती स्त्री व्याकुळ झाली आहे. त्याच्या भेटीची तिला आस लागलेली आहे. अशा स्त्रीच्या मनातील भावना या गीतातून व्यक्त झालेल्या आहेत. या गीतामध्ये ती स्त्री आपल्या पतीला आवाज देत आहे. तिचा पती डोगराच्या पलीकडे असणाऱ्या देशात गेला आहे. त्यामुळे

इकडे ती एकटीच जीवन व्यतीत करीत आहे. माय बाप व देवांनी जन्म दिला आहे पण पती शिवाय हे जीवन सूने झाले आहे असे तिला वाटते.

डोय आंबो बगिच्या ओये ढोल मांगो रे बगीच्या
आरे आंबो बगिच्या ओरे ढोळकी माळाये
आरे आंबो बगिच्या ओरे ढोळकी माळाये
आरे ये ढोलकी खेरमा झोला वा रे ढोल मांगो रे आंबो बगीच्या
आरे ये ढोलकी खेरमा झोला वा रे ढोल मांगो रे आंबो बगीच्या
डोय आंबो बगीच्या ओये ढोल मांगो रे बगीच्या
आरे आंबो बगीच्या ओरे ढोळकी माळाये
आरे आंबो बगिच्या ओरे ढोळकी माळाये
आरे ये टिमकी खेरमा झोला वा रे ढोल मांगो रे आंबो बगिच्या
आरे ये टिमकी खेरमा झोला वा रे ढोल मांगो रे आंबो बगिच्या

**स्रोत**:- बाबूलाल म्हातू जांबेकर, ग्राम. आमझरी ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ**:- आंबो बगीच्या -आंबेराई, मालाये - ओवणे.

**भावार्थ**:- कोरकूंचा परिसर निसर्ग सौंदर्याने नटलेला आहे. डोंगर दऱ्या, नद्या अशा रमणीय परिसरात त्यांचे वास्तव्य आहे. या परिसरातील अनेक वृक्षांना कोरकू पवित्र मानतात. या गीतामध्ये आंब्याच्या

झाडाच्या अनुषंगाने पुढील वर्णन आलेले आहे. आमराईत ढोल वाजत आहे. टिमकी बाजत आहे. त्याला दोरीने माळल्या जात आहे. एकूणच उत्साह व आनंदाचे वातावरण आहे, याचा आनंद सर्वानी ध्यावा असा संदेश हे गीत देते.

**होरयार गीते** :

कोरकूंच्या जीवनात होळी सणाला सर्वाधिक महत्त्व आहे. होळी सणामध्ये अनेक प्रकारच्या प्रथा, परंपरा, रूढी यांचे दर्शन घडते. कोरकूंची होळी गावाबाहेर पेटाविली जाते. पाटील तिला पेटवायला जातो. तेव्हा त्याच्या धरापासून तर मुठवा देवापर्यत व पूढे होळी पर्यत जाताना होरयात गीते गायिल्या जातात. ही गीते पुरुष प्रधान असून ती गाताना ढोल, टिमकी, झांजा, पावी ही वाद्ये वाजविलया जातात. पाटील जेव्हा होळी पेटवायला निघतो तेव्हा तो अग्रभागी असतो. त्याच्या मागे दोन पुरुषच्या रांगा होरयार नृत्य करतात. हे नृत्य करताना जे गीते गायिले जातात. त्यांना होरयार गीते म्हगतात. या गीतामध्ये देवांची आराधना करणारी गीते असतात. या शिवाय सामाजिक, सांस्कृतिक, मनोरंजनपर गीते असतात. ही गीते गीताना पुरुष उत्साह व आनंदात अनेक आरोळया ठोकतात. एकमेकांचे मनोरंजन करतात.

जो बजरंग हनुमाना टो गुरु माजोय
जो बजरंग हनुमाना टो गुरुमारे
जो अगासो धरती केजा मा टोले माजोय

जो बजरंग हनुमाना टो गुरुमारे
जो खेडा मुठवा केजा मा टोले माजोय
बजरंग हनुमान टो गुरुमारे
जो रावणा पोवाणा टोले माजोय
जो बजरंग हनुमान टो गुरुमारे

**स्त्रोतः**-शामलाल भाऊ कासदेकर, ग्राम. तारूबादा, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थः**- टोलेमा जा-बांधारे, केजा-त्याना, मारे-मानने.

**भावार्थः**- कोरकू हनुमानची पूजा करतात. त्यांच्या गावात हनुमानची स्थापना केलेली असते. विविध सण, उत्सव, लग्न प्रसंगी ते हनुमानाची पूजा करतात. त्याला शाकाहारी नैवेध चढवितात. त्या हनुमानाला सर्वानी गुरू मानावे असे आवाहन या गीतात केले आहे. कारण, हनुमान म्हणजेच बजरंगबली, आकाश-धरती, खेडा-मुठवा, शिवार-भैरव, रावणा-पोवणा ह्या सर्वांना एकत्रित बांघण्याचे काम करतो, असा विश्वास या गीतातून व्यक्त होतो.

माहादेवा डाडा तो फगना खेलीयो परबेती बाई तो दिवा बरूरी
ये लंका जा रावणा के न्यौता बुलाये परबेती बाई तो दिवा बरूरी
माहादेवा डाडा तो फगना खेलीयो परबेती बाई तो दिवा बरूरी
ये लंका जा रावणा के न्यौता बुलाये परबेती बाई तो दिवा बरूरी

**स्त्रोत** : निंबा बाबूलाल दारशिंबे, ग्राम आमझरी, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : फगना-होळी, खेलीयो-खेळत आहे, न्यौता- निमंत्रण, बरूरी-लावणे.

**भावार्थ** : महादेव दादा होळी खेळत आहे. तर पार्वती बाई दिवा लावत आहे. दिव्यात ते तेल टाकत आहे. अशा वेळी लंकापती रावणाला होळी खेळण्यासाठी निमंत्रण दिले जाते, असे वर्णन या गीतातून व्यक्त होते.

गुंगामाळा घाटोला जो पेळेजे डो
गुंगामाळन घाटाडो पेळेच
आमामुडी खांबाला मालान झोरा टालाना डोकीडो
गुगामाळान घाटोडो पेळेच
घाटो पेळेजे चोज माडी माडी डोने सेनेबा डो
गुगामाळान घाटोडो पेळेच
घाटो पेळेज लाडा माडी माडी जेने सेनेबटो
गुणामाळान घाटोडो पेळे
डो टरबटजा पचळा माडी माडी जेने सेनेबटो
गुगामाळान घाटोडो पेळेच

**स्त्रोत** : मुच्छा बाटू ढिकार, ग्राम चौरांकुड, ता. धारणी, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : गुगामाळा - बोलणारी स्त्री, घाटोला- घाटाचा चढ, पेळेजो डो- चढणे, आमामुडो-बोटातील अंगठी, खांबाला-वजन, झोरा-पिशवी, टालान- आत, डाकोडो- ठेवणे, चोड माडी- मनातल्या गोष्टी, डोने-दोधे, सेनेबा-सोबत, लाडामाडी-हसत बोलणे, टरबटजा-उपरोधिक, वात्रट, गोष्टी.

**भावार्थ** : घाट चढत असताना कमी बोलणाऱ्या आपल्या प्रेयसीला उददेशून हे गीत गायिल्या गेले आहे. डोंगर चढत असताना नायक तिला म्हणतो की, ‘तुझ्या बोटातील अंगठीचे ओझे झाले असेल, तर ती थैलीत टाक. तुझ्या मनातील सर्व गोष्टी तू बोल. आपण बोलत बोलत हा घाट चढू. तुझ्या मनातील गोष्टी तू बोल. आपण बोलत बोलत घाट चढू या.’

जो मामा गावी गेले मामा सगळा मा जा
मामा गावी गेले मामा सगळा मारे
टोने मा जावाजी रोगो जा मोरे रोगोयेच केन, मामा
मामा गावी गेले मामा सगळा मारे
टोने मा रोकोजा मोरो रोगो येच केन, मामा
मामा गावी गेले मामा सगळा मारे
रावणापोवणा मोरोय रोगो हेच केन मामा
मामा गावी गेले मामा सगळा मारे
चादमां सुरजो मोरोय रोगो हेच केन मामा

मामा गावी गेले मामा सगळा मारे

**स्रोत** : शामलाल भाऊ कासदेकर, ग्राम. तारुबांदा, ता. चिखलदरा, जि. अमरावती

**शब्दार्थ** : सगळा माजा- सर्वजण, टोने- कोणत्या, रोगो- बिमारी, येच केण- येणे, मोरोय- घरले.

**भावार्थ** : हे एक मनोरंजक गीत आहे. मामाचे घर हे प्रत्येकाच्या आवडीचे ठिकाण असते. या गीतामध्ये असाच एक प्रसंग वर्णन केला आहे. सगळे जन मामाच्या गावी गेले, पोहचले. तेथे मामा ऐन तारुण्यात आजारी पडला आहे. त्याला रावणा-पोवणा, चंद्र, सूर्य या देवांनी तर धरले नाही ना ? असा प्रश्न या गीतातून उपस्थित केला आहे. मामा विषयीची थट्टा या गीतातून व्यक्त होते.

**झामटा गीते :**

होळी हा कोरकूंचा सर्वात मोठा सण आहे. यामध्ये पारंपरिक रीतिरिवाजानुसार अनेक विधी केल्या जातात. झामटा गीते हा त्यातीलत एक प्रकार आहे. होळीच्या दुसऱ्या दिवसापासून पंचमीपर्यत कोरकू झामटा गीते गातात. झामटा गीते गात गात फगवा मागण्यात येतो. गावातील पाटलाच्या घरापासून फगवा मागायला सुरुवात होते. आजूबाजूच्या गावातही फगवा मागितला जातो. ही गीते पुरुष व स्त्रीप्रधान असून माणसांच्या टोळयाच्या टोळया सामूहिक स्वरूपात ही गीते गातात. गावागावात, गल्लीत, ओटयावर बसून तर कधी सूसूनगादूली नृत्य करून ही गीते गायिले जातात. ही गीते गाताना ढोल, टिमकी, पावी या वाद्यांचा वापर केला जातो. स्त्रिया मात्र झामटा गीते गाताना कोणतेच वाद्य वापरत नाहीत. स्त्रियांचे सामूहिक स्वर

व लय या गीतात गोडवा भरतात. मानवी जीवनातील विविध भावतरंग, जीवनानुभव या बरोबरच कोरकूंच्या सांस्कृतिक जीवनाची झलक या गीतांमध्ये पहायला मिळते.

झामटा खेलन आयो, जा डाई पटेला झामटा खेलना आयो
झामटा खेलन आयो, जा डाई पटेला झामटा खेलना आयो
लोटीभरी पाणी ना निकलोजा जा डाई पटेला झामटा खेलना आयो
लोटीभरी पाणी ना निकलोजा जा डाई पटेला झामटा खेलना आयो
पान ना सुपारी ना खिलायजा जा डाई पटेला झामटा खेलना आयो
पान ना सुपारी ना खिलायजा डाई पटेला झामटा खेलना आयो

**स्रोत** : मालूबाई साकोम, जानकीबाई मावस्कर, कमलाबाई भिलावेकर, ग्राम. सुसर्दा, ता. धारणी,

**शब्दार्थ** : डाई - भाऊ, पटेला- पाटील, झामटा-होळीतील खेळाचा एक प्रकार, निकलजा-काढणे, खिजायजा-खाऊ घालणे ।

**भावार्थ** : या गीतामध्ये पाटलाला झामटा खेळण्यासाठी निमंत्रण दिले आहे. होळी झाल्यावर कोरकू लोक टोळयाच्या टोळया करून फगवा मागण्यासाठी घरोघर फिरतात. होळीच्या दिवशी अशीच एक टोळी त्या गावातील पाटलाला निमंत्रण देत आहे. ते लोक पाटलाला म्हणतात, 'हे पाटील तू झामटा खेळण्यासाठी बाहेर ये. आम्हाला तुझ्या धरचे पाणी पाज. पानसुपारी खाऊ घाल.' पाटलाला मोठेपणा देऊन त्याचा मानसन्मान या गीताद्वारे केला जातो.

जो कामला बेबी खाट जेनडाई, कामलाबेबी का माजोय
कामला बेबी सो डाटे राजा नीही रे, कामला बेबी खाट जडाये
जो डो कामला बेबी खाटन जेनडाई, कामला बेबी का माजोय
कामला बेबी सो डाटे राणी नीही रे, जो कामला बेबी खाट जडाये
जो डो मेसक्या मोंगलो जा जडाई, मेसक्या मोंगलो चोज राजा नही

**स्रोत** : शामलाल कासदेकर, शालीग्राम सावलकर, ग्राम तारूबांदा, ता. चिखलदरा, जि. अमरावती

**शब्दार्थ** : खाट जनडाई-मोठी झाली, कामा जोज- कामाला लागली, सो डाटे- पाणी भरणे,

**भावार्थ** : या गीतात गावातील एका कुटुंबाचे वर्णन आलेले आहे. 'गावात कमला बाई आहे. तिला एक मुलगी आहे. ती मुलगी मोठी झालेली आहे. ती काम करू लागली आहे. विहिरीवर पाणी भरू लागली आहे.'

झामटा मारे सोना मनयो डो बैरणी झामटा मारे सोना मनायो रे
गावा गेल्ली झामटा को हागूरू केडो बैरणी साडी दारोम मेरे सोना मनायो रे
झामटा मारे सोना मनयो डो बैरणी झामटा मारे सोना मनायो रे
गावा गेल्ली झामटा को हागूरू केडो बैरणी साजी दारोम मेरे सोना मनायो रे
सिटी रेगो जयमो बिसयो जो बैरम झामटा मारो सोना मनायो रे
गळूगळू नुक पिलपोज बैरणी झामटा मारो सोना मनायो रे

सिटी रेगो जयमोबिसयो जो बैरम झामटा मारो सोना मनायो रे
गळूगळू नुक पिलपोज बैरणी झामटा मारो सोना मनायो रे
झामटा मारे सोना मनयो डो बैरणी झामटा मारे सोना मनायो रे
लोटाभर पाणी पिलमो डो बैरणी झामटा मारे सोना मनायो रे,

**स्त्रोत** : मुच्छा बाटू ठिकार, ग्राम चौरांकुड, ता. धारणी, जि. अमरावती

**शब्दार्थ** : बैरणी- मुलगी, हागरू- उतरणे, येणे, केंडो- उतरले, साडी- घराच्या मागची बाजू, मनाये रे- साजरा करणे, गोळो-गुंड, गल ली- गल्ली, दारोम- दरवाजा.

**भावार्थ** : या गीतामध्ये होळीच्या दिवसातील आनंद, उत्साहाचे वर्णन आले आहे. गावात सर्वत्र रंगपंचमीसाजरी होत आहे. एक मुलगी आपल्या घरामागील दारात रंगपंचमी खेळत आहे. गावात, गल्ली गल्लीत झामटा गीते गायिल्या जात आहेत. एकमेकांच्या अंगावर गुंडाने पाणी टाकल्या जात आहे. झामटा खेळल्याने दमून गेलेला व्यक्ती लोटाभर पाणी पीत आहे, असे वर्णन या गीतात आले आहे.

पुरनीबिका निजा का डो, बाकामाजा पुरनीबिका निजा का डो, बाकमारे
पुरनीबिका निजा का डो, बाकामाजा पुरनीबिका निजा का डो, बाकमारे
भागीने मुसरोय काजा डो, येलीमिजा
ये, उनरीने उसरी बिजा का डो सुबन केजा भाग्या मुसरोय का डो यिलीमारे
ये, उनरीने उसरी बिजा का डो सुबन केजा भाग्या मुसरोय का डो यिलीमारे

**स्रोत** : बाबूलाल ढोल्या कासदेकर, ग्राम-सलोना, ता. चिखलदरा, जि. अमरावती.

**शब्दार्थ** : उनरीन-घराच्या आतील भाग, उसरी- बाहेरील (घराचा) भाग, सुबन-बसणे, सुबनकेजा-बसलेला, बाग्या-काम करणारा गडी, मुसो- काम करण्याचा मोबदला, यिलीमारे- दया देणे, भागीनी- काम करणाऱ्या गड्याची बायको, बाका माजा- कठीण आहे, -निभावणे.

**भावार्थ** : शेतावर काम करणारा गडी त्याच्या बायको सोबत मालकाच्या दारात बसला आहे. तो मालकाला सांगतो की, 'इतक्या पैशात वर्षभर काम निभावणे कठीण आहे. तेव्हा वर्षभराचा मोबदला द्या. धान्य द्या.' पैसे द्या. असे या गीतात वर्णन येते. झामटा गीतामधून असे हे विविधरंगी विषय रेखाटल्या जातात.

**निमाडी लोकभजने** :

निमाडी लोकभजने कोरकू लोकगीतांचा अभिन्न अंग बनली आहेत. कोरकूंचा हा प्रदेश निमाडला लागून असल्याने तेथील जनजीवनाचा कोरकूंच्या जीवनावर मोठा प्रभाव असल्याचे दिसते. निमाडी लोकजीवनात संतांचे फार मोठे योगदान आहे. सोळाव्या शतकातील संत ब्रम्हगीर, संत मनरंगीर, संत सिगाजी, भक्त खेमदास, दलूदास, रंकदास अथा संतांची परंपरा या प्रदेशाला लाभलेली आहे. या संतांनी अनेक भजने लिहिली असून ती निमाडी लोकभजने या नावाने प्रसिद्ध आहेत. ही भजने मृदंग, हार्मोनियम, लहान मंजिरा या वाद्यांसोबत गायिल्या जातात. कोरकूंच्या अनेक गावात समूहचे समूह ही गीते गातात. ही गीते गातांना

एखाद्या खुल्या जागेत किंवा धरात लोकांची मैफिल बसते. उपस्थितांपैकी एक व्यक्ती गीताला सुरुवात करतो, इतर व्यक्ती त्याला साथ देतात. गीताचा प्रारंभ हळूहळू लय पकडून केला जातो. वाद्याच्या साथीने गीत रंगात आले की, वाद्य व गीताचे बोल एक होऊन जातात. निमाडी लोकभजनांच्या रचना हिंदी व निमाडी भाषेत असून कोरकू ते अस्सखलितपणे गातात. अनेक गीताना कोरकूंनी आपल्या भाषेनुरुप बनवून टाकले आहे. संत सिंगा, राम, कृष्ण, हनुमान, अनेक गुरूंच्या स्मरणांची पदे या गीतामंध्ये आढळून येतात. या गीतांना स्वतंत्र चाली असून त्यां हिंदी लोकभजनाशी जुळत्या मिळत्या असल्याचे दिसते. या गीतांचे स्वरुप गेय असून बरेचदा त्यात एखादी कथाही गुंफलेली असते. या गीतांमध्ये सर्वात जास्त भजने संत सिंगाजीची आहेत. गावा गावात ही भजने लोकांच्या मुखोदगत आहेत.

नगर खजुरी मा जन्म धरी गवळेय धरी अवतार
माता गवरको पायर पिया ना हर भूमी को भार हारे राम
सिंगा जनम धरायो नगर खजुरी मा जनम धरी
तो रवी उदयी दरम्यान मा, सिंगा जनम धरायो रवी उदय की दरम्यान मा
सिंगा जनम धरायो माता जिनको गौराबाई तिथ भिमाजी खावायो नगर खजुरी मा जनम धरी
तो भाई रे जिनका लिंबाजी, भैयना कृष्णाबाई, भाईरे जिनको लिंबाजी
सिंगा जनम धरायो नगर खजुरी मा जनम धरी

सिंगाजी थारे खजुरी मे झुलना झुले रे सिंगाजी
झुलैरे माता गौराबाई सिंगाजी थारा खजुरी झुलना झुलैरे
सिंगाजी थारो कायना का झुलना, बंधाईले कायन दोरी लगई रे
सिंगाजी थारो मोतीयान वो मा लगईरे
लगईरे सखीया मंगल गावे सिंगाजी थारे खजुरी मे झुलना झुलैरे

**स्रोत** : सुबेनलाल रामलाल उइके, ग्राम. सावली खेडा, ता. धारणी, जि. अमरावती

**भावार्थ** : या गीतामध्ये प्रख्यात संत सिंगाजी यांचा महिमा वर्णन केलेला आहे. सिंगाजीचा जन्म गवळयाच्या धरी सूर्योदय होतांना खजुरी नगरीत झाला. त्यांच्या आईचे नाव गौराबाई व वडिलांचे नाव भिमाजी होते. त्यांना लिंबाजी नावाचा भाऊ व कृष्णाबाई नावाची बहिण होती. सिंगाजीची आई गौराबाई झोके देते होती त्या पाळण्याला मोती लागलेले होते. त्या पाळण्याला स्त्रिया मंगल गीते गाऊन झोके देत होत्या. असे वर्णन या गीतामध्ये केले आहे.

माहे गुरू चरण मे गंगा, भैय्या रे नई ले लई अपंगा
माहे गुरू चरण मे गंगा, भैय्या रे नई ले लई अपंगा
जोगी कहो येना जटक, उठावे, अरे भाई बना बम फिरे मै नंगा
माहे गुरु चरण मे गंगा, अरे भाई बना बन फिरे मै नंगा
माल खजाना डोया फुलावा अरे भाई बनी रे लाल सुरंगा

माहे गुरु चरण में गंगा, अरे भाई बना बन फिरे मैं नंगा
इत सैन्यासी उठ भाई रंगी, अरे भाई तिरीया करी रई दंगा
माहे गुरुचरण मे  गंगा भाई तिरीया करी रई दंगा मारे गुरु चरण मे गंगा
कहे जन सिंगा सुने भई साधु, अरे फिरी रायो रे अपंगा
मा फिरी रायो रे अपंगा, मारे गुरुचरण मे गंगा.

**स्रोत** : रामलाल जामूनकर, शालीकराम गोपी सावलकर, ग्राम. तारुबांदा, ता. चिखलदरा जि. अमरावती

**शब्दार्थ** : माहे- माझ्या, चरण- पायापाशी, फिरे-फिरेण, माल खजाना-संपत्ती.

**भावार्थ** : या गीतामध्ये गुरूचा महिमा वर्णन केलेला आहे. गुरुच्या चरणातच सारे तीर्थ आहेत. आपल्याला कुळेही गंगेवर तीर्थासाठी जाण्याची गरज नाही. जीवनाचा सन्मार्ग आपणास गुरुच दाखविणार आहे. गुरूशिवाय आपण लंगडे आहोत, त्याच्या शिवाय आपला उद्धार नाही. पैसा, संपत्तीसर्व व्यर्थ असून जीवन मुकित साठी आपल्याला गुरूशिवाय पर्याय नाही, असे वर्णन या गीतात आले आहे.

महारा गुरू चरणमे गंगा ना लूला ना अपंगा
जोगी हूईन जाता भडवा या भनभन फिरा रे नंगा
महाला खायी नाडे फूलवा बामी राही लाल सूरगा
ईथे संन्याशी उठा बहिरंगी तिरता पार करे रही दंगा

काहे जना सिंगा सोमोबाई साधू यहा फिरा रे लूला
अपंगा महारा गुरू चरणमे गंगा

**स्रोत** : मनोहर लखू धांडे, ग्राम. चौराकुंड, ता. धारणी. जि. अमरावती

**शब्दार्थ** : चरण- पाय, जोगी-साधू, भनभन-इकडे तिकडे, महारा-राजवाडा ।

**भावार्थ** : संसाराच्या मुक्तीसाठी कुठेही फिरण्याची गरज नाही. आपला गुरूच उद्धारकर्ता असून त्या शिवाय आपल्याला पर्याय नाही. संन्यासी बनून फिरण्यापेक्षा गुरुच्या चरणात लीन व्हा, असा संदेश संत सिंगाजी या गीतातून देत आहेत.

सदा मम आनंदा बाजले हरी ऐसो जन्मा आओ रे फिरी
चारा खाना चौरशी बरसो जप नारा दे दारे
जा देरे दूशमन कर ले सोयी बात आए खरी
सदामन आनंदा बाजले हरी ऐसो जन्मा आओ रे फिरी
वादी नाके सहबू लगाईयो उडमूख जोले
तहा तहा कारागत बिमा
दास उंगले मुखभारी सदा मम आनंदा बाजले हरी
गारवासे बाहर आया पै आनंद घडी जो मांगा सो
दिया गुरुने ताबी मानसा भरी

कारसे तू तो धंदा करले  पागासे पन्याकारी
रसना नाम सूमारले बांध ले फिर आपेगी रे तरी
घडी सदामन आनंद बाजले हरी
जगता सोबता उठता भेटता राम मुसे आरहा
घडी घडी कायजन सिंगा सोतबाय साधू ऐसा
बिदा जायेंगा तेरी सदा मन आनंद बाजले हरी

**स्रोत** : मनोहर लखू धांडे, ग्राम. चौराकुंड, ता. धारणी. जि. अमरावती.

**शब्दार्थ** : सदा-नेहमी, बाजले- घेणे, फिरी-पुन्हा, बरसो-वर्ष, जपनं- भजन, कारागत-काम, गारवासे-गर्व, रसना-जीभ, आरहा-गाणे.

**भावार्थ** : नेहमी आपण परमेश्वराचे नाम घेतले पाहिजे. माणसाचा जन्म हा चौऱ्यांशी फेऱ्या नंतर प्राप्त झाला आहे. आपले कार्य करत असताना आपल्या मुखातून हरिनाम घेतला गेल पाहिजे, कुठेही गर्व येऊ नये म्हणून गुरूने हा मंत्र दिला आहे. आपल्या जीभेवर आपण उठता-बसता रामनाम घेतले पाहिजे. त्यातच मानवाची मुक्ती आहे, हा संदेश या गीतातून संत सिंगाजींनी दिला आहे.

मथूरा ना लेना अवतार लालना नंदा यशोदा घर झूला पालना
मथूरा मा लेना अवतार लालना नंदा यशोदा घर झूला पालना
काये का झुलना वो काहे का पालना काये का झुलना वो काहे का पालना

काहे ना लगे लंबे दोर लालना नंदा यशोदरा घर झूला पालना
लाकडा चंदना का वो झूला रे पालना लाकडा चंदना का वो झूलना रे पालना
रेसोमा मा लागे लंबो दोर लालना रेसोमा मा लागे संबो दोर लालना
नंदा यशोदा घर झूला पालना मथूरा मा लेना अवतार लालना

**स्त्रोत** : रामसिंग जांबेकर, हिरालाल गौतम, ग्राम, बिरोटी, ता. खकणार, जि. बऱ्हाणपूर

**शब्दार्थ** : झूला- पाळणा, रेसोमा-रेशमी.

**भावार्थ** : कोरकू गणेशोत्सवा दरम्यान खम्मचे आयोजन करतात. त्यावेळी विविध देवदेवतांची सोंगे घेऊन भजने म्हटली जातात. प्रस्तुत गीत असेच एक निमाडी खम्म भजन असून ज्यावेळेस खम्म कार्यक्रमात श्रीकुष्णाये सोंग घेतल्या जाते तेण्हा हे गीत गाइले जाते.

**कथाएँ** :

कोरकूंच्या जीवनात लोककथांना महत्त्वाचे स्थान आहे. कोरकू बोलीत कथेला 'आयना' (आना), असे म्हणतात. हजारो वर्षापासून कोरकू जमातीमध्ये लोककथांचे प्रचलन असल्याचे दिसते. कोरकूंच्या लोककथेचे अनेक प्रयोजने सांगता येतात. अनेक कोरकू परिसरात पूर्वी पासूनच फार कमी प्रमाणात मनोरंजनाची साधने उपलब्ध असल्याचे दिसते. त्यामुळे कोरकू जमातीत मानवी मनाला आनंद देणे, त्याचे निखळ मनोरंजन करणे, त्यातून जीवनातील सन्मार्ग दाखविणे, हे कथा सांगण्याचे मुख्य प्रयोजन असल्याचे दिसते. त्यामुळे कथा

वाङमयालाच या जमातीत विपुल लोकपियता लाभलेली आहे. कथा या कोरकूंच्या लोकरंजनाचे मोठे माध्यम असल्याचे दिसते. रात्री गावातील पारावर, धरासमोर, ओटयावर काही व्यक्ती एकत्र आल्या की, एखादा कथाकार कथेला सुरुवात करतो. आजूबाजूचे लोक त्याला प्रतिसाद देतात. त्यामुळे कथेतील रंजकता वाढत जाते. एकदा सुरु झालेली कथा कधी संपते, याचा पत्ताही लागत नाही. कोरकूंच्या अनेक स्त्रीपुरुषांजवळ लोककथांचे खजिने असल्याचे दिसते. पूर्वी कोरकू जंगलात शिकारीसाठी जात. बरेचदा तेथे त्यांचा मुक्काम असे, अशा वेळी अनेक कहाण्या जंगलातच रंगत. अनेक कष्टाची कामे करता करता, श्रम हलके वाटावेत म्हणून कहाण्या सांगितल्या जात. शेतावरची जागल, लग्नप्रसंग, मृत्यूचा शोक यावेळी कथेतूनच रंजन होत असे. लग्नप्रसंगी अनेक मनोरंजक कथा, किस्से लग्नाच्या मांडवात सांगितल्या जात. एखाद्या घरी मरण झाल्यास दहा दिवसा पर्यक शोक केल्या जायचा अशावेळी म्हातारी माणसे अनेक कथा सांगून दु:ख हलके करण्याचा प्रयत्न करीत. अनेकदा देवकुदाना, नवस, जत्रा-यात्रा, सण, उत्सवाप्रसंगी कथा सांगितल्या जात. आता मात्र मनोरंजनाची अनेक साधने उपलब्ध झाल्याने लोककथा पडद्याआड होत आहेत. तरीही कोरकू लोकजीवनातील लोककथेचे स्थान अबाधित आहे.

**१. हुशार मुलगा वाघाची फजिती** :

एक म्हातारा आणि म्हातारी होती. म्हातारा दररोज इंधन आणण्यासाठी जंगलात जात असे. एका दिवशी लाकूड तोडत असताना तो पादला. म्हणून म्हाताऱ्याने आपल्याच ढुंगणाला म्हटले 'ढुंगणा तुला वाघाने

खाऊन टाकावे'. त्याच वेळी तेथे वाघ आला आणि वाघाने म्हाताऱ्याला म्हटले, 'तुझे ढुंगण मला खायला दे.' ही गोष्ट ऐकून म्हातारा घाबरला. म्हातारा वाघाला म्हणाला, 'त्या खळयात धान्य पडलेले आहे. त्याची पूजा झाली की तू माझे ढुंगण घे'. एवढे बोलून म्हातारी धरी आला. म्हाताऱ्याने म्हातारीला ही गोष्ट सांगितली. तेव्हा म्हातारी म्हणाली, 'बस एवठीच गोष्ट. तुम्ही जा. खुशाल पूजा करा.' म्हातारा म्हातारीच्या सांगण्यानुसार पूजा करायला गेला. थोडया वेळाने वाघ आला. म्हाताऱ्याला म्हणाला, 'दे आता तुझं ढुंगण.' म्हातारा घाबरला. त्याचवेळी म्हातारी दोन सुपाचे कान तयार करून, चुलीचे तोंड, हातात मुसळ आणि अंगावर घोंगडे घेऊन एखाद्या प्राण्याप्रमाणे चालत आली. ते पाहून म्हातारा वाघाला म्हणाला, 'तू काय माझे ढुंगण खातो, तुझे ढुंगण खाणारा येत आहे, बंध.' वाघ म्हातारीला पाहून घाबरला. म्हातारी खळयाकडे येत होती. त्यामुळे वाघ लपून बसला. म्हातारी खळयाजवळ आली आणि म्हाताऱ्याला विचारू लागली की, 'वाघ कुठे गेला, मी त्याचे ढुंगण खाणार आहे.' म्हातारीचे हे बोलणे ऐकून वाघ खूप घाबरला. वाघ तेथून पळायला लागला. त्याच्यामागे म्हातारी  पण पळत होती. वाघ धावतधावत गेला त्या ठिकाणी गुरे चारणारी मुले उभी होती. वाघ तेथे पोहचल्यावर त्या मुलांना म्हणाला, 'एक राक्षस माझ्या मागे लागला आहे. तुम्ही माझ्याविषयी सांगायचे नाही. नाहीतर मी तुम्हाला खाऊन टाकीन.' त्यानंतर वाघ एका घोंगडीत्या आत लपून बसला. थोडया वेळाने ती म्हातारी तेथे आली व त्या मुलांना विचारू लागली. 'काय रे मुलांनो, तुम्ही एका वाघाला जातांना पाहिले का ? तो वाघ तुमच्या आजोबाचे ढुंगण खायाला मागत होता. मी त्या वाघाचे ढुंगण खाल्याशिवाय राहणार नाही.' ही गोष्ट ऐकल्यानंकर वाघ घाबरला व त्याने धोंगडयात संडास केली.

थोडया वेळाने म्हातारी निधून गेली. नंतर वाघही जायला लागला. परंतु गुरे चारणारी मुले आपल्या संडासाबददल इतर लोकांना सांगणार तर नाहीत ! म्हणून वाघ विचार करू लागला. ही गोष्ट मुलांनी गावात सांगितली तर आपली बदनामी होईल. असे त्याला वाटले. त्यामुळे तो वाघ त्या मुलांच्या मागेमागे गावात आला. एका घराच्या मागे लपून, त्या मुलांच्या गोष्टी ऐकू लागला. त्या मुलांपैकी एक मुलगा हसत हसत वाघाची गोष्ट गावातल्या लोकांना सांगत होता. हा सगळा प्रकार पाहून वाघाला खूप राग आला. तो विचार करू लागला की मी आता या मुलाला सोडणार नाही. त्यामुळे तो वाघ त्या घराकडे पाहत, त्या मुलाकडे बघत राहिला. रात्र झाल्यानंतर तो मुलगा अंगणात एका खाटेवर झोपी गेला. वाघ रात्री तेथे आला आणि खाटीसह त्या मुलाला उचलून जंगलात घेऊन जाऊ लागला. यातच मुलाला जाग आली. तो इकडे तिकडे पाहू लागला. तर काय ? सगळीकडे त्याला जंगलच दिसले. त्या मुलाच्या लक्षात आले की आपल्याला वाघ घेऊन जात आहे. मग त्या मुलाने एक शक्कल लढविली. जाता जाता मुलगा एका झाडाच्या फांदीला लटकला. त्यामुळे वाघ रिकामी खाट घेऊन गेला. वाघ एका नदी काठी गेला. त्याने खाट खाली ठेवली व मुलाला खाण्याच्या निमित्ताने खाटीवर उडी मारली. परंतु खाटीवरची गोधळीच फक्त वाघाच्या तोंडात आली. त्यामुळे त्याला समजले की मुलगा पळून गेला आहे. म्हणून वाघ पुन्हा त्याच रस्त्याने मुलाचा वास घेत घेत त्या झाडाखाली आला. त्याला झाडावर चढलेला मुलगा त्याला दिसला. मग वाघ त्या झाडावर चढला. परंतु मुलगा त्या झाडाच्या पोकळीत लपून बसला. वाघ विचार करायला लागला की, या मुलाला बाहेर काढायचे कसे? बराच विचार केल्या नंतर वाघाने आपले शेपूट त्या पोकळीत टाकले. त्या मुलाने मग वाघाचे शेपूट पकडले.

शेपटीच्या साहाय्याने वाघ मुलाला बाहेर काढण्याचा प्रयत्न करू  लागला. परंतु झाले उलट. मुलाने वाघाचे शेपूट पकडले आणि तो आत ते शेपूट ओढू लागला. त्याला झटके देऊ लागला. त्यामुळे वाघाचे ढूंगण घासले जाऊ लागले. ते लाल भडक झाले. वाघाला काही सुचत नव्हते. कसा तरी वाघ मुलाच्या हातून आपले शेपूट सोडवून जंगलात पळून गेला. वाघ पळून जात असताना रस्त्यात त्याची भेट एका माकडाशी झाली. वाघ मग त्या माकडाला घेून त्या झाडाजवळ आला आणि पूर्वीसारखीच माकडाला पण आपली शेपटी त्या झाडाच्या पोकळीत टाकायला सांगितली. मुलगा वाघाच्या शेपटीसारखी ती माकडाची शेपटी सुदघा आत ओढू लागला. त्यामुळे माकडाचे ढुंगण लाल झाले व माकडाने कशीतरी आपली सुटका करून घेतली. या प्रकारामुळे मुलगा भितीने त्या पोकळीतच राहू लागला. परंतु त्याला पोकळीत खायला काही मिळत नव्हते. मुलगा उपाशी राहू लागला. एका दिवशी त्या झाडाखाली दैवी गायी चरायला आल्या. त्या गायीच्या अंगावर त्या मुलाचे अश्रू पडले. त्यामुळे दैवी गायी त्या मुलाला विचारू लागल्या, 'बाळ तू कशाला रडतोस.' त्यावर मुलगा सांगायला लागला की 'मी बरेच दिवसापासून उपाशी आहे. मला काही तरी खायला द्या.' त्यावर दैवी गायींनी त्या मुलाल एक जादुची बासरी दिली आणि सांगितले की, 'ज्या ज्या वेळी काही वस्तुची आवश्यकता वाटेल, त्यावेळी बासरी झाडावर आपटाची. बस मग तुला जे हवे ते मिळेल.' तेव्हापासून त्या मुलाला खायला मिळू लागले. एका दिवशी मुलगा आंगोळीसाठी नदीवर गेला. त्याने आपल्या डोक्यावरचे दोन तीन केस झाडाच्या पानाची पुडी करुन त्यात ठेवले आणि नदीत सोडले. त्याचवेळी नदीच्या खालत्या भागात एका राजाची मुलगी आंगोळ करत होती. तिला ती पुडी सापडली. त्यानंतर त्या राजकन्येने त्या पुडीतील केस पाहिले. आणि त्या

पुडीत ज्या मुलाचे केस आहेत त्या मुलासोबतच लग्न करायचे ठरविले. ती राजाच्या महालात आल्यानंतर त्या मुलाचाच विचार करु लागली. बरोबर खात पीत नव्हती. हा प्रकार पाहून राजा विचार करु लागला की, आपल्या मुलीला काय झाले ? याची माहिती जाणून घेण्यासाठी राजाने एका म्हातारीला विचारले, त्यावर म्हातारी म्हणाली की, 'राजा मला नवीन साडी आणून दे.' त्यानंतर नवीन साडी घालून ती म्हातारी त्या राजकन्येकडे गेली. त्या म्हातारीने राजकन्येजवळ आल्यावर लपून आपल्या साडीला आग लावली. साडी जळतांना पाहून राजकन्या म्हातारी जवळ आली आणि तिने आग विझविली. मग म्हातारीला विचारले की, 'तुझी नवीन साडी जळणार होती ना ?' त्यावर म्हातारी म्हणाली. 'तुला साडीची काळजी वाटते. आमची तर मोठी होणारी मुलगी आतल्या आत जळत आहे. तिचे कसे काय ?' ही गोष्ट ऐकून ती मुलगी समजून गेली. त्यामुळे त्या म्हातारीला त्या राजकन्येने घडलेली गोष्ट सांगितली. त्यावर म्हातारी म्हणाली, 'तू काई काळजी करु नको, त्या मुलासोबतच तुझे लग्न लावून देईन.' दुसऱ्या दिवशी म्हातारी रानगोवऱ्या जमा करण्यासाठी जंगलात गेली. जंगलात गेल्यानंतर बरोबर त्या झाडाखाली तिने आपली बैलगाडी सोडली. काही वेळा नंतर पुन्हा गाडी जुंपण्यासाठी म्हातारी आवाज देऊ लागली, 'मला कुणी तरी मदत करा.' आवाज ऐकल्यानंतर त्या मुलाने झाडाच्या पोकळीतून बाहेर येऊन डोकाऊन पाहिले. म्हातारीने मुलाला बोलाविले. मुलगा गाडी जुंपण्यासाठी आला. तेव्हा लगेच राजाच्या सैनिकांनी त्याला पकडले व नगरात घेऊन आले. तेथे राजाने राजकन्येशी त्याचे लग्न लावून दिले. ते सुखाने संसार करु लागले .

(स्त्रोत : शेखलाल मनाजी बेलसरे, ग्राम. अढाव, ता. चिखलदरा, जि. अमरावती.)

**२. चतुर कोल्हा :**

एक कोल्हा असतो. तो फार चतुर असतो. एक दिवस कोल्हयाला खूप तहान लागते. तो एका नदीवर पाणी प्यायला जातो. नदी काठावर बसून तो पाणी पीत असतो. त्यावेळी एक मगर येऊन कोल्हयाचा पाय पकडतो. कोल्हा ओळखतो की, आपला पाय मगराने पकडला आहे. मगर आता आपल्याला खाऊन टाकेल. तेव्हा त्यापासून आपला जीव कसा वाचवावा याचा विचार तो करु लागतो. थोडया वेळा नंतर कोल्हा आपला दुसरा पाय मगराला दाखवितो आणि सांगतो की, 'अरे तू कोवू (एक झाड) ची फांदी तोंडात घरलेली आहे.' तो दुसरा पाय मगराला दाखवितो व तो पुन्हा पुन्हा तोच पाय दाखवित राहतो. मगराला म्हणतो. 'तू धरली ती फांदी आहे.' असे म्हणून पाण्यात आपला दुसरा पाय आपटतो. त्यानंतर मगर खरच विचार करतो की, आपण जे पकडले ते फांदी तर नसेल. म्हणून तो मगर कोल्हाचा पाय सोडून दुसरा पाय धरण्याचा प्रयत्न करतो तेव्हा लगेच कोल्हा पळून जातो. काही अंतरावर गेल्यावर कोल्हा मगराला हसतो व म्हणतो, 'मगरा तू खरोखरच मूर्ख आहेस. तू माझा पाय घरला परंतु कोवूची फांदी समजून सोडून दिला.' एवढे बोलून कोल्हा तेथून निधून जातो. इकडे मगर मात्र खूप संतापतो. तो कोल्हयाला कशाही पदधतीने पकडून खाण्याचा विचार करतो. म्हणून तो कोल्हा कुठे जाते याकडे लक्ष देतो. कोल्हा दररोज अंजीर खायला एका झाडाखाली जात असतो. हे पाहून मगर त्या अंजीराच्या ढिगाऱ्यात लपतो. शोडया वेळानंतर त्या झाडाखाली कोल्हा येतो. परंतु अंजीराचा ढीग पाहून कोल्हा आश्चर्यचकित होतो. त्याच्या मनात शंका निर्माण होते. त्यामुळे तो सरळ अंझीराच्या झाडावर चढतो व म्हणतो, 'मला, आज ताजे अंजीर खायचे आहेत शिळे खाली पडलेले नको.'

तो झाडावरचे अंजीर खाऊन निधून जातो. मगर पुन्हा संतापतो. दुसऱ्या दिवशी मगर झाडावर जाऊन झोपतो खालते अंजीर लपून ठेवतो. लगेच कोल्हा झाडाखाली आल्यानंतर त्याला झाडाखाली एकही अंजीर दिसत नाही. त्याच्या मनात शंका निर्माण होते. काही तरी गडबड आहे, म्हणून कोल्हा म्हणतो, 'कालचे कच्चे अंजीर खाऊन माझे पोट खराब झाले आहे. त्यामुळे आज मी अंजीर खाणार नाही.' असे म्हणून कोल्हा तेथून निधून जातो. मगराला पुन्हा राग येतो. आता मगर कोल्हयाच्या धरी जाऊन लपतो. कोल्हा संध्याकाळी धरी येतो. तेव्हा धरातील अंधार पाहून पुन्हा त्याच्या मनात शंका निर्माण होते. त्यामुळे तो खाली रस्तावर पाहतो. त्याला मगराच्या पायाचे ठसे दिसतात. त्यामुळे कोल्हा लगेच काडी कचरा वगैरे गोळा करतो आणि धराच्या दारापाशी जमा करून ठेवतो. त्याला आग लावून पेटवितो. त्यामुळे मगर त्यात जळून मरुन जातो. नंतर कोल्हा मगराचे जळलेले प्रेत काढतो. त्यावर बसून त्या मगराचे भाजलेले मांस खातो. त्यात वेळी तेथे एक सिंह येतो आणि कोल्हयाला म्हणतो, 'आज मी तुला खातो.' त्यानंतर कोल्हा म्हणतो की, 'काय करु सिंह दादा. मी पण उपाशी असल्यामुळे मी स्वतःचे मांस ओढून खात आहे.' एका हाताने ढुंगणाच्या खालून मगराचे मांस काढतो. हे पाहून सिंह स्वतः चा पंजा पोटावर मारुन मांस खाणयाचा प्रयत्न करतो. त्यात सिंह मरण पावतो. अशा प्रकारे कोल्हा आपला जीव वाचवितो व त्याला खायला अन्नही मिळते.

(स्त्रोतः सुनील भिलावेकर ग्राम. सुसर्दा, ता. धारणी, जि. अमरावती.)

**३. मेहनत, कष्ट हीच खरी संपत्ती :**

एका गावात एक म्हातारा आणि एक म्हातारी राहत असतात. त्यांना चार मुले असतात. त्यातील मोठा मुलगा हा लुटारु असतो. इतर तीन मुले वेगवेगळया प्रकारची कामे करीत असत. परंतु कोणताही मुलगा त्या म्हातारा आणि म्हातारीता खाण्याला देत नाही. त्यांच्या घरासमोर एक म्हातारा राहत असे. तो या दोघांना खायाला प्यायला देत असे. त्यामुळे दोघेही म्हातारा आणि म्हातारी घरासमोरील म्हाताऱ्याला आपल्या गोष्टी सांगायचे. एक दिवस घरासमोरील तो म्हातारा त्यां दोघांना एक नाणे देतो व सांगतो की, 'हे नाणे पितळाच्या गुंडात धरी घेऊन जा व जाताना पितळाच्या गुंडाला वाजवित जा.' त्यामुळे गुंडातील नाण्याचा आवाज होतो. त्या आवाजाने धरातील लहान मुले म्हातारा आणि म्हातारीकडे येतात. तो म्हातारा ती मुले आल्यानंतर ते नाणे गुंडाच्या आत टाकतो. जेणे करुन त्या लहान मुलांना दिसेल. हा सगळा प्रकार पाहिल्यावर ती मुले आपल्या आईवडिलांना ही हकिकत सांगतात. मुले हे ही सांगतात की, 'आजोबा आणि आजी जवळ भरपूर पैसा आहे.' ही बातमी कळताच चारही मुले त्या म्हातारा म्हातारीची चांगली काळजी घेऊ लागतात. थोडया दिवसात म्हातारा आणि म्हातारी दोघेही मरण पावतात. त्यानंतर चारही मुले येऊन गुंड पाहू लागतात. परंतु त्यामध्ये पैसे नसतात, तर दगड असतात. त्या मुलांना प्रश्न पडतो की, म्हातारा म्हातारीने ते पैसे कुठे ठेवले असतील? त्यानंतर त्यांच्या धरासमोरील म्हातारा त्या चारही मुलांना सांगतो की, 'तुमचे आई-वडील बऱ्याच वेळा शेतात जात असत. होऊ शकते ते पैसे त्यांनी शेतात गाडले असतील. तुम्ही असं करा, शेतात जा. तेथे शोधा.' त्यानंतर चारही मुले शेतात जाऊन संपूर्ण शेत खोदून पैसे शोधतात. परंतु त्यांना काही सापडत नाही.

हे पाहून चारही मुले खूप निराश होतात. त्यानंतर धरासमोरील तो म्हातारा पुन्हा त्यांना सांगतो की, 'एवढे करून तुम्हाला काही मिळाले नाही, त्यामुळे तुम्ही जी जमीन खोदली आहे. तेवढया जमिनीवर बी पेरुन द्या. त्याची मशागत करा.' पुढे खोदलेले शेत असल्यामुळे चांगले पीक येते. त्यांच्या हातात पैसा येतो. तेव्हा त्यांच्या घरासमोरील म्हातारा सांगतो की, 'ही संपत्ती तुमच्या वडिलांनी शेतात गाडून ठेवली होती.' त्यामुळे त्या चारही मुलांना समजते की, खरी संपत्ती म्हणजे मेहनत, कष्ट हेच होय.

(स्त्रोत : रामसा बाबा चतुरकर ग्राम मातका, ता. आठनेर जि. बैतूल.)

**४. राजा आणि राजपूत्र :**

एक होता राजा आणि एक होती राणी. दोघांचे नवीनच लग्न झाले होते. त्या राजाला शिकार करण्याची आवड होती. त्यामुळे राजा दररोज शिकार करण्यासाठी जंगलात जात असे. राजा जवळ मोठ्या प्रमाणात उंट, घोडे, बागबगिचे होते. राजा बगिच्यात दररोज आराम करण्यासाठी जात असे. त्यामुळे त्या बगिच्यात असलेल्या चिमण्यांचा सहवास त्याला लाभत असे. त्यामुळे राजाला त्या चिमण्यांची भाषा समजू लागली. एकदा राजा चिमण्यांना म्हणाला की 'तुम्ही माझ्या घरी या ! तुम्हाला जे खायाला लागेल ते मी देत जाईल.' लगेच चिमण्यांचा त्या राजाच्या महालाच्या दिशेने आला. त्या दिवसापासून राजा दररोज पाच पोते धान्य एका वेळेस त्या चिमण्यांच्या थव्याला खायला देऊ लागला. असे नित्य चालू लागले. परंतु काही दिवसांनी राजा जवळची धनदौलत संपत आली. त्यांच्या जवळील घोडे, हत्ती सगळे विकल्या गेले. त्यामुळे चिमण्यांनाही

धान्य मिळेनासे झाले. शेवटी चिमण्यांच्या थवा मोठा असल्यामुळे प्रत्येक चिमणीला धान्याचा एकच कण खायला मिळू लागला. त्यामुळे चिमण्या उपाशी राहू लागल्या. शेवटी राजाकडे काहीच उरले नाही. राजा एकदा राणीला म्हणाला, 'आपल्याकडे काहीच शिल्लक राहिले नाही आणि चिमळ्या तर धान्याची मागणी करीत आहेत. त्यामुळे आपण पळून जाऊ या.' एक दिवस राजा राणी महालातून पळून गेले. चिमण्या महालातच राहिल्या. राजा आणि राणी चालत चालत खूप दूर निधून गेले. काही कालावधी नंतर राणीला खूप भुख लागली तेव्हा राणी राजाला म्हणाली, 'राजेश्री, मला खायला काही तरी द्या.' राजा अन्नाचा शोध घेऊ लागला. तेव्हा त्याला काही अंतरावर गुरे चारणारे लोक दिसले. राजा राणीला म्हणाला, 'थांब, मी काही तरी आणतो.' राजा त्यांच्याकडे गेला आणि मातीच्या भांडयात काही तरी खायला घेऊन येऊ लागला. रस्त्याने येताना मातीचे भांडे खाली पडून फुटून गेले. आणि ते दोघेही उपाशी राहिले. त्यामुळे राजा राणी निराश होऊन पुढे निधून गेले. काही अंतर गेल्यावर त्यांना तलाव दिसला. त्यांना भूक लागली असल्यामुळे ते दोघे मासे पकडू लागले. त्यांनी एक मोठा मासा पकडला. त्या माशाला भाजून खाण्यासाठी काडी कचरा जमा केला आणि त्या माशाला त्या जाळात टाकीत असताना तो मासा निसटून गेला. ते दोघे पुन्हा उपाशी राहिले. राणी रडू लागली. आता त्यांनी असे ठरविले की, आपण पूढचा प्रवास एकटयाने करायचा. ठरल्याप्रमाणे ते आपआपल्या वेगवेगळया रस्त्याने निधून गेले. राजाला काही अंतरावर एक गाव दिसले आणि तेथे राजाने एक काम पाहिले. त्याला एका महालात काम मिळाले. तिकडे राणीला पण एक गाव दिसले. ती राणी त्या गावात गेली तेव्हा तेथे तिला एक सुंदर घर दिसले. तिने तेथे काम मागितले. तिला काम मिळाले. ते काम म्हणजे

शेण गोळा करणे, भांडी घासणे असे होते. ते काम करता करता तिने एका बाळाला जन्म दिला. इकडे राजा ज्या महालात काम करीत होता. त्या महालाचा मालक आपल्या मुलाच्या लग्नाचा विचार करीत होता. एक दिवस तो मालक त्या राजाला घेऊन मुलगी बघायला जातो. ते दोघेही ज्या घरी राणी कामाला असते त्याच धरी जातात. तेथे गेल्यानंतर राजाला आपली राणी दिसते, ते एकमेकांना ओढखतात व आपआपली कामे सोडुन आपल्या धरी जाण्यासाठी निघतात. रस्त्याने जाताना त्यांना मासोळ्या दिसतात. ती फूटलेली मातीची भांडीही सुरक्षित दिसतात. काही वेळानंतर ते आपल्या घरी पोहचतात. पण त्यांना चिमण्या दिसत नाहीत. त्यांचा संसार पुन्हा पहिल्यासारखा चालू होतो. काही काळानंतर त्यांचा मुलगा मोठा होतो. त्यालाही बापासारखी शिकारीची सवय असते. एक दिवस शिकारीला जात असताना त्याला बगिच्यातील झाडे व पाने सुकून गळून गेल्याची दिसतात. राजाच्या मुलाला आश्चर्य वाटते. तो झाडाना विचारतो, 'हे सगळे कशामुळे झाले.' झाड म्हणते, 'काही दिवसापासून दोन जादुगार स्त्रिया बगिच्या येत आहेत आणि जादू केलेले कुंकू झाडावर फेकून जात आहेत. त्यामुळे झाडांची ही दशा झाली आहे. हे ऐकल्यानंतर दुसऱ्या दिवशी राजाचा मुलगा एका आंब्याच्या झाडावर लपून बसतो. काही वेळानंतर त्या स्त्रिया तेथे येतात. तो मुलगा त्यांच्यावर हल्ला करतो. परंतु त्या स्त्रियांकडे जादू असल्यामुळे  त्या मुलालाच बंदी करतात आणि सोबत घेऊन जातात. तो मुलगा त्यांच्या तावडीतून कशीतरी सुटका करून पळू लागतो. त्या स्त्रियाही त्याच्या मागे लागतात. रस्त्यामध्ये एक नदी लागते. त्या मुलाला प्रश्न पडतो की आता नदी पार कशी करायची ? तेव्हा त्याला एक उंट दिसतो, तो त्याचा सहारा घेऊन नदी पार करू लागतो. त्या स्त्रिया त्या उंटाच्या शेपटीला पकडून येऊ

लागतात. तेव्हा तो मुलगा त्या उंटाची शेपटी कापतो आणि आपली सुटका करून राजवाड्यात परत येतो.

(स्त्रोत : शेखलाल मनाजी बेलसरे, ग्राम, अढाव, ता. चिखलदरा, जि. अमरावती.)

**कोरकू बोलीतील उखाणे :**

मानवाच्या बुद्धीला परखून तिची कसोटी पारखण्याचे काम उखाणे करीत असतात. आपल्या परिसरात अनेक वस्तु, आपल्याला माहीत असतात परंतु त्या वस्तूना ओळखण्यासाठी जेव्हा शृंगारिक कल्पना वापरल्या जातात तेव्हा त्या ओळखण्यासाठी बुद्धीची कसोटी लागते. अनेक उखाण्यात सुंदर शब्दांची गुंफण झाल्याने त्यातील मनोरंजकता वाढते व त्याच्या उत्तरासाठी मनामध्ये उत्सुकता निर्माण होते. अनेकदा मनोरंजनासाठी उखाणे सांगतिल्या जातात. एक व्यक्ती उखाणा सांगतो तर दुसरा त्याचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करतो. जर त्याला उत्तर आले नाही तर त्याला हार मानावी लागते. मराठीत उखाण्यांना कोडे किंवा कूट प्रश्न असे म्हणतात तर कोरकू बोलीत उखाण्यांना 'जीजूम आयना' असे म्हणतात. अनेकदा कथात्मक उखाणे कोरकू बोलीत आढळून येतात. अशा प्रकारच्या कथेत एखादा प्रसंग वर्णन केलेला असतो. त्या संपूर्ण कथेचे उत्तर मात्र एका शब्दात दडलेले असते. ुखाण्यांचा मुख्य उददेश मानवी मनाचे मनोरंजन करणे व त्याला आनंद देणे हाच असतो. कोरकू बोलीत खालील प्रकारचे उखाणे सांगितल्या जातात.

१. नी टेमो कोवळा बुढापामो कोवळा बराबोर तोल झकाझोला

लहानपणी कोवळा, म्हातारपणी कोवळा, जवानीत झकाझोल.

उत्तर- सुरज (सूर्य)

२. खाटी बाटो जिमे चोज होय.

लोहाराचा बाप कोण ?

उत्तरः खरपो (खपर)

३. उलटा चिखोर भरणा बोचो.

उलटी शिकोरी पण भरलेली.

उत्तरः महूआ (मोहाचे फूल)

४. बटे जकळे आंटे, टकलू कोंटे ककडा.

वडील केसाळ, आई टकली, गोरा मुलगा ?

उत्तर : खोपटे (नारळ)

५. हरी थी, भरी थी, राजा के दरवाजे मे खडी थी, बाल सुखी थी ?

हिरवी होती, भरलेली होती. राजाच्या दरवाजात उभी होती. केस वाळलेले होते ?

उत्तर : मेकैई (मक्याचे कणूस)

६. डा लिपी लिपी लिंबो पाला लेखऊ का बन्ने.

लपालप पाण्यातील लिंबाचा पाला मोजता येत नाही ?

उत्तर : काकू कू (बारीक बारीक मासोळ्या)

७. म्या थाडा भेरटी, डामा लेखऊ का बन्ने.
ताटभर पैसे मोजता येत नाहीत ?
उत्तर : इफीर (आकाशातील चांदण्या)

८. पेहला लिला लुबू ऐबेर, डा डे बाडोन राटा लुबू ऐबेर डा ?
पहिल्यांदा हिरवी साडी घालते नंतर लाल साडी घालते.
उत्तर : मिच्चा (मिरची)

९. तार मे तार बत्तीस तार उसका उपर तहसिलदार.
तारावर तार बत्तीस तार त्यावर बसला तहसिल दार.
उत्तर : जगली महाराज (मकडी)

१०. म्या हेलागेन बारा नाठा
एका हल्याला बारा नाथा
उत्तर : ढोल (ढोल)

**११. कोरकूतील कोडे कथा :**

म्या साधू महाराज डन्ने मेना मका डी साधू इनी गावा टे.डी गावा हिंदळी लक्के डन्ने मकन मय कोरो मेटन डा आसी ओलेन. कई डी कोरो मेना येबेना जा महाराज इंजा मेरन म्या का टेंब्या डा टाका डी आमके

जीके की इंज डागा टटेनन गोईवा. डे मारेन इंज डा ऐबेन जू . डे बाडोन साधू महाराज सम्मान ओलेन कई म्या धिडी बाडोन डी बिचर लज्ञेत की इंज महाराजा आत्मा जुलके डे मारेन इंजेन पापो घईवा. डे मारेन इनी डा इंज महराज के जीकीवा डे डी कोरो सळूप चले, ओलेन महाराज के जाडे लक्केन. कई ओलेन महाराज भी डी डा बनसा लज्ञेत महाराज मेन पेहला ड जुटे मना रिंज के डे मारेन इनी डा इंज बनसा महाराज नाराजो मारेन डी कोरोनी डी डा नुनु बागोन जेन ओटेन तेळपऐ लज्ञेन कई ओलेन धरती माय भी डी डा के बागो लज्ञेन डे बाडोन आकाशा ने तेळपऐ लक्केन कई आकाशा बी झिजला बागोन जेन डे बाडोम म्या टेंब्या डा ओलेन मकन तुंगन ओलेन.

उत्तर : खोपडी.

**मराठी अर्थ :**

एक साधू महाराज असतो. तो या गावातून त्या गावात भिक्षा मागत असतो. एकदा तो फिरत असताना त्याला तहान लागते. दूर एक शेतात त्याला एक माणूस काम करताना दिसतो. तो महाराज त्या माणसाकडे जातो व पिण्यासाठी पाणी मागतो. तेव्हा तो माणूस महाराजाला म्हणतो, 'माझ्याकडे फक्त एक लोटा पाणी आहे. ते ही तुम्हाला दिले तर मी पाण्याविना मरून जाईन.' तेव्हा तो महाराज पुढे निघून जातो. काही वेळाने त्या शेतालीन माणूस विचार करतो की, मी तहानलेल्याला पाणी दिले नाही तर पाप लागेल. मग तो माणूस पुन्हा पळत पळत त्या साधू महाराजाकडे जाते. त्यांना पाणी देतो. पण महाराज ते पाणी प्यायला नकार

देतात. महाराज म्हणतात, 'पहिल्यांदा तू पाणी दिले नाही आता तू मन मारून पाणी देतो आहेस ते मला नको आहे.' तो माणूस नाराज होतो. तो स्वत : सुदधा पाणी पीत नाही. ते पाणी तो जमिनीवर फेकायला जातो. तेव्हा धरती त्याला म्हणते, 'मी दुखवलेले पाणी घेणार नाही.' मग तो माणूस ते पाणी आकाशात फेकायला जातो. तेव्हा आकाश त्याला म्हणते, 'मी हे पाणी घेणार नाही.' मग ते लोटाभर पाणी गेले कुळे ?

उत्तर : नारळात.

संदर्भ सूचि :

१.सामाजिक मानवशास्त्र को रूपरेखा, विवेक प्रकाशन नवी दिल्ली २०१२ पृ.क्र.९३३
२.सामाजिक मानवशास्त्र की रुपरेखा, विवेक प्रकाशन दिल्ली-२०१२ पृ.क्र. १७९)
३. पाटील अशोक, कोरकू जनजाती, विश्वभारती प्रकाशन, नागपूर १९९९ पृ.क्र. ३४

लेखक :
डॉ. श्रीकृष्ण काकडे
अकोला (महाराष्ट्र)